केषु कवित्व निवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख ।

सुरस ग्रंथमाला पुष्प ८० वें.

# म य स भा

लेखक :

श्रीयुत जगन्नाथ एकनाथ नरवणे

'दैवाचे खेळ', 'ईश्वरी लीला', 'आशा की निराशा', 'कृष्णसर्प',
'बंधनांच्या अलीकडे', 'स्नेहबंधन', 'मातृ-संदेश', 'स्नेहलता',
'गुणगौरव', 'हृदयाची ओळख'
इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

जानेवारी १९३९

[ ...वृत्ति ]

[ मूल्य २ रुपये

# डॉ. रामचंद गुलाबचंद व्होरा

एम. बी. बी. एस.



डॉ. व्होरा हे मालेचे अतीव हितचिंतक आहेत. ते नुकतेच कॉंग्रेसच्या राजवटींत ऑनररी मॅजिस्ट्रेट झाले आहेत. याबद्दल आम्ही त्यांचे अभिनंदन करतो.

—संपादक

# प्रस्तावना

माझ्या पूर्वीच्या "ईश्वरी लीला", "आशा कीं निराशा", "कृष्ण-सर्प", "बंधनाच्या पलीकडे" इत्यादि कादंबऱ्या 'सुरस' ग्रंथमालेंत प्रसिद्ध होऊन बरेच दिवस झाले. त्यानंतर लिहिलेलें शिक्षण या मालेंत प्रसिद्ध होण्याचा योगायोग माझ्या नोकरीनिमित्त परगांवीं जाण्यामुळें आला नव्हता. तो आतां मी पुण्यास आल्यामुळें माझे स्नेही व 'सुरस' ग्रंथमालेचे उत्साही प्रकाशक रा. शंकरराव वैद्य B. A. L.L. B. यांच्या प्रेरणेमुळें आला. असो.

ही कादंबरी लिहिण्याचा मुख्य उद्देश 'घरंदाज स्त्रियांनीं सिनेमांत काम करावें कीं नाहीं" असा आहे. एक काळ असा होऊन गेला कीं त्यावेळीं स्त्रियांनीं सिनेमांत काम करणें अत्यंत धोक्याचें झालें होतें पण पुढें सुशिक्षित वर्ग या धंद्यांत बराच भाग घेऊं लागल्यामुळें ही स्थिती सुधारेल असें वाटलें होतें पण दुर्दैवानें तें खोटें ठरूं पहात आहे. सिनेमा सृष्टींत जाऊन आलेल्या एका नटीचा अनुभव कळून घेण्याचा योगायोग मला आला होता त्यावरून थोडेसे सुबुद्ध व सुशिक्षित नट या धंद्यांत नीतिबंधनाच्या दृष्टीनें काहीं सुधारणा करूं शकत नाहींत हें सिद्ध झालेलें आहे, इतकेंच नाहीं तर कांहीं अपवाद सोडल्यास हे सुशिक्षित लोकही हें बंधन न पाळण्याच्या मोहाला बळी पडतात असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें तेव्हा ही स्थिती पूर्ण सुधारल्याशिवाय सुखाचा संसार करणाऱ्या स्त्रियांनीं कलेच्याकरतां म्हणून या 'मयसभेंत' पाऊल टाकणें किती धोक्याचें आहे हें दाखविण्याचा मी प्रयत्न केलेला आहे.

पुणें

३-९-३१ [illegible]

# अनुक्रमणिका

# सरहद्दीवरील दंगल ! १

ती साधारण पहाटेच्या पांच वाजण्याची वेळ होती. सरहद्दीवरील 'बन्नु' गांवात—ते थंडीचे दिवस असल्यामुळें—अद्यापही कमालीची स्तब्धता होती. बन्नु गांवाच्या बाहेर लष्करी छावण्या पडल्या होत्या. त्यांतील एका छोट्याशा तंबूत रेजिमेंटल क्लार्क रमेश एकतारीवर सुंदर भजन करीत बसला होता व इतकी थंडी होती तरी आसपासच्या तंबूतील बरेचसे लोक रगृज् पांघरून तें भजन ऐकण्याकरतां मोठ्या भक्तिभावानें आले होते.

रमेशचा अधिकारीवर्ग कालच परत कोहटला गेला होता व आज उरलेली सर्व मंडळी तिकडे जाणार होती त्यामुळें रमेशला आज जास्त मोकळेपणानें भजन करतां येत होतें. नाहीं म्हणायला कंपनी कमांडर कॅप्टन् नारायणराव यांना मात्र सर्व मंडळीवर देखरेख ठेवायला मागें ठेवण्यांत आले होतें. भजन ऐन रंगांत आलें असतां एका स्त्रीच्या हृदयद्रावक ओरडण्यानें त्यांत व्यत्यय आला.

एकतारी खालीं ठेवून रमेश झटकन् बाहेर आला. इतर शिपायी मंडळीही त्याच्या मागोमाग होतीच. त्या वेळच्या सधीप्रकाशात रमेशला दिसून आलें कीं पहाडांतील दरवडेखोर बन्नु गांवांतील एक पुरुष व एक स्त्री अशा दोघांना पळवून नेत आहेत व पळवून नेत असतानाच त्या स्त्रीनें ओरडून मदत मिळविण्याचा प्रयत्न केला व तो कसा सफल झाला हें वर दिलेंच आहे. पण त्या स्त्रीला याबद्दल ताबडतोब प्रायश्चित्त मिळालें तिचें तोंड रुमालानें घट्ट बांधण्यात येऊन व त्या दोघांना एका घोड्यावर आडवें घालून ते लोक तेथून पसार झाले व हां, हां, म्हणतां पहाडांत दिसेनासे झाले.

परिस्थिती लक्षात येतांच रमेश झटकन् कमांडर साहेबाच्या तंबूकडे निघाला.

कॅप्टन् नारायणराव अद्याप उठले नव्हते पण निकडीचें काम जाणून त्यांना उठविण्यात आलें.

" रमेशनें थोडक्यात सर्व हकीकत निवेदन केली व नंतर तो म्हणाला, " दरवडेखोर अद्याप दृष्टीच्या टप्प्यात आहेत यावेळीं परवानगी मिळाल्यास मी त्यांना सहज गाठू शकेन."

" रमेश तूं म्हणतोस तें सगळें खरें पण यावेळीं माझ्यावर मोठीच जबाबदारी येऊन पडली आहे. कर्नलसाहेब येथें नाहींत, बहुतेक सर्व रेजिमेंट परत कोहटला गेली आहे. एखादा सुभेदार जमादार सुद्धां यावेळीं येथें नाहीं. तेव्हां माझ्या जबाबदारीवर तुला तिकडे पाठविला व ते दरवडेखोर न सापडतां तूंच त्यांच्या जाळ्यात सांपडल्यास त्याबद्दल मलाच जाब द्यावा लागेल आणि दुसरं असं कीं तुला येथील पहाडाची कांहीच माहिती नाहीं. रमेश अधीर होऊन म्हणाला " साहेबांनीं या वेळेला कोणत्याही शंका-कुशंका काढू नयेत. दोन अनाथ लोक त्या क्रूर लांडग्यांच्या हातांत सांपडले आहेत, त्यांतील एक स्त्री आहे हें साहेबांनीं विसरूं नये. स्वतः साहेब जबाबदारी घेत नसल्यास मी तसाच जातो व नंतर परवानगीशिवाय कँप सोडला म्हणून जरूर वाटल्यास माझ्यावर कोर्ट मार्शल करावें; प्रत्येक क्षण लाखाचा आहे. "

रमेश कमालीचा अधीर झाला होता. एक क्षणच कॅप्टन् नारायणराव

विचारांत पडले. नंतर ते उठून व रमेशची पाठ थोपटून म्हणाले " रमेश जा. ईश्वर तुझें रक्षण करो. नीट हुषारीनें वाग, व कँपांतील शक्य तेवढी जास्त मंडळी घेऊन जा. आजच्या हालचालीची सर्व जबाबदारी मी आपल्या शिरावर घेत आहे. तुझ्या मागोमाग मीही पण उरलेले लोक घेऊन येतोच. "

कॅप्टन साहेबांना लष्करी सलाम करून रमेश झटकन् तेथून परतला. अलार्म ब्युगूल देण्यांत आला. रमेशला अत्यंत चाहणारी व त्याच्या आंचास जीव देणारी बरीच मंडळी त्या कँपांत होती ती सर्व त्याच्याबरोबर निघाली.

यावेळीं ते दरवडेखोर दिसेनासे झाले होते. त्या पहाडावर बर्फ पडलें असल्यामुळें त्या पहाडाचा देखावा अत्यंत रमणीय असा होता. इतर वेळ असती तर रमेशनें त्यावर एखादें काव्य केलें असतें पण आजची वेळ तशी नव्हती. त्या पांढऱ्या शुभ्र डोंगरांत कांहीं काळ्या व्यक्ति दिसतात कां काय हें तो निरखून पहात होता पण त्याची इच्छित वस्तु त्याला दिसेना. तो अगदीं डोंगराच्या पायथ्याशीं आला तेव्हां त्याला कांहीं घोडे दिसले. त्यामुळें त्या अनुरोधानें तो आपल्या लोकासह निघाला.

लवकरच त्याला ते दरवडेखोर डोंगर चढत असतांना दिसले. त्या पकडलेल्या दोघांचे उलटे हात बांधून त्यांना जवळ जवळ ओढीतच ते घेऊन चालले होते. पण त्या दोघांच्यामुळें त्या दरवडेखोरांचा चालण्याचा वेग बराचसा कमी होत होता. ते लोक साधारण टप्यांत येतांच रमेशनें एक बार हवेंत उडवला त्याबरोबर त्या लोकांची हालचाल जोरांत सुरू झाली. आतां त्यांनीं आपल्या जाण्याचा क्रम बदलला; पूर्वीं जे कैदी अगदीं पुढें होते त्यांना त्या लोकांनीं आतां मागें ठेवलें व आपण सर्वजण त्या दोघांच्या पुढून चालले, हेतु हा कीं खालच्या लोकांनीं गोळी झाडल्यास या दोघानाच प्रथम ती लागावी.

त्या दोघांपैकीं ती स्त्री तर अगदीं दमून जाऊन तिला आतां एक पाऊलही उचलण्याची शक्ती राहिली नव्हती पण त्या निर्दय लोकांना त्यांची काय पर्वा होती ! त्यांनीं तिला गुराप्रमाणें ओढीत चालविली.

तिचे होत असलेले हाल रमेशला पहावेनात. अधाप त्या लोकांचे व

शिपायी लोकांत पुष्कळच अंतर होतें व कितीही घाई केली तरी झटपट त्यांना गाठणें शक्य नव्हतें. तेव्हां संधी साधून नेमकें त्या लोकावर गोळ्या झाडण्याचें रमेशनें ठरविलें. दरवडेखोर गोळ्या झाडतील म्हणून शिपायी लोक आडोसा घेत घेत पुढें चालले होते.

रमेशला हवी होती ती संधी एकदाची मिळाली. चढतांना ती स्त्री कोलमडून पडली. तेव्हां तिच्या दंडाला बांधलेल्या दोऱ्या जोरजोरानें ओढून एक दरवडेखोर तिला उठवीत होता.

क्षणाचाही विलंब न लावतां रमेशनें गोळी झाडली त्याबरोबर 'अल्ला' 'अल्ला' करीतच तो दरवडेखोर खालीं पडला. आपल्या दोस्ताची ती अवस्था पाहून दुसऱ्यानें रमेशवर बंदुकीचा नेम धरला. पण गोळी सुटायच्या आंतच तोही रमेशची गोळी लागून खालीं कोलमडला.

परिस्थिती गंभीर पाहून त्या दरवडेखोरांच्या पुढाऱ्यानें पांढरें निशाण दाखविलें पण त्या लोकांची खात्री नसल्यामुळें रमेश व त्याचे लोक हळू-हळूच व आडोसा घेतच पुढें येत होते. हाकेच्या टप्प्यांत येतांच रमेशनें त्याना हत्यारें खालीं ठेवून व हात वर करून उभे रहाण्याचा हुकूम केला व त्या लोकांनीही तो मुकाट्यानें ऐकला. आतां भीति नसल्यामुळें रमेशच्या लोकांनीं लवकरच त्याना गांठलें.

त्या दुर्दैवी प्राण्यांना मोकळे केल्यावर व दरवडेखोरांचीं हत्यारें ताब्यांत घेतल्यावर रमेश त्या दरवडेखोराच्या पुढाऱ्याला म्हणाला "हजरत, या गरीब लोकांना छळून तुम्हाला काय मिळालें ? निःशस्त्र लोकांचा असा विनाकारण कां छळ करता !"

रमेश त्यांच्या 'पुस्तु' भाषेंत बोलत होता. त्यामुळें त्या दरवडेखोराला त्याचा अर्थ सहज कळला पण त्याच्या प्रश्नाला उत्तर न देतां तो आपल्या दाढीवरून हात फिरवीत म्हणाला "शहाजी, तुम्ही नेमबाजीची कमाल केलीत. आम्ही लोक नेमबाजीचे फारच भोक्ते आहोत. आम्ही घातलेली एकही गोळी वाया जात नाहीं अशी आमची आख्यायिका आहे. पण तुमची नेमबाजी पाहून आम्ही बहुत खूष झालों. असला नेमबाज शत्रु असला तरी आम्ही त्याला मित्र समजतो, येथून निसटून जाणें आम्हांला

मुळींच अशक्य नव्हतें किंवा शिट्टी फुंकून माझे डोंगरांतील भाईबंद माझ्या मदतीला बोलावणें अगदीं सोपें होतें व तसें झालें असतें म्हणजे तुमच्यांतील एकही इसम जिवंत परत गेला नसता. पण तुमच्या नेमबाजीनें खूष होऊन तुमची मुलाखत घेऊन असा वीर कोणता आहे हे पहाण्याच्या उद्देशानें मी तें निशाण दाखविलें. "

त्याचें बोलणें आणखी लांबलें असतें पण त्याला थांबवूनच रमेश म्हणाला " खानसाहेब माझी मुलाखत झालीच आहे तेव्हां आतां पुढें काय करण्याचा विचार आहे. "

" बादशाहो, आपण तह करूं या, या दोघांपैकीं प्रत्येकीं १०००० रुपये देऊन हे लोक सोडून घेऊन जावें, आम्हांला फक्त पैसा हवा. पैशाकरतां आम्ही वाटेल तें साहस करूं. "

" खंडणीची गोष्ट विसरा " रमेश हंसत हंसत म्हणाला " तुम्ही मुकाट्यानें आमच्याबरोबर येणार, कां दंडाला काढण्या बांधू हेंच मी आतां विचारणार आहे. "

" साहेबजी हा नुसता भ्रम आहे, पण आपण यांतून कांहीं तोड निघते कां पाहूं, तुमची नेमबाजी पाहून आम्ही फार खूष झालों आहोत हें सांगितलेच. आतां मी एक झाड दाखवितो त्या झाडाच्या शेंड्यावर एक फूल आलेलें आहे, तें फूल तुम्ही आपल्या नेमबाजीनें तोडल्यास कांहीं एक खंडणी न घेतां या दोघां कैद्यांना आम्ही सोडण्यास तयार आहोत, नेम चुकल्यास मात्र २००० रु. ची खंडणी द्यावी लागेल. "

" आम्ही जे इतके जीवावर उदार होऊन आलो आहोत ते तुमच्या असल्या धमकावणीला भिणार नाहींत;तुम्ही या वेळीं आमचे कैदी असल्यामुळें असल्या अटी ऐकून विनाकारण वेळ घालविण्यास आम्हांस वेळ नाहीं, कांहीं झालें तरी आम्ही खंडणी न देतांच दुर्दैवी प्राणी सोडवून नेणार, आमचा प्रतिकार करण्यास तुमचे लोक हवे असल्यास बोलवा, पण विनाकारण रक्तपात करण्याची माझी इच्छा नाहीं. माझ्या नेमानें फूल तुटल्यास रक्तपात न होतां माझें कार्य होणार आहे म्हणून तुमची अर्धी

सूचना मी मान्य करतो. दुर्दैवानें फूल न तुटल्यास रक्तपात अपरिहार्य आहे,"
"बोला कोणत्या झाडावर फूल आहे ?"

समोरच दिसणाऱ्या दुसऱ्या एका टेकडीवरील झाड दाखवीत तो दरवडेखोरांचा पुढारी म्हणाला "पहिल्याने बंदुक रोखून तर पहा माझ्या अटीबद्दलचा वाद मग करूं. ते पहा त्या पलीकडच्या डोंगराच्या डाव्या बाजूच्या उंच टोकाला असलेल्या झाडाला एकच फूल आलेलें आहे."

दोन तीनशें यार्डांपेक्षां जास्त ते अंतर होतें. तें फूल त्याच्या तांबूस रंगावरून स्पष्ट दिसत होतें, पण देठाचा हिरवट रंग पानांच्या रंगाशीं मिळून गेल्यामुळें तो अंधुक तऱ्हेनें दिसत होता. रमेशनें नेम धरला. किती वेळ तरी त्याला फूल व देंठ दोन्ही दिसत होतें. त्यांनीं आपली दृष्टि आणखी अकुंचित केली.आतां त्याला फक्त देठच दिसूं लागला. एका क्षणांत बंदुकी-ची गोळी त्या देठात शिरून त्या देठासकट फूल अंतराळीं उडालें.तो दरवडे-खोर पुढारी धांवतच पुढें आला व रमेशला मिठी मारून म्हणाला "दोस्त मी तुमचा बंदा गुलाम आहे, तुमच्या नेमबाजीची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे असा नेमबाज मी आतांपर्यंतच्या आयुष्यांत पाहिला नाहीं. या कैद्यांना घेऊन जा, अल्ला तुमचे कल्याण करो. आम्ही पैशाचे लोभी असलो तरी आमच्या जातींत गुणाचे योग्यच चीज होईल याबद्दल खात्री ठेवा."

त्या दरवडेखोरापासून दूर होऊन रमेश म्हणाला "शत्रूकडून शाबासकी मिळाल्यामुळें मला विशेष आनंद झाला आहे.आतां आमच्या नियमाप्रमाणें तुम्हांला आमचे कैदी म्हणून यायला हवे पण तुम्ही या दोघा हतभागी जीवांना या धांदलींत जिवंत ठेवलेंत याबद्दलचें बक्षीस म्हणून माझ्या जबाबदारीवर मी तुम्हांस सोडून देत आहे, मात्र आम्ही परत जातांना तुम्ही आमच्यावर हल्ला होणार नाहीं असें वचन दिलें पाहिजे."

"भाई, आम्ही दरवडेखोर असलो तरी प्रामाणिक आहोत; आम्ही असले लोक पैशाकरतां पकडतो त्यांचा प्राण घेऊन आम्हांला कांही फायदा नाहीं. आम्ही पैशाविना उपाशी मरतो आहोत आम्हांला फक्त भरपूर खायला हवे, मग आम्ही कोणाच्याही वाटे जाणार नाहीं."

" तुम्ही प्रामाणिकपणानें राहिल्यास पोटाबद्दल कमांडरसाहेबाजवळ मी जरूर शिफारस करीन; बरें आहे आम्ही येतो, आम्हाला जलद खालीं गेले पाहिजे. "

इतका वेळपर्यंत त्या दुर्दैवी प्राण्याबद्दल चवकशी करण्यास रमेशला वेळच नव्हता आतां डोंगरावरून खालीं उतरतां उतरतां तो त्यांच्याजवळ जाऊन म्हणाला " आपले लोकांनीं फारच हाल केले नाहीं ? आपण बन्नूला काय करतां ! "

तो इसम हात जोडून म्हणाला " साहेब आमच्या या सुटकेमुळें हालांचे आतां कांहींच वाटत नाहीं. मी बन्नूचा व्यापारी असून ही माझी मुलगी आहे. "

चढण्याच्या धांदलीत बूट नाहींसे झाल्यामुळें ती मुलगी अनवाणीच चालत होती. त्या व्यापाऱ्याची ती मुलगी आहे असे कळल्यावर तो तिच्याकडे पाहूं लागला, त्या प्रांतातील सर्व स्त्रिया गोषात असल्यामुळे रमेशला त्या मुलीचा चेहरा दिसणे शक्य नव्हते. फक्त पाय व हात उघड होते यावरून ती मुलगी चांगलीच गौरवर्ण असावी असें त्यानें अनुमान केले. त्याच-प्रमाणें मुलगी १८।१९ वर्षांपेक्षा लहान नसावी असाही त्यानें अदमास केला. हातापायाचीं नखें गोंदविली असल्यामुळें तिच्या गौरवर्णाला तो तांबूस रंग फारच खुलून दिसत होता. या तिच्या आकर्षक सौंदर्याला दृष्ट लागू नये म्हणून कां काय गालबोटाप्रमाणें एक बारका तीळ तिच्या पायाच्या अंगठ्यावर रमेशला दिसला. त्यानें एकदां तिच्या सर्व शरीराकडे क्षणमात्र दृष्टी फेकली. शोभिवत चुण्यांनीं युक्त अशा पोलक्याखालीं तिचें वक्षस्थल दुधाच्या चरवींतील धवल फेसाप्रमाणें उचंबळत होतें. आपण जरूरीपेक्षां ज्यास्त वेळ त्या स्त्रीकडे पहात आहोत असें वाटून रमेशनें आपली दृष्टी लगेच त्या व्यापाऱ्याकडे वळविली व तो त्याला म्हणाला " तुम्ही लोक धाडशी खरे. मुलामाणसांसह निःशस्त्र असें येथें रहाण्याचा तुम्हाला धीर कसा होतो कुणास ठाऊक ! "

" साहेब पोराकरता इतक्या लांब मी आलो आहे. आमच्या हे नेहमीचेंच अंगवळणी पडलें आहे. आज तुम्ही आयत्या वेळीं देवासारखे

धांवत येऊन आमचें रक्षण केलेत याबद्दल ईश्वराचे आभार मानावेत तितके थोडे आहेत. तो परमात्मा श्रीकृष्ण तुमचें कल्याण करो."

"एकंदरींत तुम्ही हिंदु आहात तर, माझी आतांपर्यंत तुम्ही मुसलमानच आहात अशी कल्पना होती. येथलि बिनदाढीचे मुसलमान व हिंदु यामधील फरक त्रयस्थांच्या लवकर लक्षांत येत नाहीं. असो हे पहा, ते दरवडेखोर येथेंच घोडे सोडून गेले आहेत तुम्ही आतां दमल्या आहात तेव्हां घोड्यावर बसा आम्ही मागोमाग आलोच. त्या मुलीला चालण्याची शक्ती उरली नव्हती. त्यामुळे तिला त्याचें बोलणे ईश्वरासारखें वाटलें. ती मुकाट्यानें त्या घोडयाकडे वळली तिचा बापही मग घोडयाजवळ आला. त्यानें तिला वर बसविली. व तो चालतच जाणार होता पण रमेशनें आग्रह केल्यावर तोही घोडयावर बसला. इतक्यांत कॅप्टन् नारायणराव इतर सैन्यासह त्या ठिकाणीं हजर झाले.

लष्करी पद्धतीचा सलाम करून रमेशनें सर्व हकीगत थोडक्यांत सांगितली. ती ऐकल्यावर त्याची पाठ थोपटून कॅप्टन् नारायणराव म्हणाले, "शाबास खरा शूर आहेस, याबद्दल योग्य तें बक्षीस तूं कोहटला गेल्यावर तुला मिळेल याबद्दल खात्री बाळग. त्या लोकांना सोडल्याबद्दल तुझ्यावर कांहींच ठपका येणार नाहीं कारण त्या लोकांना आपलेसे करून घेण्याचा सरकारी हुकूमच आहे.

"साहेब मी बक्षिसाच्या आशेने कांहींच केले नाहीं माझी कर्तव्याकडे नजर होती."

"पण कर्तव्याबद्दल बक्षीस देऊं नये असें कोणी सांगितलें आहे."

इतक्यांत बन्नु गाव जवळ आल्यामुळें त्याचें बोलणे तितकेंच राहिलें. कॅप्टन साहेबांची परवानगी घेऊन तो व्यापारी मुलीसह गांवाकडे वळला. जातांना त्यानें रमेशला बाजूला गांठून त्याला चहाला घरीं येण्याची विनंती केली. तेव्हां दुपारी येण्याचे आश्वासन देऊन रमेश कॅप्टनसाहेबाबरोबर निघाला.

लवकरच ते आपल्या कँपांत आले. कॅप्टन नारायणरावांनीं रमेशचें व त्याच्याबरोबर गेलेल्या सर्व सैनिकांचे अभिनंदन करून त्याना जाण्यास परवानगी दिली.

# "रमेशचा गौरव" २

पहिल्या प्रकरणांत सांगितलेल्या हकीगतीच्या पूर्वी वर्ष दीडवर्ष पुढील प्रसंग घडला.

आज " निशीनाथ " कँपांत विद्यार्थ्यांची कोण धांदल उडाली होती. यू. टी. सी. (University Training Corps) मधील चढाओढीच्या सामन्यांत प्राविण्य मिळविणाराला मध्यप्रांताच्या दिवाणांच्या हस्तें आज बक्षीस–समारंभ होता.

निशीनाथ मंदिराच्या समोरील भव्य पटांगणांत "यू. टी. सी." मधील विद्यार्थ्यांचा तळ पडला होता. नागपूर युनिव्हर्सिटीला संलग्न असलेल्या सर्व कॉलेजमधील विद्यार्थी या कँपांत हजर झाले होते.

मंदिराच्या पटांगणाच्या बाहेर सपाट असें खूप मोठें मैदान होतें व तेथेंच आज खेळातली शेवटली चढाओढ होऊन नंतर बक्षीस–समारंभ होता. या समारंभास बरेचसे लष्करी अम्मलदारही हजर रहाणार होते.

बरोबर एक वाजतां खेळांत भाग घेणारे कॉलेजांतील विद्यार्थी क्रीडांगणांवर हजर झाले.

विश्रामबाग कॉलेजचा सर्वांचा आवडता विद्यार्थी रमेश क्रीडांगणावर येतांच सर्व बाजूच्या प्रेक्षक वर्गातून टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला.

निरनिराळ्या तऱ्हेचे १०।१५ खेळ होते. त्यांत अचूक नेमबाजी, १ मैल पळण्याची शर्यत, टग् ऑफ वार ( रस्सी खेच ) उंच उडी, लांब उडी, पोल जंप, तट्टीवरून पळणें, वजनाचा गोळा फेकणें वगैरे प्रकार मुख्य होते.

निकालाच्या वेळीं विद्यार्थ्यांची व इतर प्रेक्षकांचीं मनें किती उचंबळून येतात याचें चित्र रेखाटणेंच शक्य नाहीं. निरनिराळे निकाल लागत त्या-वेळीं विद्यार्थी इतका मोठा कोलाहल करीत कीं हातापलीकडील इसमाचे सुद्धां बोलणें ऐकू येणें कठीण होई.

अपेक्षेप्रमाणें अचूक नेमबाजी, एक मैल पळणें, पोल जंप, लांब उडी, उंच उडी, पोहणें वगैरे बाबतींत रमेशनें पहिलीं बक्षिसें मिळविलीं होतीं. या चढाओढीशिवाय कसरतीची, जादूची, घोड्यावर बसण्याची वगैरे कामें याचवेळीं करण्यांत आलीं.

घोड्यावर बसणें वगैरे गोष्टीला प्रोत्साहन देण्याकरतां विश्रामबाग कॉलेजनें स्वखर्चानें उत्तम अरब घोडे ठेवले होते. व त्यावर एका वश चाबुकस्वाराची नेमणूक केली होती.

सर्व खेळाचे निकाल लागल्यावर घोड्यावरील कसरतीचीं कामें दाख-विण्यांत आलीं; त्यांत रमेशशिवाय आणखी चार पांच विद्यार्थी होते. घोडा भरधाव सुटला असतां त्यावर उडी मारून बसणें, घोड्याच्या पाठीवर कांहीं न घालतां बसणें, घोड्याला हात न लावता वर उडी मारून बसणें, वगैरे कामें त्या मुलांनीं उत्तम तऱ्हेनें करून दाखविलीं.

शेवटीं एक पाय रिकीबींत अडकावून घोड्याच्या पोटाखालून डोकें दुसरीकडे काढून दुसऱ्या बाजूनें घोड्यावर बसण्याचे धाडसाचे काम रमेशनें करून दाखविलें त्या वेळीं टाळ्यांचा कडकडाट पांच मिनिटें चालला होता. अचूक नेम मारण्याची कामेंही त्यानें पुष्कळ करून दाखविलीं. डोळे बांधून आवाज केल्याजागीं नेम मारणें, विहिरींत टाकलेलें लिंबू बंदुकीचा नेम मारून तें वर उडवून बाहेर काढणें, गरगर फिरत असलेल्या मडक्याला ठरा-विक जागीं नेम मारणें इत्यादि प्रयोग फारच सफाईचे झाले व त्याच्या कामाचे स्वागत प्रेक्षकांनीं प्रचंड टाळ्यांच्या गजरानें केलें.

बक्षिस समारंभ मोठ्या आनंदांत पार पडला. सर्वांत जास्त बक्षिसें मिळविल्याबद्दल दिवाणानीं रमेशला एक स्पेशल बक्षीस दिलें व समारोप करतांना व्यायामाबद्दल विशेष जोर देऊन त्यांनीं रमेशचा प्रामुख्यानें गौरव केला.

समारंभ आटोपला व सर्व समाज हळुहळु विनळूं लागला. रमेशच्या भोंवतीं मुलांचा येवढा मोठा वेढा पडला कीं त्यांतून बाहेर निघणें जवळ जवळ त्याला अशक्य झालें. आश्चर्याची गोष्ट ही कीं या बक्षिसांचा रमेशला मुळींच आनंद झालेला दिसत नव्हता. मिळालेले बिल्ले छातीला न लटकावितां त्यानें तें खिशांत ठेवून दिले होते. इतक्यांत त्याची आतेबहीण प्रमिलादेवी मोटार घेऊन तेथें आल्यामुळें त्याला त्या मुलांच्या घोळक्यांतून बाहेर पडण्यास संधी सांपडली.

तो मोटारींत चढत असतांच मागून त्याला कोणी तरी हांक मारली. मागें वळून पहातांच त्याचा कष्टी चेहरा किंचित् आनंदी दिसूं लागला. जवळ येणारी व्यक्ति त्याच्या कॉलेजमधील सहाध्यायी कुमारी शालिनी होती. त्यानें पुढें केलेला हात आपल्या दोन्ही हातांत घेऊन व त्याच्याकडे आनंदीत मुद्रेनें पहात म्हणाली, " रमेश, Hearty Congratulations, मी अभिनंदन करण्याच्या आंतच तुम्ही जातां कीं काय अशी मला काळजी पडली होती. आजच्या तुमच्या यशाबद्दल प्रत्येकजण तारीफ करीत आहे."

" मिस, शालिनी, तुमच्या आतांच्या या अभिनंदनाचा मला बक्षीस मिळाल्यापेक्षांही जास्त आनंद झाला आहे; तुमच्या या प्रोत्साहनाबद्दल मी अत्यंत आभारी आहे."

" मला एकटीलाच आनंद झाला आहे असें नाहीं तर आमचे बाबाही फार खूष झाले आहेत, ते आज तुम्हाला चहाला बोलावणार आहेत. ते पहा तेच इकडे येत आहेत."

शालिनीचे वडील लष्करी खात्यांत नोकरीला असून आपल्या गुणानें ते यावेळीं कॅप्टनच्या रांगेपर्यंत चढले होते. व एका कंपनीचे कमांडिंग ऑफिसर बनले होते.

कॅप्टन नारायणराव जवळ येतांच शालिनी म्हणाली, " बाबा हे पहा आमच्या कॉलेजचे हीरो. आज सकाळीं मी नव्हते म्हणत कीं, आमचे रमेश सर्वांत ज्यास्त बक्षीसें मिळविणार ! आंत मोटारींत बसल्या आहेत त्या रमेशच्या आतेबहीण प्रमिलादेवी असून त्या येथील कन्याशाळेवर मुख्याध्यापिका आहेत. त्या मुकत्याच किस्मतपूरची शाळा सोडून इकडे आल्या आहेत.

आणि रमेश, हे आमचे वडील कॅप्टन नारायणराव येथील बी कंपनीचे कंपनीकमांडर आहेत."

प्रमिलादेवींनें मोटारीतून खालीं उतरून त्यांच्याशी हंसतमुखानें हस्तांदोलन केलें. रमेशनेही नम्रतापूर्वक त्यांना अभिवादन केलें. त्याच्या पाठीवर हात फिरवून कॅप्टन् नारायणराव म्हणाले, "रमेश तुमचे आजचें प्राविण्य पाहून आम्हांला फार आनंद झाला. असलीं कामें आम्हांला आमच्या सैन्यांत कधींच पहायला सांपडत नाहींत. आमची शालिनी अभ्यासाबद्दल तुमची नेहमीं स्तुती करीत असे; आतां खेळांतील प्राविण्याबद्दलही तिला फार आनंद झाला आहे."

"साहेब मिस् शालिनी या आमच्या वर्गाचे भूषण आहेत त्या मनाच्या इतक्या थोर आहेत व त्यांचा स्वभाव इतका उमदा आहे कीं त्यांना सर्वच लोक चांगले दिसतात; माझा व त्यांचा जरा जास्त परिचय असल्यामुळें आपलेपणानें त्या माझी भरमसाट स्तुती करीत असतात. पण त्या स्तुतीला मी पात्र आहे असें मला वाटत नाहीं.

"रमेश, वडिलांच्या समोर माझी निंदा करूं नका. हा धडधडीत माझा अपमान आहे." शालिनी हसत म्हणाली.

"नाहीं, रमेश, शालिनी म्हणते तसेंच माझेंही मत झालें आहे पण आतां हा वाद नको. तुम्हांला व प्रमिलादेवींना मी आज संध्याकाळीं कँपांत माझ्या बंगल्यावर चहाचें आमंत्रण द्यायला आलों आहे"

"चहाची काय जरूरी आहे मी नुसतांच केव्हां तरी येईन" त्यांनीं दाखविलेल्या आगत्यानें व शालिनीनें केलेल्या स्तुतीमुळें गोंधळून रमेशनें उत्तर दिलें.

"बरं आहे प्रमिलादेवींना घेऊन नुसतेच या. आल्यावर चहा द्यायचा कां नाहीं ते मग नतर पाहूं." कॅप्टन नारायणरावांनीं हंसत उत्तर दिलें. "प्रमिलादेवी तुमची येण्याला कांहीं हरकत नाहीं ना?"

प्रमिलादेवींनीं रमेशकडे पहात उत्तर दिलें. "माझी तशी कांहीं हरकत नाहीं पण हा मात्र आला पाहिजे."

"त्यांची नको काळजी त्यांना आलेंच पाहिजे: ते बाबांचा शब्द मोड-

तील असें वाटत नाहीं." आपण दिलेले आमंत्रण रमेश नाकारणार नाहींच अशी खात्री वाटून शालिनीनें उत्तर दिलें.

रमेशला आमंत्रण स्वीकारणें अर्थात् भाग पडलें. कॅप्टन साहेबांचा व शालिनीचा निरोप घेऊन ते दोघे मोटारींतून निघाले.

इतका वेळ दिसत असलेलें हास्य पुन्हां मावळलें. त्याचा चेहरा पुन्हां उतरलेला पाहून प्रमिलादेवी म्हणाली, " रमेश ? "

" काय ताई," तिच्याकडे न बघतांच रमेशनें प्रश्न केला.

" तुझा चेहरा असा उतरलेला का दिसतो आहे वास्तविक तूं आज आनंदांत असायचास ?"

रमेशचा चेहरा अधिक गंभीर व दुःखी दिसूं लागला. एक क्षण त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं, नंतर तो म्हणाला. " ताई आजच्या बक्षिसांत आनंद वाटण्यासारखं काय आहे !"

त्याचें वाक्य ऐकून ती आश्चर्यानें म्हणाली, " रमेश, तुझ्या बोलण्याचा अर्थच मला नीटसा समजला नाहीं ! बक्षीस मिळणें ही आनंदाची गोष्ट नाहीं कां ? "

" ताई माझें वागणें जरा चमत्कारिक तर खरेंच पण काय करूं ! माझा नाइलाज आहे. माझा चेहरा आनंदी ठेवण्याचा मी शक्य तितका प्रयत्न करतो पण साधतच नाहीं. ताई काय सांगू ! माझ्यावर स्तुतीचा वर्षाव चालला असतां मला आमच्या बाबांची आठवण होत होती. आजच्या बक्षिसांचे सर्व श्रेय खरोखर त्यांना आहे, त्यांनीं आपल्या नश्वर देहाचा त्याग करीपर्यंत माझी व्यायामाची काळजी घेतली. माझ्याकरता एक उत्तम अरबी घोडा खरेदी करून मला घोड्यावरनें शिक्षण दिलें. ताई ते हयात असते तर त्यांना किती तरी आनंद झाला असता नाहीं ! ताई मी काय करूं ते सांग मी चुकत नाहींना ! तर ते पहा तुझेसुद्धां डोळे भरून आले." रमेशला जोराचा हुंदका आल्यामुळें त्यानें आपलें बोलणें एकदम थांबविलें.

प्रमिलादेवीच्याही डोळ्यांत अश्रू येऊं पहात होते पण तिनें ते मोठ्या कष्टानें दाबून ती त्याला म्हणाली, " रमेश वडिलांची आठवण काढून

यावेळीं मन उदास करून बेऊं नकोस तूं आतां घराजवळ आला आहेस. तुझें मन उदास पाहून मामीला जास्त वाईट वाटेल तेव्हां तिच्या आनंदा-करतां तरी तुला हंसतमुख राहिलें पाहिजे."

"खरंच" रमेशनें आपले डोळे पुसता पुसता उत्तर केलें.

"आतां कसं बरं बोललास आणि हें पहा ते बिल्ले काढ पाहूं बाहेर मी ते तुझ्या छातीला लटकावून देते."

आईला वाईट वाटेल या कल्पनेचा जादूच्या कांडीप्रमाणें रमेशवर परिणाम झाला, तो आतां प्रमिलादेवी सांगतील त्याप्रमाणें वागूं लागला.

लवकरच त्याचें घर आलें; घरात गेल्यावर त्यानें आईला नमस्कार केला तेव्हां तिला मुलाबद्दल कितीतरी कौतुक वाटले! किती आनंद झाला! हसता हसता किंदां रडूं आले वगैरे गोष्टींचें वर्णन करून सांगण्यापेक्षां तें कल्पनेनेंच जाणलेलें बरें.

XXX पुरास सरदार विनायकराव म्हणून एक प्रसिद्ध व्यक्ति होती. वडिलार्जित सरदारकी व इनामी गावें असल्यामुळें त्यांचें शिक्षण बेताचेंच झालें होतें. जनावरांचा ह्याना विशेष नाद असल्यामुळें त्यांनीं घरीं बरीच जनावरें पाळलीं होतीं. एका स्नेह्याच्या नादानें त्यांनीं एक सर्कससुद्धां काढली होती. पण त्यांत त्या स्नेह्यानें सफाई गळा कापल्यामुळें त्यांचें त्या पायीं इनामी गांव गहाण पडलें.

त्यावेळेपासून त्यांच्या सरदारकीला उतरती कळाच लागली. त्यांतच व्यसनाची भर पडून सर्व इनामी गावांचा निकाल लागला. यानंतर व्हायचा तोच परिणाम होऊन विनायकरावांनीं आत्महत्या करून जगाला रामराम ठोकला.

सुदैवाची गोष्ट एवढीच कीं त्यांचें आपल्या एकुलत्या एक मुलावर फार प्रेम होतें. त्यामुळें इतक्या अडचणींत असताही मुलाच्या शरीर प्रकृतीची व शिक्षणाची त्यांनीं उत्तम काळजी घेतली होती.

विनायकरावाना एकाएकीं मरण आल्यामुळें सावकारांनीं एकदम उचल-खाल्ली. आपल्या लहानपणीं मामा आपल्या व आपल्या आईच्या किती

उपयोगी पडले होते हें प्रमिलादेवी विसरली नव्हती.* त्यामुळें मामांच्या निधनाची वार्ता कळतांच ती तावडतोब त्यांच्या गांवीं गेली.

मामांच्या कर्जाचा बराचसा भाग तिला देता आला असतां व त्याप्रमाणें तिनें आपल्या मामीला बोलूनही दाखविलें पण त्या स्वाभिमानी स्त्रीनें ती देणगी नाकारून तिनें स्थावर जंगम सर्व मालमत्ता विकून देणेंदारांचें पैसे देऊन टाकलें व विम्याच्या आलेल्या १०००० रुपयावर आपला गुजराणा काटकसरीनें करण्याचें तिनें ठरविलें.

मामीच्या या दुसऱ्या योजनेला मात्र प्रमिला देवीनें मुळींच सम्मती दिली नाहीं. त्या मुद्दाम किस्मतपुरची नोकरी सोडून मामींच्या गावाला येऊन राहिल्या व त्यांनीं आपल्या जवळ त्या दोघांना ठेवून घेतलें.

विनायकराव ४।५ महिन्यापूर्वींच वारल्यामुळें रमेशचें मन दुःखानें व्याप्त होणें सहजिक होतें.

रमेश यंदा बी. ए.च्या वर्गात असून तो या वर्षी उत्तम तऱ्हेनें पास होईल अशी सर्वांची खात्री होती.

---

* याबद्दलची सविस्तर हकीगत स्नेहबंधन कादंबरींत वाचण्यास मिळेल

# " रमेश सैन्यांत कां गेला " ३

रमेशनें त्या व्यापाऱ्याकडे चहाला जाण्याचें कबूल केलें होतें, त्याप्रमाणें २ तासांची परवानगी काढून तो तिकडे जाण्यास निघाला. लष्करी पोषाख काढून ठेवून त्यानें खाजगी पोषाख परिधान केला. जात्याच तो गोरा असल्यामुळें व चेहरा नेहमीच हंसतमुख व रुबाबदार असल्यामुळें त्याची कोणाही माणसावर ताबडतोब छाप पडत असे. कॅप्टन नारायणरावांची तर त्याच्यावर फारच मेहेरनजर होती. तो त्यांच्या घरचाच एक मनुष्य आहे असें सैन्यांतील सर्व लोक समजत असत.

कँपापासून त्या व्यापाऱ्याचें घर फार दूर नसल्यामुळें लवकरच तो इच्छित स्थळीं पोंहोचला. तो व्यापारी त्याची वाट पहातच होता. मोठ्या आदरानें तो रमेशला आंत घेऊन गेला.

बैठकीची खोली दोन खणीच होती पण विशेष तऱ्हेनें शृंगारलेली दिसत होती; तेथील प्रत्येक वस्तु तो निरखून पाहूं लागला ते पाहून तो व्यापारी हंसत म्हणाला, "सरदारसाहेब आमच्या मुलीनें ही खोलीची मांडणी केली आहे, मला ती फारच पसंत पडली आपल्यालाही ती पसंत पडलेली दिसते."

" यांत काय संशय " रमेश हंसत म्हणाला " तुमच्या मुलीला कलेची चांगलीच अभिरुची दिसते आहे, त्याशिवाय प्रत्येक जिन्नस योग्य जागीं आली नसती."

" तुमच्या स्तुतीनें मला फार आनंद झाला, ती मुलगी आहेच तशी

गुणी. हे टेबलावरचे रुमाल, खिडकीचे नकशीचे पडदे हें फोटोकाम सर्व तिनेंच केलें आहे."

"तर मग तुम्ही खरोखर पुण्यवान आहात, अशी मुलगी असायला पूर्वपुण्याई लागते. बरं तिचं सासर कुठें आहे?"

"साहेब तिचें अजून लग्न झालें नाहीं. आपल्या कृपेनें आम्ही दोघे-जण जिवानिशी व अब्रूनिशी बचावलों. आपले उपकार आजन्म फिटणार नाहींत. माझ्या मुलीनें आपल्याला शतशः प्रणाम सांगितले आहेत. येथील गोषापद्धतीमुळें तिला स्वतःला आपल्या समोर येतां येत नाहीं याबद्दल ती दिलगीर आहे. बरें, साहेब आपण हिंदू ना?" असला प्रश्न विचारल्याबद्दल माफ करा बिनदाढीचे मुसलमान व हिंदु यात फारसा फरक नसल्यामुळें मला हा प्रश्न करावा लागला."

"तुमचा प्रश्न अगदीं सरळ आहे मला त्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं, मी हिंदु असून ब्राह्मण म्हणजे इकडील भाषेंत "पंडीत" आहे. मला रमेश म्हणतात."

त्याचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन तो व्यापारी म्हणाला, "काय म्हणतां काय! आपण पंडीत! मोठी आनंदाची गोष्ट आहे, मीही पंडीत असल्यामुळे माझे घर पावन झाल्यासारखें मला वाटू लागलें आहे. सरदारसाहेब एक प्रश्न मी विचारूं कां?"

"हं बेलाशक विचारा, आपण इतकें मोकळेपणानें बोलत आहात तेव्हां मीहि तितक्याच मोकळेपणाने उत्तर देईन."

"आपण पडीत असून सैन्यात कसे?"

"प्रश्न ठीक विचारलात. मला सैन्यात येण्याला तसेंच कारण घडलें. मी बी. ए. च्या क्लासांत शिकत असतां त्याला थाबवून तो व्यापारी मधेंच म्हणाला, "काय म्हणतां काय! आपण बी. ए. च्या क्लासांत शिकत होता?"

"हो मी आतां बी. ए. झालों आहे."

"अत्यंत अभिनंदनीय गोष्ट आहे. बरें आपली हकीगत पुढें सांगा, मी ती ऐकायला अत्यंत उत्सुक झालों आहे."

दार किलकिलें करून आणखी कोणी तरी आपली गोष्ट ऐकत आहे असा रमेशला भास झाला पण गोष्टपद्धती असल्यामुळें तिकडे बघायची सोय नव्हती. मुलीची हकीगत सांगत असता या म्हाताऱ्यानें हा भलताच विषय काढल्याबद्दल त्याचा त्याला रागही आला होता. त्या मुलीचे वय काय ? ती काय शिकली आहे ? तिचे नांव काय ? तिचें स्वरूप कसें आहे वगैरेबद्दलची माहिती काढून घेण्याचें रमेशच्या मनात फार होतें पण आतां हा भलताच विषय निघाल्यामुळें नाइलाजानें त्याला आपली इच्छा दाबून ठेवावी लागली. तेथील सर्व फोटोकडे त्यानें एकदां दृष्टी फेकली होती पण त्यांत स्त्रीचा एकही फोटो नसल्यामुळे तिच्या सौंदर्याबद्दल खरी कल्पना येणें शक्य नव्हतें. अशा तऱ्हेचे विचार मनांत आलेले बाजूला ठेवून तो पुढें म्हणाला " आमचे गांव महाराष्ट्रात आहे. माझे वडील एकाएकी वारल्या-वर मी, आई व माझी आतेबहीण प्रमिलादेवी असे एके ठिकाणीं रहात होतो. कॉलेजमधील वार्षिक खेळात मी बराच भाग घेत असे. सध्यां मी ज्या रेजिमेंटमध्यें आहे ती रेजिमेंट त्यावेळीं आमच्या गावीं होती. आमचे U. T. C. चे खेळ सुरू असता माझे नेमबाजीचें प्राविण्य पाहून तेथें त्या प्रसंगी हजर असलेले कॅप्टन नारायणराव फार खूष झाले. त्यांची मुलगी माझ्याच वर्गात होती. "

बोलता बोलतां रमेश एकदम थांबला; कॅप्टन्साहेबांच्या मुलीचा आपण उगीच उल्लेख केला असें त्याला वाटूं लागलें असें कां वाटलें हें मात्र त्याला सांगतां येणें शक्य नव्हतें, पण तसें वाटलें आणि त्यामुळेंच तो बोलतां बोलतां अडखळला.

तो थांबलेला पाहून तो व्यापारी म्हणाला " कॅप्टन् साहेबांच्या मुलीचें काय ? ती सुद्धां बी. ए. च्या क्लासांत होती ?"

" हो तीसुद्धां होती पण तिच्याबद्दल मला आतांच विशेष कांहीं सांगा-वयाचें नाहीं. कॅप्टन्साहेबांनीं माझे नेमबाजीचें कौशल्य पाहून मला चहाला घरीं बोलावून सांगितलें कीं, ' तुमच्या सारखी शिकलेली माणसें जर सैन्यांत येतील तर सैन्यांत काय झटपट सुधारणा होईल. तुम्ही माझ्या रेजिमेंटमध्यें आल्यास पहिल्या प्रथम मी रेजिमेंटल क्लार्क फर्स्ट ग्रेडची जागा देईन. व

पुढें लवकरच जमादार सुभेदार किंवा Kings Commissioned Officer करीन.' मी त्यावेळीं तें बोलणें थट्टेवारीच नेलें पण पुढें असा प्रसंग आला कीं मला आपणहून तिकडे जाण्याची इच्छा झाली."

"एवढें काय कारण झालें ?" त्या व्यापाऱ्यानें मध्येंच प्रश्न केला.

"माझी बी. ए. ची परीक्षा नुकतीच संपली होती व मी चार दिवस आनंदांत कुठे भटकावयाला जावें याचा विचार करीत होतों इतक्यांत एक दिवस आईला ताप आल्याचें निमित्त झालें. पहिल्या प्रथम तो ताप ३।४ दिवसांत बरा होईल असें वाटलें पण शेवटीं तो नवज्वरच ठरला व आमच्या पराकाष्ठेच्या उपायांची पर्वा न करतां माझी आई तापाच्या दहाव्या दिवशीं मला सोडून गेली. सर्व जग मला खायला येऊं लागलें. आतां जगायचें तरी कोणाकरितां ! असेही विचार मनांत आल्याशिवाय राहिले नाहींत. त्यावेळीं माझी आतेबहीण प्रमिलादेवी तेथें जाग्यावर होती म्हणून वैतागून माझ्या हातून कांहीं वाईट कृत्य झालें नाहीं. पंडीतजी, माझें आईवर अत्यंत प्रेम होतें. माझे प्राण देऊनही तिचें आयुष्य वाढवायला मी तयार होतो पण ईश्वरेच्छेपुढे कोणाचा उपाय चालणार ! हर हर ! अशा तऱ्हेनें आई निघून गेल्यामुळे या अफाट जगांत मी पोरका झालो. मातेची ती पुण्यमय मूर्ती मला पुन्हा दिसेल का हो !"

डोळे भरून व कंठ दाटून आल्यामुळें त्याला पुढें बोलवेना. दाराच्या आंतही कोणाला तरी हुंदका आल्याचा रमेशला स्पष्ट भास झाला. त्या व्यापाऱ्याचेही डोळे पाण्यानें भरून आले तो आपले डोळे पुशीत म्हणाला "मोठी हृदयद्रावक गोष्ट आहे. मुलाचें कौतुक करण्याचे वेळीं आईनें निघून जावें ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. बरें पुढें काय झालें ?"

रमेशनें आपलें मन घट्ट केलें, तो पुढें म्हणाला "मला घरांत बिल्कूल चैन पडेना माझें मन कशांतही रमेना. कॅप्टन् नारायणरावांची रेजिमेंटही त्यावेळीं तेथून कोहटला गेली होती. शेवटीं मी मनाचा हिय्या करून कॅप्टन्साहेबांना मी येऊं का म्हणून पत्र लिहिलें. त्याबरोबर त्यांचे तारेनेंच ताबडतोब निघून येण्याबद्दल उत्तर आलें. सर्व गोष्टींचा विचार करून माझ्या आतेबहिणीला न विचारतांच निघून जाण्याचें ठरविलें; कारण तिचें

परवानगी मिळणार नाहीं याबद्दल खात्री होती. शेवटीं कायमचा निश्चय करून व प्रमिलाताईला एक पत्र लिहून ठेवून मी घर सोडलें व सैन्यांत दाखल झालों. त्यावेळीं मी बी. ए. पास झाल्याचीही तार आली होती. कॅप्टनसाहेबांनीं आधीं सर्व तयारी केली असल्यामुळें मला सैन्यांत प्रवेश मिळण्यास फारसा त्रास पडला नाहीं. मला एकदम वरची ग्रेड मिळाल्यामुळें खालचे लोक कांहीं दिवस कुरकुरले पण त्याची समजूत काढण्यास मला फार दिवस लागले नाहींत. माझ्या माहितीचा त्याना फार उपयोग होऊं लागल्यामुळें ते उलटे माझ्यावर फार खूष होते. अशा रीतीने एक वर्ष कोहटला काढले नंतर कॅंपींगकरता आमची रेजिमेंट बन्नूला आली. येथील मुक्कामात झालेला प्रकार तुमच्या जन्माच्या आठवणीचा झाला आहे."

"यात काय संशय! आपला परिचयही मी जन्मभर विसरणार नाहीं."

"आजच्या गोष्टी जन्मभर न विसरण्यासारख्याच झाल्या आहेत, तेव्हां कोणीही कोणाला विसरणें शक्य नाहीं. बरं पण तुमच्याबद्दलची मला कांहींच माहिती नाहीं तरी ती द्यावी म्हणजे ओळख दृढ होण्याला ठीक पडेल."

"माझं नाव पंडीत वीणाशंकर. सध्या मी, माझी बायको व मुलगी यासह येथें असतो. आज सकाळीं बायको दूध आणण्याकरता बाहेर गेली होती म्हणून बचावली. सबंध बन्नु गावात माझेंच दुकान मोठें असल्यामुळें माझ्याच दुकानावर त्या दरवडेखोरांचा डोळा असणें साहजिकच होतें. असल्या कामात गावांतील लोकही बरेच फितुर असतात, त्यामुळें या लोकांना, माणसें, घरें, नेमकीं सापडतात. मला बंदुकीचा लायसेन्स आहे पण त्या चोरानीं अचानक हल्ला केल्यामुळें माझी बंदूक माझ्या उपयोगी पडण्याच्या ऐवजी ती त्याच्या हातात जाऊन त्याना फायदेशीर झाली."

त्याचें बोलणें एकदम थाबलें. कारण सैन्यातला एक शिपायी धांवतच इकडे येत होता. त्या मुलींचें नाव किंवा तिच्याबद्दलची माहिती ऐकण्याची उत्कंठा त्याला पुन्हा दाबून ठेवावी लागली. तो पुढें होऊन त्या शिपायानें आणलेली बातमी ऐकूं लागला.

शिपायानें लष्करी सलाम करून रमेशला सांगितलें कीं, कॅप्टन साहेबांनीं त्याला ताबडतोब बोलावलें आहे रेजिमेंट अर्ध्या तासाच्या आंत हलणार आहे. 'पधरा मिनिटांच्या आत येतोच ' म्हणून निरोप देऊन त्यानें त्या शिपायाला परत पाठविला.

आता स्वस्थपणें बोलणेंच शक्य नव्हतें. पंडीत वीणा शंकरनें झटपट आंत फराळाची व्यवस्था केली.

पंजाबी पद्धतीप्रमाणें फराळाची व्यवस्था टेबलावरच केली होती. रमेश कोट व टोपी काढून व हात धुवून पंडीत वीणाशंकरबरोबर फराळाच्य, जागीं गेला. पांच मिनिटांतच त्यानें आपला फराळ आटोपला, कारण जास्त वेळ या कामात खर्च करणें त्याला शक्य नव्हतें.

त्याला हवी असलेली त्या मुलीबद्दलची माहिती मात्र त्याला शेवटपर्यंत काढून घेतां आली नाहीं.

जातेवेळीं फूल नाहीं फुलाची पाकळी म्हणून १०० रुपयांची एक नोट पंडीत वीणाशंकरनें त्यांच्या हातांत ठेवण्याचा प्रयत्न केला पण ती घेण्याचे अभिमानपूर्वक नाकारून तो म्हणाला " पंडीतजी, मी केलीली गोष्ट बक्षिसाकरतां केली नाहीं तुम्ही मला प्रेमानें बोलावलेंत, यांत मला सर्व कांहीं पावलें आहे.

" साहेब, मी गरीब आहे, आपण सुविद्य आहांत, माझ्याकडून व्हावा तितका आपला सन्मान झाला नसेल तर त्याबद्दल माफी करा व मी अल्पस्वल्प दिलेल्या देणगीचा स्वीकार करा. "

" पंडितजी, आपला कांहींतरी गैरसमज होतो आहे. माझ्या अपेक्षेपेक्षांही माझा जास्त सन्मान झाला आहे. या बाबतींत तुम्हाला वाईट वाटण्याचें कांहींच कारण नाहीं, आतां पैशासंबंधीं म्हणाल तर माझा नाइलाज आहे; आजपर्यंतच्या आयुष्यांत अशा तऱ्हेची देणगी मी घेतली नाहीं व पुढें घेईन असेंही वाटत नाहीं. पंजाबांत अशा तऱ्हेची पद्धत आहे हें मला माहीत आहे पण मी महाराष्ट्रीय आहे पंजाबी नाहीं यापेक्षां जास्त काय सांगूं ? "

" आपण इतकें बोलल्यावर मी काय सांगणार! निदान शिपायी लोकांना देण्याकरितां तरी हे पैसे घेऊन जा. "

" शिपायी लोकांना हवे असल्यास घेतील पण ते पैसे तुम्ही स्वतः येऊन कॅप्टन् साहेबांना द्यावेत म्हणजे ते योग्य ती व्यवस्था करतील. माझें ऐकाल तर तुम्ही या भानगडींत न पडलेलें बरें. माझ्याबरोबर असलेल्या प्रत्येक शिपायाला बक्षीस देण्याचें आश्वासन कॅप्टन् साहेबांनीं दिलें आहे व ते आपला शब्द खात्रीनें खरा करतील! आतां तुम्हांला हे पैसे खर्चच करायचे असेल तर आज झाले अशा प्रकारचे अत्याचार न होतील अशा प्रकारची योजना काढून त्या प्रीत्यर्थ हे पैसे खर्च करा. येथील गरीब लोक त्याबद्दल दुवा देतील. "

" आपलें म्हणणें योग्य दिसतें; आपल्या म्हणण्याप्रमाणेंच व्यवस्था करण्याचें मी वचन देतो. "

" वचनाची कांहीं जरूरी नाहीं, बरें आहे येतो. दया लोभ ठेवा; कोहटला आलात तर जरूर भेटा."

" हो, हो, जरूर भेटणारच; मला नेहमींच कोहटला यावें लागतें. कॅप्टन साहेबांना माझे सलाम सांगा; कोहटला येऊन सर्व शिपायी लोकांना भेटून जाण्याचा मी विचार करीत आहे. "

" ठीक आहे; या. मी सर्वांची ओळख करून देईन. कॅप्टन् साहेबांची मंडळीही तेथें आहेत. त्यामुळें सर्व मंडळींना बरोबर आणल्यास बायका मंडळींचीही ओळख होईल. "

" तुमची मंडळी कोठें आहेत.? "

" अद्याप मी जगांत एकटाच आहे. "

" असं. आतां ऑफिसर झाल्यावर लवकर लग्न करून टाका. "

" अद्याप त्याला बराच अवकाश आहे. " रमेशानें हंसत उत्तर दिलें.

वीणाशंकराच्या घरांतून बाहेर पडतांना त्यानें सहज मागें वळून पाहिलें त्यावेळीं कोणीतरी बुरखेवाली स्त्री दारांत उभी आहे असें त्याच्या लक्षांत आलें. रस्त्यानें जात असतां किती तरी वेळा त्याने कांहीं तरी निमित्तानें मागें वळून पाहिलें आणि प्रत्येक वेळीं ती स्त्री दारांत उभी असलेलीच

त्याला दिसली. त्या स्त्रीचा चेहरा पहावयाला सांपडला असता तर किती बरें झालें असतें असे विचार हजार वेळा त्याच्या मनांत आले. निदान तिचें नांव कळलें असतें तरी पुरे होतें असें त्याला वाटलें व ही गोष्ट वादविवादात मागे ठेवल्याबद्दल पंडीत वीणाशंकरचा त्याला फार रागही आला. आपण जिचा सोडविली तिचा चेहरा एकदा तरी पहाण्याचा आपल्याला अधिकार आहे असेही त्याला वाटल्याशिवाय राहिलें नाहीं, पण हे सर्व विचार तात्पुरतेच होते. भलत्याच गोष्टीचा विचार करणारा रमेश नव्हता. दारांतील स्त्री दिसेनाशी होताच रमेशानें आपलें मन आवरलें व झरझर पावलें उचलून पंधरा मिनिटांतच तो कॅम्पात हजर झाला.

कॅप्टन साहेब त्याची वाटच पहात होते. तो आल्याबरोबर ते म्हणाले, "काय बक्षीस आणलेस, त्या मुलीनें कांहीं बक्षीस दिलें कां ? ती चांगली शिकलेली आहे म्हणे."

"साहेब बक्षिसाच्या आशेनें मी गेलोच नव्हतो. ती बिचारी गरीब माणसें गोड बोलण्याशिवाय काय बक्षीस देणार !"

"काय गरीब !" कॅप्टनसाहेब हंसत म्हणाले 'अरे त्यांना गरीब म्हटल्यावर मग श्रीमंत कोण ! त्याचें घर झाडले तर ५–५० हजार रुपये सहज निघतील बरें. चल आपल्याला त्याबद्दल कांहीं कर्तव्य नाहीं. तूं आपली निघण्याची तयारी कर आणखी अर्ध्या तासांत निघायचें आहे."

आपल्या तंबूत जातां जातां "हे लोक खरेच इतके श्रीमंत असतील कां !" असा प्रश्न रमेशाच्या डोक्यांत सारखा येत होता पण त्याचें उत्तर त्याला कसे मिळणार !"

## शालिनीचा परिचय! ४

ठरल्या वेळीं प्रमिलादेवी व रमेश हे कॅप्टन नारायणरावाकडे चहाला निघाले. नेहमीपेक्षां आज रमेशनें विशेष आकर्षक पोषाख केला होता त्याकडे पहात किंचित हंसून प्रमिलादेवीने विचारलें " रमेश, आज तूं माणसांत आला आहेस असें वाटू लागले आहे. नाहीं तर काय तो तुझा ड्रेस! कधी केसाला तेल नाहीं कीं कधीं त्यावर हात फिरवणं नाहीं. डोक्याला टोपी असली नसली त्याबद्दल पर्वा नाहीं, कोटाच्या गुंड्यासुद्धां अजागळाप्रमाणें अर्धवट उघड्या पण आजचा तुझा पोषाख पाहून मला फार आनंद झाला आहे."

आपल्या कपड्याच्या झकपकपणाबद्दल रमेशलाही जाणीव होती त्यामुळें प्रमिलादेवींचें वाक्य ऐकून तो किंचित ओशाळला पण लगेच सांवरून म्हणाला "ताई, दुसऱ्याच्या घरीं जायच तर नीट व्यवस्थितपणें नको कां जायला! नाहीं तर लोक काय म्हणतील."

" पोषाखाच्या बाबतींत लोकांची आजपर्यंत तूं कधीं पर्वा केली आहेस म्हणा! तेव्हां मला वाटतं लोकांच्या पर्वेपेक्षां शालिनी काय म्हणेल याचीच तुला भीति वाटलेली दिसते. एखाद्या मुलीला दाखवायला न्यायची असली म्हणजे ज्याप्रमाणें ती नटूनथटून निघते त्याप्रमाणें तूं आज निघाला आहेस."

" ताई एखाद्याची फजिती करण्यांत तूं पटाईत आहेस; आज व्यवस्थित पोषाख करण्यामध्यें माझा कसलाच उद्देश नव्हता."

" तुला आपलं कबूल करायचं नसलं तर नको करूं पण माझ्यापासून किती दिवस लपवून ठेवशील ! आज सकाळीं दोघांचें बोलणें चालले असतां मी बारकाईनें पहात होतें. माझ्या तेव्हांच लक्षात आलें कीं इथे कांहींतरी पाणी मुरतें आहे. रमेश खरं खर सांग हं, शालिनीवर तुझें प्रेम आहे ना ?"

" ताई, तुझी कांहींतरीच समजूत झालेली दिसते. आतां येवढें मात्र खरें कीं तिच्याबद्दल मला आपलेपणा वाटतो व तीहि माझ्याशीं आपुलिकेच्या भावनेनें बोलते पण या पलीकडे आम्ही दोघेही अद्याप गेलों नाहीं."

" अरे प्रेमाची ही पहिली पायरी आहे."

" ताई तुला प्रेमाची बरीच माहिती दिसते. तूं आजन्म कुमारी रहाण्याची प्रतिज्ञा केली आहेस ना ?"

" हो माझी ही प्रतिज्ञा मी आजन्म पाळीनच पाळीन याबद्दल खात्री बाळग."

" ताई आतां ओघानेंच आले आहे म्हणून विचारतो हं, पण राग येऊं देऊं नकोस."

" नाहीं येणार राग काय हवें तें विचार."

" तूं किस्मतपुरात असतांना एका दरवडेखोर मुसलमानावर तुझें प्रेम होतें म्हणून येथें बोभाटा बराच झाला होता. आईसुद्धां बाबाच्याजवळ या बाबतींत कांहींतरी बोलतांना मी ओझरतें ऐकलें होतें. ताई ही बातमी खरी का ? "

प्रमिलादेवीचा चेहरा गंभीर झाला. एक क्षणभर विचार करून ती म्हणाली, "रमेश या बातमींत बरेंचसें तथ्य आहे; मात्र मी ज्यावर प्रेम करीत होते व आजही करीत आहे ते दरवडेखोर मुसलमान नसून सज्जन हिंदु आहेत, याबद्दलची हकीगत मी पुन्हां केव्हां तरी सांगेन."

" मग तूं लग्न का करीत नाहींस ?"

" प्रेमाच्या बाबतींत दोघांकडूनही आडकाठी नव्हती; पण मी आईला लग्न न करण्याचें वचन दिलें असल्यामुळें मी आपला निर्धार जाहीर केला."

" एकूण तूं प्रेमापेक्षां कर्तव्य श्रेष्ठ मानतेस."

" यात काय संशय !"

" मग तुझ्यांत व अलीकडील कांहीं मुलींत फारच फरक दिसतो. त्यांना प्रेमापुढें आईबाप, जातगोत, धर्म कांहीं एक दिसत नाहीं."

" ज्यानीं अशा तऱ्हेचीं आईबाप आप्तस्वकीयाना यातना देऊन लग्नें केलीं आहेत, त्या आपल्या लग्नानंतरची हकीगत जर ईश्वराला स्मरून व प्रामाणिकपणानें सांगतील तर सर्व जगावर केवढा तरी उपकार होईल. माझी खात्री आहे कीं त्या असें कबूल करतील कीं " या लग्नामुळें आपण स्वर्गीय आनंद भोगू, आपणासारखें 'सुखी जोडपें या जगांत सांपडणार नाहीं" वगैरे बांधलेले काव्यमय हवेतील मनोरे वर्ष सहा महिन्याच्या आत जमीन-दोस्त झालेले आहेत इतकेंच नाहीं तर कांहीं स्त्रियांना या लग्नाबद्दल पश्चात्ताप करण्याची पाळी येऊन काहींनीं घटस्फोटही मिळविला आहे. माझं म्हणणं येवढंच कीं प्रेमाबरोबर कर्तव्याची जाणीव असली तर असले विजोड विवाह होणार नाहींत "

" तुझे विचार अलीकडील बेताल मुलींना कसे काय आवडतील तें आवडोत. या विषयावर मला पुष्कळ बोलावयाचे आहे. पण आतां नको. कारण तो पहा कॅप्टन् साहेबाचा बंगला दिसूं लागला."

"बरं आहे या बाबतींत आपण पुन्हा केव्हा तरी बोलूं आणि त्यावेळीं आई-बाप किंवा पालक यांच्या संमतीनें झालेल्या लग्नापेक्षा या स्त्रिया ज्यास्त सुखी किंवा आनंदी नसतात हें मी सप्रमाण सिद्ध करून देईन."

" तुमचे हे विचार मला पुढील आयुष्यांत खास मार्गदर्शक होतील. अरे रामा, मोटार त्या पुढल्या बंगल्यापुढें उभी कर."

शालिनी बंगल्याच्या फाटकापाशीच उभी होती. मोटार थांबतांच ती धांवतच पुढें आली. कॅप्टन नारायणरावही त्यांचें स्वागत करायला दारांत उभे होते.

कॅप्टन् साहेबांच्या बंगल्याचा दिवाणखाना चांगलाच प्रशस्त होता. मध्यावर एक सुंदर वाटोळें मेज ठेवलें असून त्याभोंवतीं ५।६ खुर्च्या ठेवल्या होत्या. कॅप्टन साहेबांनीं त्या दोघांशीं हस्तांदोलन करून आद-

रानें त्यांना त्या वाटोळ्या मेजाजवळच्या खुर्चीवर बसविलें. तेथील सर्व थाट युरोपियन पद्धतीचा होता. थोडें औपचारिक भाषण झाल्यावर कॅप्टन् नारायणराव म्हणाले "आम्हाला नेहमीं युरोपियन लोकामध्ये वावरावें लागत असल्यामळें व कधीं कधीं त्या लोकाना घरीं चहालाही बोलवावें लागत असल्यामुळें आमची राहणी युरोपिअन पद्धतीची बनून गेली आहे. नाहींतर मला मनापासून हे आवडतेंच असे नाहीं. वर्षांतून एकदा रजेवर आमच्या इनामगावीं गेलों म्हणजे मला किती तरी मोकळें मोकळें वाटतें."

"तुमचे इनामगांव कुठें आहे?" प्रमिला देवीनें कांहींतरी विचारायचें म्हणून प्रश्न केला.

"दक्षिण हैद्राबाद संस्थानांत आहे."

"अस्सें. एवढे इनामदार असून मग लष्करांत कां शिरलांत?"

"केवळ हौसेखातर शिरलो पण आज युरोपियन लोकांच्या बरोबरीनें वागत आहे. माझ्या हाताखालींसुद्धा सध्या काहीं युरोपियन आहेत."

"मोठी अभिनंदनीय गोष्ट आहे. युरोपियन लोकांइतके आम्ही कर्तबगार आहोत हें तुम्ही उत्तम तऱ्हेनें सिद्ध केलें आहेत. नारायणरावाची पत्नी यावेळीं तेथे आली ती प्रमिलादेवीच्या शेजारच्याच खुर्चीवर बसली. तेव्हा सहाजिकच दुसरे काहीं तरी संभाषण सुरू झाले त्याचा फायदा घेऊन शालिनी म्हणाली "आई, रमेशना आपला बगला दाखवून आणते.' आईनें 'बरं जा' म्हणतांच शालिनी त्याला घेऊन त्या दिवाणखान्याच्या बाहेर पडली, रमेशबरोबर एकटेच हिंडायला सांपडल्यामुळें तिला मनापासून आनंद झालेला दिसत होता. सर्व खोल्या दाखविणें झाल्यावर ती मागील दारीं बागेंत गेलीं. जवळपास कोणी नाहीं असें पाहून ती म्हणाली, "रमेश, मला तुमच्याशीं किती तरी बोलायचे आहे पण संधीच सांपडत नाहीं."

"मग आतां संधी आहे कीं, काय बोलायचें असेल तें बोला. "रमेशनें हंसत उत्तर दिलें.

"मी पुष्कळ बोलायचे ठरविलें होतें पण आतां कांहींच आठवत नाहीं. काय करूं माझा मलाच फार राग आला आहे बरें जाऊं दे. आज तुमचीं कामें पाहून मला कित्ती कित्ती आनंद झाला म्हणून सांगू."

" न सांगतांच मला तुमच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होता.'

" वा बरेच आहांत कीं, पण मनांतल्या आनंदाच्या मानानें चेहऱ्या-वरील आनंद कांहींच नव्हता."

" बरें माझा अजमास चुकला असं मी कबूल करतो."

" त्यावेळीं मी मनांत काय ठरवलें आहे हें सांगतां येईल कां!"

" माझे अभिनंदन करायचें व मला घरीं चहाला बोलवायचे, कां बरोबर ओळखलें कां नाहीं."

" अगदीं सपशेल चुकलांत. बायकांच्या मनाचा ठाव पुरुषांना इतक्या सहजासहजीं लागत नसतो म्हटलें."

" अगदीं खरे आहे. तुमच्या मनाचा ठाव मला नाहीं हें मला कबूल आहे तेव्हा त्यावेळीं तुमचा काय विचार होता हें तुम्ही स्वतःच सांगणें आतां क्रमप्राप्तच आहे."

मोगऱ्याच्या ताटव्यातील एक सुंदर फूल तोडतां तोडतां शालिनी म्हणाली, " एका सुंदर रेशमी रुमालावर वेलबुट्टी काढून त्यावर रेशमानीं मी माझें नांव घातलें आहे व तो माझा आवडता रुमाल मी तुम्हांला माझी आठवण म्हणून भेट देणार आहे. भेट अगदींच अल्प आहे. पण यापेक्षां ज्यास्त मी काय देऊं शकणार !"

" शालिनी, तुमच्या या रुमालाची किंमत लाखो रुपयापेक्षां ज्यास्त आहे. वस्तु कितीहि किंमतीची असली तरी ती देणाऱ्याच्या भावनेला किंमत आहे."

"मला किती बरें वाटलें म्हणून सांगू ! खरंच तुम्ही फारच गोड बोलतां, तुमच्याशीं नेहमीं बोलत बसावेसें वाटतें. बरें हा रुमाल घेतां ना ! इतक्यांत कुणी तरी आलें तर तो तसाच राहून जायचा. " बोलतां बोलतां शालि-नीनें पोलक्याच्या खिशांतून एक सुवासिक रेशमी रुमाल बाहेर काढला व रमेशच्या हातांत दिला. रमेशनें तो मोठ्या आनंदानें हातांत घेऊन उघडून पाहिला त्याबरोबर त्या रुमालांत एक गुलाबाचें नुकतेंच तोडलेलें फूल होतें. तें खालीं पडलें तें पाहून शालिनी म्हणाली " रमेश हे फूल मी स्वतः तुमच्या कोटाच्या बटनहोलमध्यें अडकवावें अशी माझी फार इच्छा होती

पण मी इतकी स्वतंत्र नाहीं हें लक्षांत येऊन तुम्ही तें स्वतःच घालाल ना!"

"हो हो जरूर" बटनहोलमध्यें फूल अडकवितां अडकवितां रमेश म्हणाला "आजचा प्रसंग व आजची भेट मी जन्मभर विसरणार नाहीं. मी• सुद्धां उलट कांहीं तरी द्यायला हवें होतें पण त्या तयारीनें मी आलों नाहीं याबद्दल फार वाईट वाटतें. मी कांहीं देत नाहीं म्हणून राग तर नाहीं ना येणार!"

"छे मुळींच नाहीं, तुमच्यासारखें मी एखादें शतकृत्य केलें म्हणजे मला बक्षीस द्या, म्हणजे मी त्याचा आनंदाने स्वीकार करीन."

"त्यावेळीं अगदीं जरूर देईन. बरें पण आतां आपण परत जाऊं या नाहींतर सर्व मंडळी आपण कुठें गेलो म्हणून शोधीत यायची" कोणी आपल्याला नावें ठेवील कां काय या धास्तीने रमेश वरचेवर मागें वळून पहात बोलत होता.

"थाबा हो, जाऊं की, मला अजून किती तरी सांगायचें आहे, हो बरी आठवण झाली, बाबांच्या रेजिमेंटची येथून कोहटला बदली झाली आहे व आम्ही आतां सर्व लवकरच तिकडे जाणार आहोंत. रमेश तुम्ही या ना तिकडे! तुम्ही आलात तर किती मौज होईल नाहीं! याल कां? बोला ना!"

"शालिनी, या बातमीनें आजच्या आनंदाचा विरस केला. तुम्ही येथून गेल्यावर मला चैन कसें पडेल!"

"आणि मला तरी पडेल कां! म्हणून म्हणते कीं तुम्ही कोहटला या. आणि दुसरी एक गोष्ट सांगायची म्हणजे बाबा लवकरच माझें एका इनामदारांशीं लग्न ठरविणार आहेत."

"शालिनी, शालिनी, या आनंदाच्या वेळीं असल्या गोष्टी ऐकून माझा आनंद पार मावळून गेला आहे. आपली ओळख झाली नसती तर बरें झालें असतें असें मला वाटूं लागलें आहे."

"रमेश तुमची जर अशी अवस्था झाली तर माझी काय वाट! मी काय करूं ते सांगा माझें मन गोंधळून गेलें आहे."

" शालिनी मी काय सांगू. "

इतक्यात कॅप्टन् नारायणरावांनी हांक ऐकून दोघेही एकदम दचकले. त्यांचे बोलणें तसेंच अर्धवट राहिले व झपाझप पावले उचलींत ते बंगल्या- कडे वळले.

ते दिवाणखान्यांत येऊन बसल्यावर प्रमिलादेवी म्हणाली.

" रमेश किती वेळचा बंगला पहात होता रे, मला वाटलें शालिनीताई इथल्या रेजिमेंटमधल्या सर्वच बंगल्यांना भेट देऊन येत आहे. "

" नाहीं ताई, बागेंतील झाडें कसकशी केव्हां लावलीं? फुलांचें गुणधर्म काय आहेत वगैरे बागेसंबंधी सर्व माहिती मला मिस् शालिनी देत होत्या. "

" मग सर्व माहिती मिळाली कां? "

" हो बहुतेक सर्व मिळाली; माझ्याकडून त्यांना कांहीं माहिती हवी होती ती मात्र तुमच्या बोलावण्यानें राहून गेली. "

" मग आतां सांगून टाक. "

" आतां नको पुन्हा केव्हा तरी सांगेन. "

" वा पुन्हा येण्याचें आमंत्रण लावतोस वाटते ! "

" खरेंच या " नारायणराव मध्येंच म्हणाले. " रमेश तुम्ही नेहमी आलात तर आम्हांला आनंद होईल. बाकी तुमची ओळख फार उशीरा झाली, कारण तुमची ओळख होते न होते तोंच आम्ही कोह- टला चाललों. "

" किती दिवसांत जाणार ! " रमेशनें प्रश्न केला.

" आठ दिवसांत. हो, तुमच्याबद्दल मला सांगायचें राहिलेच तुमची नेमबाजी फार वाखाणण्यासारखी आहे, तेव्हां तुमची इच्छा असली तर मी तुमची रेजिमेंटल क्लार्क म्हणून नेमणूक करूं शकेन व तेथून जमादार सुभे- दार होण्याला मुळींच अडचण पडणार नाहीं. "

" मी याबद्दल अद्याप कांहींच विचार केला नाहीं. " माझी बी. ए. ची परीक्षा झाल्यावर प्रमिलाताईच्या व आईच्या सम्मतीनें काय तें ठर- विणार आहे. "

" तुमच्याबद्दलची सर्व माहिती प्रमिलाताईनीं मला दिली आहे तेव्हां मला वाटतें तुम्ही रेजिमेंटमध्यें आल्यास तुमचा उर्जित काळ येण्यास फारसा वेळ लागणार नाहीं. "

" आपल्या सूचनेबद्दल मी अत्यंत आभारी आहे. मी या बाबतींत जरूर विचार करीन. " याच वेळीं रमेशच्या मनांत शालिनीचे शब्द गुणगुणत होते. " रमेश तुम्ही या ना तिकडे ! तुम्ही आलात तर किती मौज होईल नाहीं ! याल कां, बोला ना ? "

पुढें आलेल्या वाढणामुळें रमेशची तंद्री तेथेंच भंग पावली. हंसत खेळत फराळ झाल्यावर त्या सर्वांचा निरोप घेऊन व पुन्हां येण्याचें आश्वासन देऊन ते दोघेही मोटारींतून परत निघाले.

मोटार चालू झाल्यावर प्रमिलादेवी म्हणाली. " मग बागेंत काय ठरलें ! मुहूर्त केव्हा पहायचा ? "

" मुहूर्त कसचा न् काय कसचें तिचें लग्न सुद्धां ठरलें आहे. हे आई-बाप असे कसे कुणाला ठाऊक ! "

" अरे पण, तिच्या आईबापाना तिच्या मनाची कल्पना तरी यायला हवी ना ! आईबाप म्हणजे कांहीं अंतर्ज्ञानी नव्हेत ! तुझी इच्छा असली तर याबद्दलची जाणीव मी त्यांना देईन. "

" नको, सध्यां कांहींच नको पुढचें पुढें पाहूं. "

# " उषेला मयसभेंत येण्याबद्दल मागणी " ५

किस्मतपुरांत डॉ. श्रीकांत आपल्या बंगल्यांत कोणाची तरी मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात बसले होते. ती वेळ सकाळीं ७ वाजण्याची असून त्या दिवशीं बरींच थंडी पडली होती. त्यांचे स्नेही वसंतराव हे त्यांच्या घरीं पाहुणे म्हणुन आले असून तेही या वेळीं दिवाणखान्यांत बसले होते; इतक्यांत उषा चहाचे पेले व किटली घेऊन आंत आली.

पेल्यांत चहा ओतींत असता ती म्हणाली, " आज गाडीला उशीर झाला आहे कां काय कळत नाहीं ! ताई एव्हाना यायला हवी होती. ती येण्याची वाट पहाण्यांत चहा निवून जाईल तरी आतां हा घेऊन टाकावा ती आल्यावर मी पुन्हा करीन. "

" खरेंच वसंतराव, आपण घेऊन टाकूं या नाहींतर हा अगदींच गार होऊन जाईल. "

" बरें आहे तुमची दोघांची इच्छा असल्यावर मी तरी कशाला नको म्हणूं " बोलतां बोलतां वसंतरावाने पेला हातांत घेतला व त्यांतील चहा हळुहळु गार करीत तो पिऊं लागला. त्याची दृष्टी मधून मधून सारखी उषेकडे वळत होती. मग त्याला तिच्या चेहऱ्यावरून काय काढायचे होते कोणास ठाऊक ! उषा मात्र खिडकीकडे लक्ष देऊन मोटारची वाट पहात होती पण तिची इच्छित मोटार अद्य प तिला दिसेना. "

वसंतरावांचा चेहरा चांगलाच रुबाबदार असून नाक सरळ व डोळे अत्यंत भेदक असे होते. त्या डोळ्यांत थोडे मार्दव असते तर तें पाणी॰

दार म्हणायला हरकत नव्हती. डोक्यावरचे केस बरेच वाढविले असल्यामुळें तो कोठल्या तरी सिनेमांत काम करीत असावा असें चटकन् लक्षांत येई.

डॉक्टर श्रीकांतानें अद्याप चहा घ्यायला सुरवात केली नव्हती. तो उषेला म्हणाला, " तूं कां घेत नाहींस ! तूंही पिऊन टाक. "

" मला आतांच नको, मी चहाही दोनच कप केला आहे. ताई आल्यावर, ताई नी मी बरोबरच घेऊं. "

" मग आम्हांला तरी एवढ्या घाईनें कशाला केलास, आम्हीही नंतरच घेतला असता. "

" आपण दोघेच असतो तर मी खरेंच चहा आधीं केला नसता पण आज आपल्या घरीं पाहुणे आहेत तेव्हां त्यांची व्यवस्था नीट नको कां व्हायला. "

" भले शाबास, " वसंतराव हंसत म्हणाला " शेवटीं हे चहाप्रकरण माझ्याच अंगलट आलें म्हणायचें ! पण आतां काय उपयोग ! मी चहा जवळ जवळ पिऊन टाकला आहे, नाहीं तर मीसुद्धां प्रमिलाताईकरतां स्तास थांबलो असतो."

" वसंतराव तुम्ही आतां घेतलाच आहे पण मी जरा थांबतो; त्या बहुतेक इतक्यांत येतील. "

" अहो त्या इतक्यांत आल्या तर त्याच्याबरोबर पुन्हां घेऊं."

" नको मी थांबतोच. अलीकडे मी दोनदां चहा कधींच घेत नाहीं. "

" तुम्ही प्रमिला देवींना बरेंच भिताहो. "

" यांत भिण्याचा काय प्रश्न आहे. मला आपलें घेऊं नये असें वाटलें इतकेंच."

" अहो तुम्हांला कांहीं यांतलें माहीत नाहीं. " उषा हंसत म्हणाली. सिला न भिणारा पुरुष क्वचितच आढळेल. आतांपर्यंत यांनीं केलेल्या चुक्याबद्दल चारदा माफी मागितली आहे."

" अहं, हें काय ! " श्रीकांत उसना रागाचा आव आणून म्हणाला,

" प्रत्यक्ष नवऱ्याची निंदा करतेस ! आणि ती दुसऱ्याजवळ ! कुठें हें पाप फेडशील. "

" शांतं पापं " कानावर हात ठेवीत उषा म्हणाली " पतिव्रता धर्म मी विसरलेच कीं, पण आतां ताईच* इथं आल्यावर यांच्यासमक्ष ती निंदा करील ती चालेल वाटतं. "

" तिनें केली तरी हरकत नहीं पण तूं करता उपयोगी नाहीं. "

" बरें आहे, वसंतराव, मी सांगितलेलें सर्व विसरून जा. तो चहा अगदीं निवला आहे. तेवढा घेऊन टाकावा. "

" नको मी मगच घेईन. "

त्यांच्या ओळखीच्या मोटारचा हॉर्न ऐकल्यामुळें श्रीकांत गडबडीनें उठून दरवाजाकडे निघाला. उषाही त्याचे मागोमाग गेली.

प्रमिलादेवीला दारांत पाहातांच अल्लड उषा धावत जाऊन " ताई ताई " करीत तिच्या गळ्यांत पडली. तिचा गळ्यांतला हात सोडवून प्रमिला म्हणाली, " उषा, तुझा अल्लड स्वभाव अजून जात नाहीं, थोडा तरी अंगीं भारदस्तपणा आण, घरात चल मला कपडे बदलूं दे. "

" तुझ्याशी मी न बोलण्याचा निश्चय केला आहे "

" वेडीच आहेस. तुला हें शक्य तरी आहे कां ! चल आपण घरांत जाऊं म्हणजे तुझी समजूत काढते, काय श्रीकांत, उषेला तुम्ही बरीच रुसवलेली दिसते. तिची समजूत तुम्हालाच काढायला हवी; अगबाई हे कोण ! मिस्टर वसंतराव तुम्ही कां ! Very glad to see you (तुम्हाला पाहून फार आनंद झाला ) पण यावेळीं तुम्ही इकडे कसे ? "

प्रमिलादेवीशीं हस्तांदोलन केल्यावर वसंतराव म्हणाला " डॉक्टर

---

*डॉक्टर श्रीकांतांच्या प्रमिला देवीबद्दलच्या काय भावना आहेत याबद्दलचें रहस्य जाणायचें असेल तर त्याकरतां त्यांचे पूर्वचरित्र पाहिलें पाहिजे व ते " स्नेहबंधन " कादंबरींत पूर्णपणें दिलेलें आहे. याला आणखीही कांहीं कारणें आहेत पण तीं आताच न सांगतां वाचकांना हळु हळु कळतीलच.

श्रीकांतांच्याकडे थोडें काम होतें त्याकरतां आलों आहे. आपल्या भेटीला एक वर्ष झालें नाहीं ! "

" हो झालेंच म्हणायचें. बरा थांबा मी २ मिनिटांत आलेंच. माझें मुखमार्जन वगैरे सर्व झालेलें आहे त्यामुळेंच वरीं यायला थोडा वेळ लागला. हेतु हा कीं आल्याबरोबर चहा घ्यायला बरा; त्याकरतां तुम्हाला खोळंबायला नको. मी प्रवासाचे कपडे बदलून आलेच."

चहाचें नाव काढतांच उषेला हंसू आलें व तिनें हळूच श्रीकांताकडे पाहिले. त्याचा चेहरा मात्र गंभीर दिसत होता.

पांच मिनिटांतच सर्व मंडळी पुन्हां दिवाणखान्यांत जमली. उषेनें झटकन् चौघांचा चहा पुन्हा आणला. चहा घेता घेता उषा म्हणाली " ताई आज एका माणसाची काय पण फजिती झाली आहे अठाला लावलेला पेला कशाला तरी घाबरून खालीं ठेवला गेला."

" नवऱ्याची निंदा ! पतिव्रता धर्म ! ! " श्रीकांत गंभीर चेहरा करून म्हणाला.

" खरेंच मी सारखी सारखी विसरतेच कीं, ताई मी आतां जें कांहीं सांगितलें तें विसरून जा."

" अग पण ही काय भानगड ? नवऱ्याची निंदा कसली ! "

" आतां माझ्या तोंडाला कुलूप आहे " तोंडावर हात ठेवून उषा म्हणाली

" मी सांगतो काय आहे तें " वसंतराव मध्येंच म्हणाला " डॉक्टर माझ्याबरोबर चहा घेणार होते पण तुमचें नांव निघतांच त्यांनीं तो चहा कांहीं घेतला नाहीं. तसाच्या तसा पेला खालीं ठेवला."

" होय श्रीकांत ? "

" त्यांच्या बोलण्याकडे तुम्ही मुळींच लक्ष देऊं नका ते कांहीं तरी बडबडतील झालें."

आपल्या आधी श्रीकांतानीं चहा घेतला नाहीं याबद्दल तिची खात्री झाली आणि कां कुणास ठाऊक तिला ती बातमी ऐकून मनापासून आनंद झाला. या आनंदाचें कारण तिचे तिलाही नीट सांगता आलें

नसतें. वसंतरावाच्या भेदक दृष्टीतून मात्र तिची ही हृदयभावना लपली गेली नाहीं. विषय बदलण्याच्या उद्देशानें ती म्हणाली " बरें तें जाऊं द्या त्याबद्दल आपण नंतर विचार करूं.मला कशाबद्दल तार करून बोलावलेत ! इतकें जरुरीचें येवढें काय काम निघालें आहे ? "

" काम तसेंच फार महत्वाचे होतें म्हणून तर तार केली. "

" मग सांगा पाहूं काय ते. "

" आपल्या बहिणीलाच विचारा तीच सांगेल. "

" मी कशाला ! आपण स्वतःच सांगितलेली बरी. मी माझ्या मता-प्रमाणें ताईला ती गोष्ट समजाऊन सांगितली आणि तिनें माझ्यासारखें मत दिले म्हणजे नसती पंचाईत व्हायची. "

" कमाल आहे दोघांच्या पुढें ! आतां मीच ती हकीगत सांगतो " वसंतरावांनीं खुर्ची पुढें ओढून बोलण्यास सुरवात केली, तो पुढें म्हणाला,

" प्रमिलादेवी, तुम्ही सिनेमांत काम करावें म्हणून मी तुमच्याजवळ विनंती केली होती. कॉलेजमध्यें असतां तुमचीं कामें किती सफाईनें होत होतीं हे मी प्रत्यक्ष पाहिलें होतें म्हणून मी विचारण्याचें धाडस केलें पण तुमचा स्पष्ट नकार आल्यामुळें मी निराशेनें परत गेलो. आमच्या अरुण फिल्म कंपनीचे मालक अत्यंत उदार असून फार धाडशी आहेत. एक फिल्म निघाल्याबरोबर त्यांनीं एखादी सुंदर नटी शोधून काढण्याला माझी पुन्हां रवानगी केली. येथील जिमखान्यावर डॉक्टर श्रीकांतांची व माझी दाट ओळख झाली व त्यांच्या आग्रहावरून एक दिवस त्यांच्या घरीं चहाला गेलो त्यावेळीं उषाताई माझ्या पहाण्यांत आल्या. त्यांचें सौंदर्य खरोखर अवर्णनीय आहे. सिनेमाला तें अगदी योग्य असें आहे अशी माझी खात्री झाली. कांहीं दिवस मी तसेंच जाऊं दिले व जिमखान्यावर एक दिवस डॉक्टराना गाठून त्यांच्या जवळ माझा मनोदय व्यक्त केला, त्यावर ते हसून म्हणाले " माझी उषा, तुम्हाला फार भिते तिनें कमुली येवढी भीति घेतली आहे कुणास ठाऊक ! तुमच्या डोळ्यांची तिला फार भिति वाटते असें ती वारंवार म्हणत असते. तिनें असेंही मला निक्षून सांगितलें आहे कीं तुम्हांला आमच्या घरी आणूं नये. ' ही बातमी

मला अत्यंत अपमानास्पद वाटली व आमचें बोलणें थांबवून मी निघून जाणार होतो पण श्रीकांतानींच आग्रह करून मला घरीं नेलें व उषाताईंचा माझा परिचय करून दिला त्या दिवसापासून त्याची माझ्या डोळ्याबद्दलची भीति पुष्कळ कमी झाली आहे, मी घरीं येण्याचा उद्देश्य त्याना सांगितला त्यावेळीं त्यांनी याबद्दल साफ नकार दिला. स्त्रियाना किती स्वतंत्रपणें ठेवण्यांत येते, कामाशिवाय पुरुषांचा संबंध कसा बिलकूल येत नाहीं, मालकांची सर्वांवर कशी करडी नजर आहे, फिल्म उत्तम निघाल्यास तुमची जगांत केवढी कीर्ति होईल ! हें सर्व मी त्याना नीट समजाऊन सांगितलें पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यांनीं निक्षून सांगितलें कीं मीं संसारी स्त्री आहे, संसारांत राहून पतीवर अकृत्रिम प्रेम करून, अस... नारायणासारखा जोडा जगांत झाला नाहीं असेंच लोकाकडू घेण्याची माझी फार इच्छा आहे. पतीच्या दवाखान्याची जोपास... शरीरप्रकृतीसंबंधीं काळजी, पतीला हरकामांत मदत करून त्यां... असें नांव खरें करून दाखविण्याचीच फक्त या जगांत माझी इ... इतकें बोलल्यावर माझें बोलणें अर्थातच खुंटलें पण श्रीकांतांनीं काढिली कीं तुम्हाला बोलावून ...चें मत घ्यावें तुमचें मत काय मी त्यांना पूर्वींच सांगितलें होतें पण त्याचा आग्रह म्हणून मी ... तसदी दिली आहे."

"श्रीकांत माझें म्हणणें माहीत असतां मला कशाला बरें बोलाव..."

"पण माझी खात्री नाहीं. आधीं हिनें आपले मुद्दे पुढें मांडावेत व मी त्याला उत्तरें देईन."

"माझे मुद्दे काय आहेत हें मी पूर्वीं सांगितलेच आहेत तेव्हां आतां पुन्हां कशाला ! सिनेमांत काम करण्यांत फार धोका आहे असें माझें ठाम मत आहे !"

"त्याला आधार ?"

"त्याला आधार काय पुष्कळ मिळतील. केवळ सिनेमाकरतां म्हणून प्रसिद्ध होणारीं वर्तमानपत्रें पाहिलीं तर त्यांत अमक्या नटीची तमक्या नटा- वर, मालकावर किंवा दुसर कोणावर पोटगीची फिर्याद, विनयभंग केल्या-

बद्दल दावा, अपमान केल्याबद्दल अब्रुनुकसानी अशा हजारों तऱ्हेच्या बातम्या दिसून येतील. पण मला दुसऱ्या बातम्यांशी कांहीं वक्तव्य नाहीं. मी आपली जुन्या काळची स्त्री आहे, म्हणाना ! मला दुसऱ्यावर खोटें म्हणून सुद्धां पतीप्रमाणें प्रेम करतां येणार नाहीं."

"यांत तुमची चूक आहे. अलीकडे कलेकरतां कितीतरी स्त्रिया सिनेमांत येत आहेत व त्यांनीं अशा तऱ्हेचीं कामें केल्यावर त्यांना तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें अनुभव आल्याचें कधींही सांगितलें नाहीं." वसंतरावांनीं आपला मुद्दा पुढें मांडण्याकरतां जोरदार भाषण केलें.

"मी सांगते याला उत्तर." प्रमिला मध्येंच म्हणाली. त्यांच्यावर ...क लोकांची नजर तरी गेली नसेल किंवा त्या मोंदू तरी असल्या

...

... सिनेमा नटावर हा मोठाच व्यभिचाराचा आरोप करीत आहांत. म्हणणं काय कीं उत्तम स्वभावाचा नट असणें शक्य नाहीं." ...नटांची बाजू मांडण्याचा प्रयत्न करून म्हणाले.

...च नट वाईट आहेत असें मा... मुळींच म्हणणें नाहीं. माझ्या ... चांगलेच ओळखीचे आहेत व त्यांच्या चारित्र्याबद्दल माझी पूर्ण ... आहे पण असे लोक अद्याप तरी अपवादात्मक आहेत, बरं, एक ...र्व नट चांगले आहेत असें धरून चालले तरी भावनेचा प्रश्न रहातोच. स्त्री पुरुष मेलेल्या भावनेनेंच कामें करतात असें म्हणायला मी तयार नाहीं. सिनेमा ही मयसभा आहे. ती आपल्या सौंदर्यानें लोकांना आकर्षित करते पण मयसभेप्रमाणें तेथें गेल्यावर प्रत्येकजण अडखळतो, फशी पडतो व कधीं कधीं नाशाही पावतो."

"अहो, त्यावेळीं सर्वांसमक्ष तीं कामें होत असतात. तसल्या प्रसंगीं कोणत्याही तऱ्हेच्या भावना उत्पन्न होत नाहींत हें मी स्वानुभवानें सांगतो."

"तुमचें म्हणणें मला कबूल आहे पण त्यावेळीं मेलेल्या भावना नंतर जरा वेळ एकांतपण मिळताच पुन्हां जिवंत होऊं पहातात त्याची काय वाट ! हा अनुभव एका प्रामाणिक नटीनें माझ्याजवळ कबूल केला आहे."

" म्हणजे तुमचें म्हणणें काय कीं चांगल्या घराण्यांतील कोणत्याही स्त्रीनें सिनेमांत भाग घेऊं नये. "

" अगदीं तसेंच केवळ नाहीं. पण जर एखादें हौशी जोडपें कलेच्याकरतां म्हणून सिनेमांत जाऊं लागलें तर त्या दोघांनींहि त्यांत कामें करावीत व होता होईलतों तीं नवराबायकोचीं असावीत. आम्हांला कांहींहि होत नाहीं असें म्हणणाऱ्या स्त्रिया अगदीं पराकोटीला तरी पोहोचल्या असल्या पाहिजेत किंवा भोंदू तरी असल्या पाहिजेत. निदान त्यांनीं नवनीतीचा तरी अवलंब केला असला पाहिजे. त्याशिवाय त्यांच्या तोंडून असलीं वाक्यें येणार नाहींत. "

" तुम्ही सिनेमा नटनटीवर फारच तुटून पडलेल्या दिसता पण तसें कांहीं एक नाहीं असें मी कालांतरानें सिद्ध करून देईन. आतां उषाताईच्या बाबतींत मन वगैरे बिथरण्याची काळजी वाटण्याचें कारण नाहीं. वाटलें तर श्रीकांतानीं तेथें रहावें. असें पुष्कळ लोक सध्यां तेथें रहात आहेत. "

" माझा बायकोवर विश्वास नाहीं असें म्हणण्यापैकींच हा प्रकार झाला. माझा बायकोवर पूर्ण विश्वास आहे व ती एकटी गेली तर माझी कांहींच हरकत नाहीं. तिनें आपल्या सौंदर्यानें व गायनाने पुढें यावें अशी माझी इच्छा आहे. स्वतः मला तशी कर्तबगारी नसल्यामुळे अमक्या नटीचा मी पति आहे यांतच भूषण मानून घ्यायला मी तयार आहे. "

" श्रीकांत तुम्हाला उषा नकोशी का झाली आहे ? " प्रमिलेनें वैतागून विचारलें.

" मला ती नको आहे असें यांत मी कांहींच दर्शविलें नाहीं. उलट माझ्या अर्धांगीनें जगापुढें येऊन नांव कमवावें अशी माझी इच्छा आहे. आतां ती जर म्हणत असेल कीं माझ्या मनावर माझा ताबा नाहीं तर मग माझें कांहींच म्हणणें नाहीं. "

" असं बोलवतं तरी कसं. हाच कां आतांपर्यंत माझा अनुभव आला, ताई, काय होईल तें होऊ दे मी या घटकेला सिनेमांत जाण्याचा निश्चय केला आहे. " उषा बोलताना थरथर कांपत होती.

" उषा, विचार कर, श्रीकांतानी चिडवलें म्हणून कांहींतरी बोलूं

नकोस. जगांत पुढें येण्याकरतां त्यांनीं काय काय कामें केलीं होती हें तुला माहीतच आहे. त्यांच्याप्रमाणें तूंही जगांत पुढें यावंस अशी त्यांची इच्छा आहे; मात्र तें सांगतात तो मार्ग चांगला आहे कां नाहीं हा वादाचा प्रश्न आहे. त्यांना प्रामाणिकपणें तो चांगला आहे असा वाटतो. पण तुला व मला तसा तो वाटत नाहीं त्याचें म्हणणें खोडून काढायला मला संधी दे."

" ताई त्यांची आज्ञा मला शिरसामान्य आहे. आपलेंही चुकत नसेल कशावरून ! त्यांच्या सुखाकरतां मी आपले प्राणदान करायला तयार आहे, पण येवढी साधी गोष्ट मला करतां येऊं नये ! त्यांचें सुख तेंच माझें सुख, त्यांचा आनंद तोच माझाही आनंद आहे. वसंतराव यांच्या आज्ञेप्रमाणें मी यायला तयार आहे."

" उषा, उषा विचार कर, भावनेला वश होऊं नकोस. पती जर चुकत असला तर त्याला सुधारणं हें आर्य स्त्रीचें कर्तव्य आहे. पति व्यसनी निघाला तर स्वतः काबाडकष्ट करून त्यांच्या चैनीला पैसे पुरवायचे दिवस आतां राहिले नाहींत. योग्य मार्गांनीं त्याला सुधारणें हेंच आर्यललनांचे अंतीम आहे. यांतच पातिव्रत्य आहे."

" ताई मला एकदां विषाची परीक्षा पाहूं दे. विष पचवितां आलें तर तुला अभिमानानें भेटायला येईनच नाहींतर हीच तुझी माझी शेवटची भेट."

" श्रीकांत आजच्या या घटनेला तुम्ही जबाबदार आहांत." प्रमिला संतापून म्हणाली.

" पण मी माझे शब्द परत घ्यायला तयार आहे."

" मलाही श्रिनेमांत यांनीं यावें असें म्हणण्याबद्दल पश्चात्ताप होतो आहे तरी त्याबद्दल दोघींनीही क्षमा करावी."

# " साम्यवाद " ६

मागील प्रकरणांत सांगितलेला प्रसंग तेवढ्यावरच थांबला. थोडावेळ इकडल्या तिकडल्या गप्पा मारून वसंतराव सध्याकाळीं येईन अशी सूचना देऊन निघून गेला. डॉक्टर श्रीकांतांनाही दवाखान्यांत जायचे असल्यामुळे ते प्रमिलादेवींची परवानगी घेऊन आपल्या उद्योगाला लागले.

त्यावेळीं अगदीं गंभीर वातावरण निर्माण झालें असल्यामुळे दिवाण-खान्यांत या दोघीच आतां राहिल्या होत्या. तरीपण बराच वेळ कोणीच बोललें नाहीं. दोघींहि आपआपल्या विचारांत गढून गेल्या होत्या.

जरा वेळानें प्रमिलेने आपली खुर्ची उषेजवळ नेली व तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन ती म्हणाली " उषा, इकडे बघ."

पाण्याच्या लोंढ्याला थोडावेळ बांध घालून नंतर तो बांध काढला असतां तो जसा खूप जोरानें उसळून बाहेर पडतो त्याप्रमाणें उषेची अवस्था झाली. इतका वेळ आवरून धरलेले अश्रू एकदम जोरानें बाहेर पडूं लागले. आपले डोके प्रमिलेच्या मांडीवर ठेवून ती ओक्साबोक्शी रडूं लागली. तिच्या अश्रूंनी प्रमिलेची मांडी भिजून गेली. थोडावेळ तसेंच रडूं दिल्यावर जवळ ओढून प्रमिलेनें तिला हृदयाशीं धरले. तिच्या दृष्टीला दृष्टी भिडवून ती म्हणाली " उषा, तुला रडायला काय झाले ! आणि तूं अलीकडे अशी वाळलीस कां ? "

उत्तर देण्याच्या ऐवजीं तिच्या खांद्यावर मान टाकून उषा पुन्हां रडूं लागली. प्रमिलेच्याहि डोळ्याला पाणी येऊ लागलें. मोठ्या कष्टाने ते दाबून ती म्हणाली " उषा, बोल ना तुला काय होतें आहे तें."

" ताई " उषा हुंदके देत म्हणाली " मला आज खूप रडावेसें वाटतें आहे. मला एकदां खूप रडूं दे म्हणजे मला जरा हलकें वाटेल."

" आतां रडणें पुरें, गेल्या वर्षांत काय काय गोष्टी झाल्या तें सांग पाहूं हूं रडणें अगदीं बंद कर."

" ताई तुला तुझी बहिण जिवंत हवी असेल तर तुला त्यांच्याशी लग्न केलें पाहिजे. जगांत तूंच एकटी त्यांना आनंदांत करूं शकशील. त्यांनीं आनंदांत रहावें म्हणून मी सर्व प्रयत्न करून पाहिले पण मला कशांतच यश येत नाहीं."

" श्रीकांतांचें तुझ्यावर प्रेम नाहीं कां ? "

" प्रेम नाहीं असें कसें होईल! त्यांचें माझ्यावर खरोखरच अतिशय प्रेम आहे. मी मागेन ती वस्तु व वाटेल ते लाड ते पुरवितात."

" मग आतां अडलें कोठें ? "

" त्यांचें माझ्यावर इतकें जरी प्रेम आहे तरी ते आनंदी नाहींत असें मला वाटतें. मी माझ्या प्रेमानें त्यांना आनंदांत करीन हा माझा अभिमान पार नाहींसा झाला आहे."

" पण आनंदी नसायला कारण तरी काय! पूर्व पुण्याईमुळेंच त्यांना तुझ्यासारखी बायको मिळाली आहे."

" मी या बाबतींत पुष्कळ विचार करून पाहिला पण याचा मला उलगडा झाला नाहीं. एकदा मी त्यांनाही ही शंका विचारली त्यावेळीं त्यांनीं ही गोष्ट हंसण्यावारीच नेली. अलीकडे त्यांना दवाखान्याचें कामही पुष्कळ असतें त्यामुळें आमची स्वस्थपणें अशी गांठ क्वचितच पडते. सासूबाईहि सध्या खामगावाला गेल्यामुळें मी जवळजवळ एकटीच घरात वेड्यासारखी बसून असतें."

" आणि गुलाब कुठें आहे! त्याच्या वर्तमाबद्दल एकदोनदां तूं पत्रांत लिहिलें होतेस आता तो कुठें आहे! "

"कॉलेजमधल्या एका मुलीबरोबर बहुतेक तो नेहमीं हिंडत असतो. तो दोघेहि Comrades ( भाई ) झाले असल्यामुळें त्यांना चारी दिशा मोकळ्या आहेत."

" इतक्या थराला गोष्टी आल्या कां ! त्याची माझी गांठ पडली तर बरें होईल; पाहू या तरी तो काय म्हणतो तें."

" त्याची यायची वेळ झालीच आहे तो बहुतेक रोज त्या मुलीलाही घेऊन येत असतो."

" श्रीकांतांना हे पसंत पडतें कां ? "

" तो माझा भाऊ म्हणून ते इकडे मुळींच लक्ष देत नाहींत. मी त्यांना एक दोनदा या बाबतींत बोलले होते त्यावेळीं ते म्हणाले 'भाई' होणे ही कांहीं वाईट गोष्ट नाहीं पण त्याला त्यांनीं तत्वें कळलीं आहेत कां हें विचार, तो तुझा भाऊ आहे, तेव्हां माझ्यापेक्षां तुझेंच त्याच्यावर जास्त वजन पडेल."

" मग गुलाबला तूं याबद्दल विचारलेस कां ! "

" हो विचारलें; या गोष्टीचें नाव काढतांच तो मार्क्स कां काय, लेनिन स्टॅलिन वगैरे पुढाऱ्यांचीं नांवें जोरजोरानें घेत असतो पण मला त्याच्या भाषणातील कांहींएक कळत नाहीं; त्यामुळें त्याला या बाबतींत विचारण्याचा नाद मी सोडून दिला आहे."

" वा, गुलाब बराच तयार झालेला दिसतो. तो आला म्हणजे मी त्याला या बाबतींत चांगलाच छेडते."

" तो तुलासुद्धा बोलून गार करील कां नाहीं तें पहा. हे सर्व भाई लोक इतके फाडफाड बोलायला कुठे शिकतात कोणास ठाऊक ! "

" बरं ते असूं दे मग माझे म्हणणें ऐकणार ना ! "

" कसलें ? "

" त्यांच्याशीं लग्न लावण्याचें. तुझ्यावर त्यांच खरं खरं प्रेम आहे व तूं त्यांना नेहमीं आनंदांत ठेवशील अशी माझी खात्री आहे मग कबूल ना ! "

" उषा, तूं अगदीं वेडी आहेस. माझा कृतसंकल्प तुला माहीत नाहीं कां ! विषयसुखाच्या लालसेनें मी आपलें कर्तव्यकर्म कसें सोडूं ? "

" सध्याच्या काळात कर्तव्यापेक्षा प्रेम श्रेष्ठ आहे हें तूं विसरलीस वाटतें. कोणतीहि कादंबरी, कोणतीही लघुकथा उघडून पहा त्यांत " प्रेम श्रेष्ठ " हेंच कंठरवानें प्रतिपादन केलेलें तुला आढळेल. " " मनुष्य स्वभावाची ज्यांना

पूर्ण कल्पना नाहीं व जे पैशाच्या मागें लागले आहेत असे दरिद्री ग्रंथकार अशा तऱ्हेची आपली बुद्धी विकत देऊन लिहिणार. पूर्ण विचारांअंती कर्तव्यच श्रेष्ठ ठरेल. कर्तव्याकरिता आत्मार्पण केलेली अशी कितीतरी उदाहरणें आपल्या आर्यावर्तात सांपडतील. त्याच्या उलट कर्तव्यच्युत होऊन प्रेमानें बेहोष झालेलीही उदाहरणें सांपडतील. पण त्या सुखांत चिरस्थाइत्व नसतें. आता लांब कशाला तुझच उदाहरण घेऊ. लग्नाचें वेळीं तुम्ही दोघेही किती आनंदांत होतात पण एकदा पहिला भर ओसरल्यावर तुमच्यांत व इतर कुटुंबियात कांहींच फरक राहिला नाहीं. नवऱ्यांनीं नोकरी करून पैसा आणावा, बायकोनें संसार करावा, अंगावर दागिने घालून नवऱ्याबरोबर चारचौघांत मिरवावें हेंच ध्येय सर्वांचे सारखें रहातें व एखाद्या यंत्राप्रमाणें रोजचे सर्व व्यवहार सुरू असतात. अशिक्षित, शिक्षित, सुशिक्षित किंवा अतिशिक्षित जोडप्यांची एकाच तऱ्हेची संसारयात्रा सुरू असते."

"मग तुझें म्हणणे तरी काय! माझे लग्न तुला पसंत नव्हतं!"

"तुझं लग्न सर्वांच्याच पसंतीनं ठरलं आहे तेव्हां त्यांत नांवें ठेवायला जागा नाहीं पण इतकें चांगले लग्न होऊनही तुम्ही सुखी होऊं शकत नाहीं तेव्हां मला सांगायचें एवढेंच कीं, आईबापांना किंवा पालकांना दुखवून आपल्या कर्तव्याला विसरून एकाद्या बरोबर खोट्या प्रेमानें लग्न लावणारा असा अलीकडे एक पथ निघूं पहातो आहे व त्याचे "प्रेम श्रेष्ठ" या शीर्षकाखालीं कांहीं वर्तमानपत्रकार अभिनंदन करीत आहेत हें निंद्य आहे. गुलाबला मी हेंच सांगणार आहे. अशा लग्नांत जास्त सुख असतें असें म्हणणें हा नुसता भ्रम आहे."

"ताई हा कधींही न संपणारा वाद बंद कर व यांतून कांहींतरी तोड काढ."

"मी आज संध्याकाळीं श्रीकांतांची गांठ घेईन म्हणजे काय तें कळेल."

"हा पहा गुलाब आलाच, बरोबर ती मुलगीही आहे."

"या, भाई लोक या, very glad to see you" प्रमिला हंसत म्हणाली." कुठें दौरा निघाला आहे!"

त्या दोघांनी प्रमिलेशीं हस्तांदोलन केलें. नंतर गुलाब म्हणाला, "आज तुम्ही येणार म्हणून कळलें तेव्हां या मिस् पद्माला घेऊन मुद्दाम इकडे आलो आहे. या आमच्या कॉलेजमध्यें माझ्याच वर्गांत आहेत."

"मिस् पद्मा, बसा त्या खुर्चीवर, गुलाब बैस. तुमचा कार्यक्रम ठीक चालला आहे ना ! तुमचा पुढील आयुष्यांत काय करावयाचा बेत ठरल आहे ?"

"सर्व देशांत जी विषमता माजली आहे तिचा नायनाट करायचा आम्ही ठरवलें आहे. ही विषमता व्यक्तीपूजेमुळे माजली आहे असें आमचं ठाम मत आहे म्हणून पहिल्या प्रथम ही मूर्तीपूजा धर्म बंद करण्याचे काम आम्ही आधीं हातांत घेतलें आहे."

"तुम्हाला वाटतें इतकी ही गोष्ट सोपी नाहीं. ज्या रशियांत धर्म नाहीं मूर्तीपूजा नाहीं असे म्हणतां तेथे काय चाललें आहे. तुम्हाला त्या उत्तर ध्रुवावर उड्डाण करून जाणाऱ्या वैमानिकाची गोष्ट माहीत आहे ना ! ज्या वेळीं रशियन लोकांनी त्या वैमानिकाचा सत्कार केला त्यावेळीं त्यानं आपल्याला इतके अलौकिक धैर्य कां उत्पन्न झाले याचे रहस्य सांगितले. तो म्हणाला 'माझ्या उड्डाणांत कित्येक प्रसंगीं भयंकर अडचणी निर्माण झाल्या पण मी गलितधैर्य कधींच झालों नाहीं; कारण माझ्या मागे 'कॉम्रेड स्टॅलिन' उभा आहे अशी माझी खात्री होती. उत्तर ध्रुवावरील कमाल गारठ्यानें आपलें प्राण गोठण्याची पाळी आली असता स्टॅलिन आपल्या पाठीमागें उभा आहे या कल्पनेच्या ऊबेने त्यांत चैतन्य निर्माण होईल असं हा वैमानिक कबूल करतो. मग आम्ही तरी काय म्हणतो. आम्ही स्टॅलिनच्या ऐवजीं आमचा पाठीराखा ईश्वर आहे असें म्हणू यांत फक्त नांवाचा फरक आहे भावना एकच. श्रीविष्णु–शंकर–येशु ख्रिस्त यांचे जागीं लेनिन स्टॅलिनची स्थापना झाली; मनुस्मृती बायबलच्याऐवजी लेनिनस्मृति आली. पूर्वीच्या धर्म प्रचाराच्या ऐवजीं आतां साम्यवादी धर्माचा प्रचार आला. थोडक्यांत सांगायचे म्हणजे यांत नांवाशिवाय कांहींएक फरक नाहीं. "बरें तें धर्माचे जाऊं द्या ! पण आपल्या देशांतील दारिद्र्यरोग मुळांतच नाहींसा करावयाला भांडवलशाही नष्ट करून नवी समाजरचना

अमलांत आणावयाला तर तुमची काहीं हरकत नाहीं ना? रशियानें या बाबतींत केवढें प्रचंड कार्य केलें आहे."

" कल्पनाचित्र मोठें रम्य आहे. ज्यांना रशियाची पूर्ण माहिती नाहीं किंवा ज्यांना हीं तत्त्वें नीटशीं कळलीं नाहींत असे साम्यवादी लोक अस-लेंच भडक चित्र श्रोत्यांच्यापुढे रेखाटतात व भाबडे लोक असल्या शाब्दिक सुधारणेला भाळून जाऊन साम्यवाद्यांच्या नादीं लागतात. दरिद्री मनुष्य जसा किमयागाराच्या नादीं लागतो किंवा दुःसाध्य रोगानें पछाडलेला इसम जसा वाटेल त्या वैदूचें औषध घेतो तशी जगांतली दुःखी दरिद्री व कनवाळू माणसें या क्रांतिवाद्यांच्या समतेच्या किमयेला भुलून त्यांच्या आहारी जातात, पण ही किमया खरोखरच सिद्धीस जाणार का ? असा प्रश्न विचार करूं लागतांच त्याची अशक्यता चहूंदिशीं कळून येते "

"हे तुमचें म्हणणें मुळींच पटण्यासारखें नाहीं.कृपे त सिद्ध करून द्या " मिस् पद्मा जोरानें म्हणाली.

" हें सिद्ध करणें अगदीं सोपें आहे. धनिक वर्गाच्या ताब्यांतली स्थावर व जंगम इस्टेट काढून घेऊन ती दरिद्री नारायणाला दिली जाईल असें आमिष मजूरवर्गाला दाखवून ती इस्टेट स्वतःच्या हातांत ठेवून सरकार स्वतः मात्र गबर झालें आहे. रशियांतला भांडवलवाला वर्ग मोडला पण त्याच्या जागीं रशियन सरकार हेंच एकटें भांडवलवालें सत्ताधारी झालें आणि सर्व प्रजा मजूरवर्गांत समाविष्ट झाली. पूर्वी भांडवलवाले जेवढे मजूर कामावर लावीत तेवढ्याच्या श्रमाचा गैरवाजवी फायदा ते घेत होते असें मानलें तरी भांडवलवाल्याच्या आहारी न जाणारा आणि स्वतंत्रपणें उद्योगधंदा करून आपलें पोट भरणारा स्वावलंबी असा अतिशय मोठा तिसरा वर्ग होता व त्याची तरी पिळवणूक भांडवलवाल्याकडून होत नसे; पण आता रशियन सरकार सर्वांनाच मजूर करून सर्वांचीच पिळवणूक करीत आहे. माझ्या आतां नुकतेंच वाचण्यांत आलें आहे कीं रशियांतही गुणप्रमाण पगाराची बेसुमार वाढ झाली असून भांडवलवाला नसला तरी श्रीमान् वर्ग मोठ्या प्रमाणांत उत्पन्न होत आहे व त्यानीं सर्व रशिया व्यापला असून हजारों मजूर नोकरवर्ग यांच्या हाताखालीं काम करीत

आहे. तेव्हां तुमच्या लक्षांत येईल कीं २० वर्षांच्या अनुभवानें सर्व देशांत समता उत्पन्न करण्याचा आपला नाद रशियानें सोडून दिला आहे."

" तुमचं म्हणणं कांहीं आम्हांला नीटसें पटत नाहीं." प्रमिलेच्या सडेतोड भाषणावर कांहीं उत्तर न सुचल्यामुळें गुलाब म्हणाला " मी आमच्या येथील पुढाऱ्याला एकदा तुमच्याकडे घेऊन येतो म्हणजे तो तुमची खात्री करील."

" बरें आहे घेऊन या त्यांना, मी आनंदानें त्याच्याशीं वादविवाद करायला तयार आहे."

" निदान तुम्हांला येवढें तरी कबूल करावें लागेल कीं रशियांत प्रत्येक बाबतींत स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें वागतात; त्यांच्या इतकींच चांगलीं कामें त्याही करतात व अशा तऱ्हेनें स्वातंत्र्य मिळाल्यावर हिंदुस्थानात बोकाळलेल्या नीतीला त्यांनीं मूठमाती दिली असली तर त्यात वावगें कांहीं नाहीं."

" या प्रश्नाचें उत्तर मी स्वतः देण्यापेक्षा रशियातील कम्युनिस्ट संघाच्या उपाध्यक्ष असलेल्या एका कुमारिकेचे उद्गार तुम्हांला सांगते. ती म्हणते, " स्त्री–पुरुष हा निसर्गानें केलेला भेदाभेद मानवी सामर्थ्यानें तोडला जाईल असें मला तरी कधींही वाटणार नाहीं. आम्ही पुरुषाबरोबर वाटेल त्या कार्यक्षेत्रांत उडी टाकतो, वाटेल तें काम करतो, वाटेल तेथें जातो. पण कांहीं कांहीं कार्यक्षेत्रांत आम्ही जितक्या यशस्वी होतो तितके पुरुष होत नाहींत अगर कांहीं ठिकाणीं पुरुष जितके यशस्वी होतात तितक्या आम्ही होत नाहीं; तेव्हां मला आपलें वाटू लागलें आहे कीं स्त्रियांचें कार्यक्रम पुरुषांपेक्षा वेगळे असावेत, सर्वच क्षेत्रात नानाप्रकारचीं कामें करावयास लागून स्त्री स्वतःचेच नुकसान करून घेत आहे. आतां नीतिबंधनाविषयींच सांगायचें तर असें म्हणतां येईल कीं या बाबतींत आम्ही पूर्ण स्वतंत्र आहोंत. आमचे आचार विचार कायद्यानें बाधले नाहींत म्हणून बरेच लोक आमच्या देशांतील मंडळी सुखी आहेत म्हणून मानतात. पण यात वाटतें तेवढें सुख नाहीं असें मी स्वानुभवावरून सांगते." ही कम्युनिस्ट

पुढारी पुढें म्हणाली. " माझी स्वतःचीच गोष्ट सांगायची म्हणजे सर्वांत कटु प्रसंग माझ्या मुलाच्या जन्माच्या वेळचा होता. मुलांचे जन्मानंतर माता किती आनंदात असतात यांचे वर्णन मी पुष्कळ वेळेला वाचलें आहे. पण तसा आनंद त्यावेळीं मला झाला नाहीं. माझें आसपासचें वातावरण असले प्रकार निंद्य मानीत नाहीं. तरीपण ते मोठें अभिनंदनीय आहेत असेंही मानीत नाहीं. मी ज्यावेळीं माझ्या मुलाचे नांव नोंदण्यासाठीं कोर्टांत गेलें त्यावेळीं माझ्या मुलाच्या वडिलांचे नांव सांगतांना मला मुळींच आनंद झाला नाहीं. तेथील मॅजिस्ट्रेटचे हास्य मला अजून आठवतें. ते माझे हृद-यावर सारखे प्रहार करीत असावें असें मला वाटलें. मला त्या दिवशीं सर्व दिवसभर कांहीं चैन पडले नाहीं. मी कांहीं तरी चुकलें आहे. मनाला त्याचा क्षीण होत आहे असें सारखें वाटे. आम्हांला सामाजिक स्वातंत्र्य पाहिजे. वैवाहिक जीवनांतही स्वातंत्र्य पाहिजे आहे पण तें स्वैर नसावें, त्याला शिस्तीसाठीं थोड्याफार नियंत्रणाचीं बंधनें असावींत, तरच स्त्रियांच्या स्वाभा-विक प्रवृत्तिनुसार आम्हाला सुख लाभेल असे आम्हांला अलीकडे वाटूं लागले आहे. "

" प्रमिलाताई, तुमच्या भाषणानें माझ्या मनाचा इतका गोंधळ उडवून दिला आहे कीं या वेळीं काय उत्तर द्यावें हें सुचत नाहीं. तुमचें म्हणणे बरोबर असावें असे एक वेळ वाटते पण खात्री होत नाहीं. याबद्दल आम्हाला विचार करूं द्या. एक दिवस विचार करून आम्ही तुम्हांला उद्यां उत्तर देऊं. आमची आतां मीटिंग आहे मी दोन तासानीं परत येतोच. चला मिस् पद्मा. "

मिस् पद्मेनें जातांना पुन्हां त्या दोघींशीं हस्तांदोलन केले व गुला-बच्या मागोमाग ती गेली.

" ताई तुझ्या आजच्या व्याख्यानाचा केवढा उपयोग होणार आहे माझा गुलाब निवळला तर किती मजा होईल. "

" अलीकडल्या भाई लोकांनीं साम्यवादाचे नसतें अशक्य खूळ न माजवितां भांडवलशाहीला ताळ्यावर आणून योग्य प्रमाणांत मजुरांच्या पोटाला अन्न देतील तर बहुजनसमाज पुष्कळ त्यांच्या बाजूला वळेल."

" ताई चल, आपण आतां आत जाऊं. त्यांची यायची वेळ झाली आहे ते आल्याबरोबर स्नान व जेवण उरकून आपण बाजार करूं या. तूं येथील बाजारांत किती तरी दिवसांत गेली नाहींस."

" खरंच जाऊं या पण श्रीकांत येणार आहेत ना ! "

" हो, त्यांनींच तर हें जाण्याचें ठरवलें आहे. "

" पण आज संध्याकाळीं पुन्हा वसंतराव येणार आहेत त्यांनीं पुन्हां सकाळचाच विषय काढला तर ! "

" त्या वेळचें त्या वेळेला पाहूं. आता हे आल्यावर त्यावर कांहीं तरी बोलणें निघेलच कीं, पण ताई, तूं खरेंच सांग हं. ' मुझा स्वतःवर विश्वास नसला तर जाऊं नको.' असें म्हणणे यांना शोभलें कां ! "

" उषा तूं अगदीं भोळी आहेस, तुला चिडविण्याकरताच ते म्हणत होते व त्यांच्या अदमासाप्रमाणें तूं चिडलीसच; पण त्या शब्दाबद्दल मी श्रीकांताचा जाब घेणारच आहे. "

" पण भांडूं नका हं. "

" वेडी आहेस झाले. "

# "श्रीकान्तांची तक्रार!" ७

लवकरच डॉक्टर श्रीकांत दवाखान्यांतून परत आले. प्रमिला एकटीच दिवाणखान्यांत ताजीं वर्तमानपत्रें वाचीत बसली होती. ते आलेले पहा-तांच ती उठून घरांत जाऊं लागली तेव्हां श्रीकांत हंसून म्हणाले, "कां आंत जाण्याची घाईशी चालविली आहे?"

"आपल्याला आज बाजारांत जायचें आहे ना! त्याकरतां घाई करते आहे. उषेनेंही तुम्ही आल्याबरोबर वर्दी दे म्हणून बजावून ठेवलें आहे."

"रोजची माझी येण्याची वेळ कांहीं अजून झाली नाहीं. मी आज मुद्दामच थोडा लवकर आलो आहे. तेव्हां जरा बैस मी कपडे बदलून आलोंच."

प्रमिलेला अर्थातच थांबणं प्राप्त होतें. पांच मिनिटांच्या आंतच श्रीकांत हातपाय धुवून व कपडे बदलून बाहेर आले, आपलें तोंड टॉवेलनें पुशीत पुशीत ते म्हणाले, "उषा कुठें आहे?"

"ती स्वयंपाकीण बाईला मदत करते आहे. मीही जाऊन मदत करणार होते पण तिनें मला स्वयंपाक घरांत पाऊल टाकण्याचीसुद्धां बंदी केली आहे."

"पाहिलेंस असा तिचा नेहमीं कारभार असतो. ती चोवीस तासांत कधीं वेळ विश्रांती घेते कुणास ठाऊक! सदा आपला कांहीं तरी उद्योग मागें लावून घेत असते."

"पण हे ती कुणाकरता करते?"

" अर्थात् माझ्याकरतां, तिच्या प्रेमळपणाबद्दल वाद नाहीं पण माझ्या करतां हे किती श्रम ! हेंच तर मला पहावत नाहीं."

" स्त्रियांच्या जन्माला गेल्याशिवाय या गोष्टी तुम्हांला कळणार नाहींत."

" हें कांहीं तरी म्हणणे आहे झालें. पण हा वाद आमच्या दोघांचा नेहमीचाच आहे तेव्हां [illegible] बाजुला ठेवुं. आज आधीं पहिल्या प्रथम सर्व वर्षाचा मला रिपोर्ट हवा आहे [illegible] खुर्चीवर बसतां बसतां श्रीकांतानें प्रश्न केला.

" मीही पण तोच प्रश्न विचारणार आहे."

" माझें उत्तर काय सोपें आहे. सर्व दिवसभर दवाखान्याचा धंदा व रात्रौ माझ्या प्रेमलेचें चिंतन."

" श्रीकांत तुम्हाला हे मुळींच शोभत नाहीं, तुमचे उषेकडे चांगलें लक्ष लागावें म्हणून संधी येताच तुमच्या दृष्टीपुढून मी दूर झालें इतकेंच नाहीं-तर तुम्हांला स्वतंत्र असें एकही पत्र पाठविलें नाहीं, तरीपण पुन्हां माझ्या नावाचा उल्लेख आहेच."

" प्रेमले, वस्तुस्थिती आहे ती मी तुला सांगितली. इतकें जरी आहे तरी माझें उषेवर कोणत्याही तऱ्हेनें प्रेम कमी नाहीं. कोणत्याही संसारी जोडप्यानें ईश्वरभक्ती केली असतां जसे पाप होत नाहीं त्याचप्रमाणें माझी स्थिती आहे. ईश्वराच्या ऐवजीं मी तुझें चिंतन करतो त्यामुळें मला स्वस्थ झोंप लागून दुसऱ्या दिवशीं कामाला हुरूप येतो."

" श्रीकांत असं बोलुन तुम्ही माझं मन चलबिचल करूं पहातां आहां, मी हात जोडते, माझा पण शेवटास नेण्यास मदत करा. उषा अत्यंत भाबडी, सुशील, तुमच्याकरतां प्राण टाकणारी एक मुलगी आहे. तिच्या-कडे दुर्लक्ष करूं नका."

" पण मी दुर्लक्ष मुळींच करीत नाहीं तिला हवें तर विचार."

" बरें पण मला यापुढे प्रेमला या नांवानें न हांक मारतां प्रमिला म्हणून म्हणत जा. तो शब्द कानांत पडतांच, मला पूर्व चरित्राची आठ-वण होते व माझें मन उदास होऊन जातें."

" बरें आहे तुझी आज्ञा मला मान्य आहे. पण तूं येथून निघून जाण्याचा एवढा निष्ठुरपणा कां केलास तो सांग."

" मी तरी काय करूं, तुमच्या सन्निध राहून माझा निश्चय मी पार पाडीन अशी खात्री मला वाटेना. शिवाय मामीसाहेबांकडे बघणें माझें कर्तव्यच होतें."

" हो तेंही खरेंच."

" तुम्ही मला विसरून जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे."

" पुढील जन्मीं जरूर करीन "

" असं काय, नीट उत्तर द्या !"

" हेंच माझें खरें उत्तर आहे. खोटे हवें असल्यास सांगतो कीं तुला विसरण्याचा मी प्रयत्न करीन."

" श्रीकांत असें काय बरें करता, तुम्हांला उषेची दया येत नाहीं कां ? ती अलीकडे किती वाळली आहे. हें तुमच्या कसं लक्षांत आलें नाहीं."

" तुला मी एकदां सांगितलें ना, कीं उषेवर माझें निस्सीम प्रेम आहे. ती अशी माझ्याकरतां जीव टाकायला तयार आहे तसा मीहि तिच्याकरतां कोणत्याही संकटांत उडी टाकीन."

" मग ती अशी कुढते का ?"

" तें तूंच तिला विचार प्रत्येक गोष्ट स्वतः करण्याचा तिचा जो अट्टाहास आहे त्यामुळेच ती शरीराची खराबी करते आहे. तिचें नेहमीं आपल्या शक्तीबाहेर काम चाललेलें असतें.

" तें कसें काय !"

" प्रत्येक गोष्ट स्वतः करण्याची हौस. आता घरांत इतके नोकर चाकर असतांना इतके श्रम कशाला ! पण तें तिला पटत नाहीं. स्वयंपाकाची बाई आहे तरी जेवण मी वाढणार म्हणून तिचा कित्ती दिवसाचा हट्ट, कारण काय तर म्हणे बायकोनेंच वाढलेलें अन्न नवऱ्याच्या चांगले अंगीं लागतें. कदाचित् ही गोष्ट खरीही असेल पण सध्याची बाई चांगली वृद्ध, माझ्या आईसारखी शोभणारी असून अत्यंत प्रेमळ आहे तेव्हा तिनें वाढण्यांत कांहींच हरकत नव्हती. जेव्हां मी एक दिवस सत्याग्रहच केला कीं ती

माझ्याबरोबर जेवायला बसल्याखेरीज मी जेवणारच नाहीं, तेव्हांपासून ती आतां बरोबर बसूं लागली आहे."

" तुमची पूर्व पुण्याईच उदयास आलेली दिसते."

" यांत शंकाच नाहीं. आरंभीं आरंभी माझे बूटपॉलीशे सकट ती काम करीत असे; पण मी कांहीं गोड बोलून कांहीं रागावून तेवढें बंद केलें आहे, तरी पण जर एखादे वेळ ती कामांत आहे असें पाहून स्वतःच केस ठीक करून व नेकटाय घातला तर ती आल्यावर डोक्याचे केस पार विसकटून टाकते व टाय काढून घेते ती स्वतः जेव्हां केसांचा भांग पाडील व नेकटाय घालील तेव्हां आम्हांला बाहेर जायला परवानगी."

" हद्द आहे हो उषेपुढें." प्रमिला गाडींवरून म्हणाली.

" आता दवाखान्यांत येण्याचे वास्तविक तिला कांहीं कारण नाहीं पण प्रत्येक वेळीं ती माझ्याबरोबर येते. व प्रत्येक रोग्याची विचारपूस करून त्याना काय हवे नको, कोणाचे टॅंपरेचर पहा, कोणाला पांघरूण घाल, कोणाचें डोकें चेप तर कोणाला पाणी दे, असे सर्व प्रकार चालू असतात. दवाखान्यातील सर्व लोक तिला आतां "आई" म्हणूनच हाक मारू लागले आहेत. त्याचा परिणाम आता असा झाला आहे कीं तिच्याशिवाय सर्व रोगी अडून बसतात मग ती कामांत असली तरी मला बळेंच तिला बोलावून आणावें लागतें."

" ही माहिती तुम्ही सांगितल्यापासून मला केव्हां एकदां उषेला कड-कडून मिठी मारीन असें झालें आहे."

" आज सकाळींच तूं पाहिलेस ना ! तिला चहा करायची कांहीं जरूरी होती, पण नाहीं, नोकर लोकांना माझ्या आवडीसारखा चहा करतां येत नाहीं म्हणून हा येवढा अट्टाहास, मी पुष्कळ सांगून पाहिलें कीं दुसरीकडे मी चहा पितो तेव्हां काहीं तूं येत नाहींस, त्यावर ती म्हणायचीच कीं इतर ठिकाणीं चहा मनासारखा मिळत नाहीं मग एकदां तरी चहा चांगला नको कां ! यावर मी काय उत्तर देणार!"

" खरी आर्य स्त्री आहे."

" सर्व घराचा, दवाखान्याच्या हिशेब तीच ठेवते; मी तिला पुष्कळ वेळां सांगितलें कीं कारकून किंवा कंपांउन्डर पाहील पण ते तिला पसंत पडत नाहीं, घरांतील खाजगी गोष्टी, पैशाच्चे उत्पन्न कुणी दुसऱ्याला दाखवीत असतें कां काय ! हें तिचें उत्तर ठेवलेलें, तेव्हां अशा स्थितींत मी काय करूं तें तूंच सांग. येवढा कामाचा आटापीटा झेपण्याचे तिचें वय आहे कां!"

" तुमची ही हकीगत ऐकून मी काय करावें हेंच सुचत नाहीं. यांत कोणाचीच चूक आहे असें मला वाटत नाहीं. तुम्ही तिच्या शरीर प्रकृतीकडे पहातां, ती आपल्या प्रेमाकडे पहातें पण दोघेही यापासून आनंदी आहेत म्हणावें तर तेंही नाहीं. ईश्वराची घटना किती विलक्षण आहे."

" अगदीं बिनतोड बाजू आहे. पण मी यापासून एक सार काढलें आहे. ती आपलें जग म्हणजे ' मी व माझा दवाखाना येवढेंच मानते, तेव्हां ही तिची दृष्टि थोडी व्यापक केली पाहिजे, संसाराशिवाय जगांत आणखी पुष्कळ गोष्टी करण्यासारख्या आहेत हेंच मला तिला शिकवायचें आहे आणि त्याच करतां तिनें सिनेमांत काम करावं म्हणून मी आग्रह धरला होता. पण ते प्रकरण भलत्याच थराला गेलें त्यामुळें मला गप्प बसणें भाग पडलें."

" तिची दृष्टी व्यापक झाली पाहिजे हे मलासुद्धां कबूल आहे पण याकरतां तुम्ही जो मार्ग सुचविला आहे तो अत्यंत धोक्याचा आहे असं मला वाटतं."

" असें कां वाटावें ! माझें तिच्यावरचें किंवा तिचें माझ्यावरचें प्रेम कमी होईल अशी कां भीति वाटते !"

" तुमच्या दोघांच्या बाबतींत ही गोष्ट शक्य नाहीं पण विषाची परीक्षा पाहूं नये असें मला वाटतें. सामाजिक बाबतींत अमेरिका सर्व जगांत पुढारलेली आहे ना ! मग तेथील सिनेमागृहाचे असे रिपोर्ट कां येतात ?"

" कसले रिपोर्ट ?"

" तेथील लग्न झालेल्या बहुतेक प्रसिद्ध नटाच्या बायकानीं नवऱ्या-

विरुद्ध घटस्फोट मिळविले आहेत. कारण काय तर हे नट त्यांच्या बरोबर काम करणाऱ्या नटींच्या प्रेमपाशांत सांपडलेले असतात. ज्या देशांत परस्त्री चुंबन, भेट हे फारसे दोष मानले नाहींत अशा देशांतील नट नटींचें जर अशा प्रसंगामुळें मन बावरते तर जिथें हे दोन्हीही प्रकार निंद्य मानले जातात, इतकेंच काय पण परपुरुषांशीं हस्तांदोलनही संकोच वृत्तीनें केलें जातें तिथें असले प्रकार केले असता ते लोकांच्या देखत कां होईना—पण कांहींच परिणाम करणार नाहींत असें कसें म्हणतां येईल " —

" मन खंबीर असल्यावर या गोष्टीही कांही अशक्य नाहींत असें अजून माझें मत आहे, हा प्रामाणिक मतभेदाचा प्रश्न आहे याबद्दल तू वाईट वाटून घेणार नाहींस;अशी खात्री आहे. चला आपण जेवण उरकून घेऊं या"

" असल्या वादविवादानें माझ्या मनाला कधींच वाईट वाटत नाहीं; तुमच्या म्हणण्याप्रमाणें उषा सिनेमांत काम करण्यास तयार झाली तर त्याचा काही वाईट परिणाम होऊं नये म्हणजे मिळविली."

" उषेच्या बाबतींत तरी तशी काळजी वाटण्याचें कारण नाहीं."

" मग आज सकाळीं 'तुझा स्वतःवर विश्वास नसला तर जाऊं नकोस ' असं कां म्हणालांत."

" ती माझ्या हातून चूक झाली. त्या बाबतींत उषेची क्षमा मागायला मी तयार आहे."

" आधी मारायचें आणि मग पाया पडायचें त्यातलाच हा प्रकार आहे."

" कसेंही म्हण, पण झाली ही चूक झाली यांत शंका नाहीं."

" ही पहा राणी सरकारची स्वारी आली. काय हुकूम आहे कुणास ठाऊक. "

" ताई, कमाल आहे हो तुम्ही," उसना रागाचा आविर्भाव आणून उषा म्हणाली " मी किती वेळची वाट पहात आहे. पण तुमच्या गप्प संपतील तेव्हां ना ! कसल्या येवढ्या गप्पा चालल्या होत्या ! "

" आज तुम्ही खूप निंदा करून घेतली. म्हटलें बरी संधी आली आहे." श्रीकांत हसत म्हणाले.

" मग निंदा करून पोट भरले का अजून जेवायचे आहे ? " उषेनें थोड्या रोषाने उत्तर दिले.

" अग तुझी निंदा करायला तूं कारण सापडू देशील तेव्हा ना ! श्रीकांताना याबद्दलच फार राग येतो, निंदा करण्याची तूं संधीच आणूं देत नाहींस अशी त्यांची तक्रार आहे."

" मला असले आडवें तिडवे कांहीं बोलता येत नाहीं. आतां उठा आणि स्थान करून चार घास खा."

" प्रमिला ऊठ, राणी सरकारची आज्ञा पाळलीच पाहिजे."

" अहाहा फारच आज्ञाधारक कनी !" उषेने चिडून उत्तर केलें.

" तुझी कधीं अवज्ञा केली आहे तें सांग बघूं."

" पुरे झाला हा वाद, आधी जेवायला चला बघू."

लवकरच ती मंडळी जेवायला उठली. उषेने प्रमिलेला एकीकडे नेऊन विचारलें " ताई माझ्याबद्दल काय म्हणाले ? "

" खरच ते तुझी फार स्तुती करीत होते त्याचे येवढेंच म्हणणें कीं तूं आपल्यावर फार काम ओढून घेतल आहेस."

"हे कांहीं तरी म्हणणे आहे. मला त्यापासून खरच फार आनंद होतो. बर पण आजच्या सकाळच्या बोलण्याचें काय !"

" अग त्यानी माफी मागितली. त्याना ते शब्द बोलल्याबद्दल फार वाईट वाटलेले दिसत होतें."

" त्यांना माफी कशाला मागायला लावलीस ग."

" मी नाहीं मागितली कांहीं त्यांनी होऊनच दिली. तूं कांहींसुद्धां मनांत आणू नकोस. ते पूर्ण सुखांत असून तुझ्याबद्दल त्यांना अत्यंत प्रेम आहे. तेव्हां विनाकारण कांहीं तरी मनात आणून कुढी बनू नकोस."

" ताई अगदीं खरे ना पण हें माझ्या गळ्याची शपथ."

"तुझ्या गळ्याची शपथ अगदीं खरें आहे."

" बरें तुझ्या रमेशचं काय ! त्याचा अभ्यास ठीक चालला आहे ना ! त्याच्या खेळण्यातील प्राविण्याबद्दल मी नुकतेंच वर्तमानपत्रात वाचलें."

" त्याचा अभ्यास उत्तम चालला आहे. पण त्याच्या मनानें सैन्यांत जाण्याचं वेड घेतले आहे."

" सैन्यांत, असली दुर्बुद्धी त्याला का सुचली ! "

" त्याच्या कॉलेजातील एका मैत्रिणीचे वडील सैन्यात बडे अधिकारी आहेत व त्यांच्या व त्याच्या मुलीच्या आग्रहावरून त्याचा त्या बाबतींत विचार चालला आहे. कांहीं झाले तरी परीक्षा होईपर्यंत तो जाईल असे वाटत नाहीं."

" परीक्षा झाल्यावर सुद्धा त्याला जाऊं देऊं नकोस. बाकी मामींनीं सांगितल्यावर तो काय जातो आहे म्हणा !"

" हो तेही खरेंच. मामीवर त्याची विलक्षण भक्ति आहे."

" त्याला एकदा इकडे पाठीव ना !"

" परीक्षा झाल्याबरोबर पाठविते !"

त्या दिवशीं सध्यांकाळीं वसंतराव येऊन गेला पण प्रमिला तेथें हजर असल्यामुळें त्याचा कार्यभाग साधला नाहीं व ती तेथें आहे तोपर्यंत ही गोष्ट जमणार नाहीं या गोष्टीबद्दलची खूणगांठ बांधून तो पुन्हां बरेच दिवसांत आला नाहीं पण थोडीशी कारवाई करून गुलाब व पद्माला त्याने सिनेमाच्या नादी लावले. त्या दोघांचेही अभ्यासावरील लक्ष उडालेंच होतें व स्वेच्छाचार करण्याकरितांच केवळ ते भाई बनले होते. पण खऱ्या-भाईबद्दलचे विचार कळतांच त्यांनीं त्या नांवाचें विसर्जन केलें. पद्माला आईशिवाय घरीं कोणीच नसल्यामुळें व जवळ पैसा असल्यामुळे ती स्वतंत्र होती, इकडे गुलाबही बहिणीच्या जीवावर चैन करीत होता. आतां 'भाई' बनणं जमायचें नाहीं म्हणून वसंतरावाने केलेली सूचना मान्य करून ते दोघेजण सिनेमा जगांत जाण्याचा विचार करूं लागले.

# "रुमालाचा घोटाळा" ८

कॅप्टन् नारायणराव कोइटला गेल्यावर रमेशही तिकडे कसा गेला या बद्दलची हकीगत त्यानें स्वतःच पंडीत वीणाशंकरला सांगितली असल्यामुळें त्याचा पुन्हां उल्लेख करण्याची जरूरी नाहीं.

तिकडे जाण्यात शालिनीची ओळख दृढ होईल ही जी त्याची आशा होती ती मात्र फलद्रूप झाली नाहीं, कारण मध्यंतरी बरेच दिवस ती आपल्या घरीं आईबरोबर हैद्राबादेकडे गेली होती. त्यानंतर रमेशलाच बरेच वेळा कँपिंगला जावें लागल्यामुळें "काय कसें काय आहे! ठीक चाललें आहे ना!" इत्यादि औपचारिक प्रश्नाशिवाय ज्यास्त वेळ त्यांचें बोलणेंच झालें नाहीं. तिच्या लग्नाचा बेत एक वर्षभर लांबला आहे येवढी बातमी मात्र तिनें त्याला कळविली होती व त्यांतच तो समाधान मानून होता. असो.

तिसऱ्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें कॅप्टन् नारायणराव ठरलेल्या सर्व सैनिकासह कोइटला निघाले व वाटेंत विशेष त्रास न होता तीं सर्व मंडळी त्या गांवीं सुखरूप पोहोंचली.

कॅप्टन् नारायणरावांनीं रमेशला जेवणाला तिकडेच बोलावल्यामुळें तो आपले कपडे बदलून तिकडे निघाला.

कमांडिंग ऑफिसरला कांहीं जरूरीच्या कामानिमित्त भेटायला जावें लागल्यामुळें कॅप्टन् नारायणराव यावेळीं घरीं नव्हते. शालिनीची आईंसुद्धां

घरांत कांहीं तरी काम करीत बसली होती त्यामुळें शालिनीला स्वतःलाच पुढें होऊन त्याचें स्वागत करावें लागलें.

" रणमर्द शूर शिपाई, गरीबांचे त्राते, शत्रूंचा निःपात करणार शूर वीर यावें, यावें, येथील आसनावर बसावें. " रमेश दिवाणखान्यांत आल्यावर शालिनीनें वरीलप्रमाणे त्यांचें स्वागत केलें. ती पुढें म्हणाली " बाबा येथें नसल्यामुळें मलाच आपलें स्वागत करावें लागत आहे तेव्हां पाहुणचारांत कांहीं कमतरता पडल्यास माफी असावी. "

ती थांबली असें पाहून रमेश म्हणाला. " कां संपला का आदरसत्कार ! विशेषतः तुम्हांला अजून चांगलीशी पाठ येत नाहींत मी शिकवूं कां ! "

" सध्यां नको, पुढे पाहू आधीं खालीं तर बसा. "

तो खालीं बसल्यावर ती म्हणाली, " खरेंच रमेश, बन्नूची हकीगत पुन्हां एकदां ऐकूं द्या. बाबांनीं आम्हांला आतां सांगितली पण त्यांत किती तरी गोष्टी समजायच्या राहिल्या आहेत. तुम्हीच ती संगतवार पुन्हा एकदां सांगा. "

" या बन्नूच्या गोष्टीचा गाजावाजा फारच झालेला दिसतो. येथें आल्यावरोवर ऑफिसर्स् लोकांनीं, शिपायांनीं मला विचारून विचारून बेजार केलें आहे पण खरेंच सांगूं का त्यांत मी कांहीं मोठेसें केलें आहे असें मला वाटत नाहीं. "

" तुम्हांला नाहींच वाटायचें ! उद्यां तुम्ही जमादार, सुभेदार झालात किंवा पुढे commissioned officer झालांत तरी तुम्हांला काय त्याचें ! तुम्ही आपले निरुत्साही ते निरुत्साही; आम्हांला मात्र रहावत नाहीं म्हणून आम्ही आपली वेड्यासारखी स्तुती करीत रहातो. "

" बरें मी आपला शब्द परत घेतो मग तर झालें. सर्व हकीगत ऐकायची आहे ना ! कंटाळा नाहीं ना येणार ? "

" आतां जास्त वेळ न गमावतां सांगाल तेवढे बरें. पत्त्वाशाला उगीचच ओढून धरण्याची भारी वाईट खोड असते. "

" बरें ऐका तर " रमेश हंसून म्हणाला. शालिनीच्या खोट्या रुसव्याची त्याला मोठी मौज वाटली.

हळूहळू सर्व हकीगत रमेशने तिला सांगितली पण ती सांगताना पंडीत वीणाशंकरच्या मुलीचा शक्य तितका उल्लेख त्यानें कमी केला. हकीगत संपल्यावर एक लांब उसासा टाकून शालिनी म्हणाली, " अशा वीर पुरुषाचें माझ्या हातून कांहींच स्वागत होत नाहीं याबद्दल मला अतिशय वाईट वाटते आहे. पण मी काय करू. कालच्या त्या शूर कृत्याबद्दल मी काय बक्षीस देऊं ते बोला. पण मला आश्चर्य वाटतें कीं जिला तुम्ही सोडवलीत तिच्याकडून तुम्हांला कसें बक्षीस मिळाले नाहीं. "

" ती तुमच्या सारखीच परतंत्र, तिचा नुसता चेहरा पहाण्याला सांपडला नाहीं तर ती बिचारी बक्षीस काय देणार ! "

" अरेरे तिची तुम्हांला बरीच कींव आलेली दिसते तिला इथें बोलावून घेऊं कां ? "

" शालिनी माझ्या बोलण्याचा असा भलताच अर्थ करूं नका. त्या स्त्रीशीं मला कांहीं एक कर्तव्य नाहीं, तुम्हीच प्रश्न विचारीत म्हणुन त्याचे मी सगळ ते उत्तर दिले. "

" बरें जाऊं द्या, त्याबद्दल एवढे वाईट वाटून घ्यायला नको. भेटेल हो ती पुन्हां कधीं तरी. " शालिनीनें मुद्दाम चिडवण्याकरता उत्तर केलें.

" हें पहा असलीच भाषा पुढे चालूं ठेवायची असेल तर आपले बोलणें इथेच संपवलेलें बरं. साहेब घरीं येईपर्यंत मी जरा बाहेर जाऊन येतो. "

रमेश उठूं लागलेला पाहून शालिनीनें त्याला खाली बसविलें व ती हंसत म्हणाली, " आतां असले शब्द पुन्हां नाहीं म्हणणार मग तर झालें ! पण तिचें नांव तर सांगायला तुमची हरकत नाहीं ना ! "

" वीणाशंकरच्या घरीं तिचें नांव मला कळलें नाहीं पण साहेबांनीं कालच्या हकीगतीचा जो रिपार्ट लिहीला आहे त्यांत तिचें नांव " पूर्णेंदु " असें आहे. "

" पूर्णेंदु ! नांव सुरेख आहे नाहीं ! मला ती एकदा पाहिलीच पाहिजे.

बरे पण बक्षीस काय हवे तें मागा ना. मला देण्यासारखें मात्र असलें पाहिजे. ”

“ आमच्या गावीं असताना तुम्ही मला जे बक्षीस दिले आहे ते इतकें अमोलिक आहे कीं आता आणखी कांहीं मागायची इच्छाच होत नाहीं. तें बक्षीस मी आपल्या हृदयाशीं नेहमीं जपून ठेवतो. त्याच्याकडून मला त्याच्या पूर्वीच्या मालकाबद्दल किती तरी गोष्टी कळतात. ”

“ तुम्ही काव्यांत शिरूं लागलात पण मला त्यांतली कांहींच गोष्ट नाहीं. माझ्या रुमालाने तुम्हाला काय काय गोष्टी कळविल्या त्या कळूं द्या तरी एकदा ! ”

“ त्याने त्या अगदीं खाजगी म्हणून मला सांगितल्या आहेत त्या कशा बाहेर फोडतां येतील. ”

“ असली छक्क्या पंज्याची बोलणीं मला नाहीं येत. इतकी वाङ्मयाची आवड होती तर सैन्यांत तरी कशाला आलांत ? ”

“ तेच तर तो रुमाल सांगत होता. तो म्हणाला आमची मालकीण तुम्हाला जरी चहात असली तरी तिचे लग्न दुसऱ्याशीं ठरलें आहे, तो चांगला श्रीमंत, त्याच्या हौसेप्रमाणे सैन्यांत अधिकारी आहे तेव्हां सावध रहा. ”

“ रमेश मला असे चिडवूं नका. एखाद्या सैन्यावरील अधिकाऱ्याशी लग्न व्हावे अशी माझी इच्छा आहे हें कांहीं खोटें नाहीं पण तुम्हीही लवकरच अधिकारी होणार आहात असें आज बाबा म्हणत होते; पैशाची मी विशेष पर्वा करणार नाहीं हें कांहीं तुम्हांला सांगायला नकोच. ”

“ शालिनी, स्पष्ट बोलतो याची क्षमा कर. नुसत्या आपलेपणापेक्षां कांहीं तरी जास्त भावना आपल्या दोघांत उत्पन्न झाल्या आहेत ही गोष्ट नाकारण्यांत अर्थ नाहीं तेव्हां मला स्पष्ट उत्तर दे. मी तुझी आशा करूं कां ? ”

“ रमेश, या बाबतींत मी खरेंच अजून फारसा विचार केला नाहीं पण तुम्हांला एवढें मात्र सांगते कीं या गोष्टीला बाबांची संमति जरूर मिळाली

पाहिजे. ते सुविद्य व मनाने उदार आहेत त्याना सर्व हकीगत कळल्यावर ते नाहीं म्हणणार नाहींत असें वाटतें. तुम्ही धीर सोडूं नका."

"पण तुझें लग्न ठरलें आहे ना!"

"नुसती तशी बातमी आहे; प्रत्यक्ष बोलणे असे कांहींच झालेले नाहीं. पण तो विषय तूर्त राहू द्या तुम्हांला बक्षीस काय हवे!"

"सध्या कांहीं नको." शालिनी स्पष्ट उत्तर द्यायचे टाळतें आहे हें पाहून निराश होऊन रमेश म्हणाला.

"बरें मी तुम्हाला आणखी एक सुंदर रुमाल देते तो पहिला रुमाल इकडे द्या पाहू."

"रमेशने आपल्या खिशातील रुमाल काढून तिच्या हातात दिला तो उघडून पहातांच ती आश्चर्याने म्हणाली हे काय! हा मी दिलेला रुमाल नाहीं."

"म्हणजे!" रमेशही आश्चर्य चकीत झाला, तो पुढे म्हणाला.

"तुम्ही दिल्यापासून मी तो कोट बदलल्याशिवाय कधींहि बाहेर काढला नाहीं मग दुसरा येईल कसा!"

"हा माझा नाहीं हे खास, तुम्हीच कुणाला तरी देऊन हा दुसरा आणला असेल आठवण करा!"

"शालिनी हे बोलणं तुला शोभत नाहीं, ईश्वरसाक्ष सांगतो कीं तुझ्या शिवाय दुसऱ्या कोणत्याही स्त्रीवर मी प्रेम केले नाहीं मग अर्थातच रुमाल बदलण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं.

"हा रुमाल खरोखरच फार चांगला आहे रुमालाचा रंग तरी किती सुंदर आहे! ही मार्मिकता पंजाबी स्त्रियांतच आढळते त्यावरील नक्षी काम तरी किती आकर्षक आहे. अगबाई हे पाहिलेत कां यावर एक अक्षर विणलेलें आहे."

रमेशनें तो रुमाल हातांत घेतला. त्या रुमालावरील कलाकुसरीच्या कामाबद्दल वाद नव्हता असले सुंदर काम रमेशनें आजपर्यंत कधीं पाहिले नव्हते. वेलबुट्टीतच एक इंग्रजी अक्षर कोरलें होतं ते पाहून रमेश म्हणाला"

"यांत इंग्रजी P असें अक्षर गुंफलें आहे यावरून रुमाल विणणाराला इंग्रजी येत असावें."

" P अक्षराची काय बरें नांवें असावीत !"

" प्रमिला ! छे प्रमिलाताईचा हा रुमाल खास नाहीं."

" मग काय पद्मा, पार्वती, पुष्पा, असलीं नांवें कांहीं ओळखीचीं आहेत कां ! आठवण करा."

" छे मुळींच नाहींत."

" थांबा, त्या बन्नूच्या मुलीचें नाव काय सांगितलेत."

" पूर्णेंदु "

" बरोबर पत्ता लागला. तरी म्हटलें तिचें नाव घेतल्याबरोबर तुमचा राग कां येत होता."

" शास्त्रीनी मी पुन्हा सांगतो कीं यावलें मला कांहीं एक माहिती नाहीं. त्या स्त्रीनें माझ्याजवळ येऊन रुमाल देण्याचें धारिष्ट खास केलें नाहीं. त्या मुलीचें नांव तूं विनाकारण यांत गोवतें आहेस."

" पंजाबांतील स्त्रीशिवाय इतकी सुंदर वीण दुसऱ्या प्रांतातील स्त्रियांना क्वचितच येते. त्यावरून मला खात्री आहे कीं हें काम पंजाबी स्त्रीचें आहे. आतां दुसऱ्या कोठल्याहि पंजाबी स्त्रीशी तुमचा संबंध आला नाहीं असें तुम्ही म्हणतां तेव्हां त्या स्त्रीचाच हा रुमाल आहे असें म्हणण्यांत चूक आहे असें मला तरी वाटत नाहीं."

" पण हा रुमाल माझ्याजवळ यावा कसा !"

" तुम्ही त्यांच्या घरी फराळाला गेलात त्यावेळीं, कोट काढला होतात कां !"

" हो काढला होता, हो, आतां मला चांगलें आठवतें कीं आम्ही फराळाला बसलो असतां बैठकीच्या खोलींत कोणीतरी गेलें होतें."

" घ्या आतां; ती बिचारी काय बक्षीस देणार असें म्हणत होता ना. रुसे पण तिनें अगदीं न बोलतां काम केलें."

" हा रुमाल जवळ ठेवण्याइतका आकर्षक आहे यांत शंका नाहीं पण

तुझ्या रुमालापेक्षा याला मी जास्त किंमत देत नाहीं. एक दिवस सवड काढून मी बन्नूला जातो व हा रुमाल परत करून तुझा घेऊन येतो."

" इतकी तसदी घ्यायचे कांहीं कारण नाहीं. आतां मी एक दुसरा सुंदर रुमाल देते म्हणजे झाले तो मात्र नीट जपून ठेवा नाहींतर आणखी कोठें तरी शौर्य दाखवायला जाल आणि हा दुसराहि रुमाल गमावून बसाल."

" फाजील आहेस झालं बर मग या रुमालाचं काय करूं."

" तोहि तुम्हाला जपून ठेवायला हवा. त्या मुलीनें तुम्हाला तो उपकाराची फेड म्हणून म्हणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें म्हणा दिला आहे तेव्हां तो परत करून तिचे मन दुखविण्यांत अर्थ नाहीं."

" बरें आहे तुझी आज्ञा मला मान्य आहे, यापुढें मात्र तुझा रुमाल जीवापलीकडे जपेन."

" पहा बरं आता हरवलात तर मी मुळीं बोलणारच नाहीं."

" एकदां अद्दल घडल्यावर आता काय चुकतो."

शालिनीनें दुसरा एक रुमाल त्याला आणून दिला व त्यानें तो आपल्या हृदयाशीं जपून ठेवला.

" ही पूर्णेंदु माझ्या मनाला चटका लावून बन्नूला गपचीप बसला आहे, ती चांगली कलावंत दिसते तिच्याकडे जाऊन असले विणकाम शिकेन तरी."

" जरूर जा व हा रुमाल दिल्याबद्दल आभार मान."

" आभार मानण्याचे काम तुमचें तुम्ही करा, माझें काम मी पाहीन."

" बरें आहे " रमेश शालिनीला उत्तरें देत होता खरें, पण त्याच्या डोळ्यापुढें एक काल्पनिक 'पूर्णेंदु' सारखी येत होती व मनाचा निग्रह केला तरी ती त्याच्या डोळ्यापुढून हलेना.

नारायणरावांच्या येण्यामुळें त्यांच्या भाषणांत खंड पडला. लगेच रेजिमेंट संबंधीं भाषण सुरू झालें. शालिनीलाही सैन्यासंबंधीं भाषणांत भाग घेणें फार आवडे व तिची ही आवड पाहून नारायणराव नेहमीं म्हणत कीं "तुला एखादा सैन्यांतीलच इसम नवरा दिला पाहिजे " आणि तिलाही पण

त्यांच्या या बोलण्याबद्दल आनंद होई. त्यावेळीं अर्थात तिच्या डोळ्यापुढें रमेश दिसूं लागे.

बगल्यात आल्याबरोबर पहिल्यानें नारायणरावांनीं सांगितलें कीं रमेशला Viceroy's commission मिळून तो जमादार होणार. आपल्या गुणांनीं तो लवकरच king's Commission मिळवील अशी माझी खात्री आहे. काय रमेश तुझें काय मत आहे ? "

" आपल्या गुणानींच केवळ मनुष्य उदयाला यतो असें मला म्हणवत नाहीं. आपण नसतां तर कदाचित हेंहि कमिशन मला मिळालें नसतें, तेव्हां मी म्हणतो कीं गुणापेक्षां योगायोगच पाहिजे."

" गुणानींच मनुष्य पुढें येतो असे माझें ठाम मत आहे; मात्र गुणाला योगायोगाची जोड मिळाली पाहिजे हें तुझेंहि म्हणणें मला कबूल आहे."

" पण या रेजिमेंटमध्यें गुणाला वाव आहे कुठे ! "

" कां काल नाहीं कां वाव मिळाला ! "

" तो कसला आला आहे ! आपण होता म्हणून ती गोष्ट शक्य झाली. माझे तर अलीकडे असें मत बनत चाललें आहे कीं शिकलेल्या कोणीहि इसमानें रेजिमेंटमध्यें येण्याच्या भानगडींत पडूं नये. माझ्यासारख्या Arts घेतलेल्या विद्यार्थ्याला तर हा निव्वळ कैदखाना आहे."

" वाहवा तूं आज नवीनच मतें प्रतिपादन करूं लागलास ! "

" रमेश, तुम्हाला मोठा अधिकार मिळावा, एवढ्या सैन्यावर हुकमत चालवावी, रस्त्यानें जातांना हजारो सैनिकाचे सलाम घ्यावेत असें नाहीं वाटत ! त्यांत कितीतरी मौज आहे " शालिनी मधेच म्हणाली.

" शालिनीताई, अगदीं खरेंच सांगायचें म्हणजे मला तसली बिलकूल आवड नाहीं आणि तशा तऱ्हेचा योगायोग आलाच तर त्याप्रमाणें वागणें प्राप्त आहे इतकेंच."

" अशा विचाराच्या माणसाच्या हांतून ऑफिसरांची कामें होणार नाहींत, त्याला मनुष्य मनाचा हळुवार असतां उपयोगी नाहीं. मनानें क्रूर, बिनमुर्वत-खोर, बेपर्वा असें बनावें लागतें. माझे शब्द लक्षांत ठेव व Lt. ची रँक मिळा-यच्या आंत या सर्व गुणांनीं संपन्न हो. यांत तुझें कल्याण आहे."

यावर उत्तर देण्याचें रमेशच्या अगदीं ओठावर आलें होतें पण तें मोठ्या कष्टानें दाबून तो स्वस्थ बसला.

या नंतर फारसें बोलणें न होता मंडळी जेवणाला उठली.

जेवतांना रमेश आपल्याच विचारांत गढून गेल्यामुळें फारशा गप्पा झाल्या नाहींत. शालिनीहि रमेशच्या मघाच्या बोलण्यानें जरा नाखूष झाली होती त्यामुळें तिच्याकडूनहि जेवतांना विशेष विनोद झाला नाहीं.

जेवण झाल्यावर नारायणरावांनीं रमेशला सांगितलें कीं येथें एक मोठी रशियन सर्कस आली आहे व ती पहायला आम्ही जाण्याचें ठरविलें आहे तरी तूंहि इकडेच ये; आपण सर्व बरोबरच जाऊं.

वरिष्ठ अधिकाऱ्याची आज्ञा पाळणें रमेशला अर्थातच भाग होतें

# "रशियन सर्कस !" १

रमेश आप[illegible] [illegible]ाला तरी त्याच्या मनांत कॅप्टन नारायण-रावांनीं सांगितलेले विचार सारखे घोळत होते. 'मनानें क्रूर, बिनमुर्वतखोर, बेपर्वा बनल्याशिवाय ऑफिसर होतां येत नाहीं. हीच त्यांची शिकवण होती आणि असा स्वभाव बनल्याशिवाय Commission मिळणार नाहीं असेंच त्यांनीं जवळ जवळ ध्वनित केल्यासारखें होतें.

आपल्याला असें बनणें साधेल का ! यदाकदाचित साधलें तरी अशा रीतीनें वागणें, प्रमिलाताईला, श्रीकांत किंवा उषा यांना पसंत पडेल कां ! नाहीं. कधींही नाहीं त्यांना असलें वर्तन मुळींच आवडणार नाहीं. आणि त्यांना न आवडणारी गोष्ट मला करायची नाहीं. शिवाय या बाबतींत माझीही नापसंती आहेच तेव्हां यापुढील बढत्या बंद झाल्या सारख्याच आहेत हें त्याला उघड उघड दिसूं लागलें. मग असली नोकरी करण्यांत तरी काय अर्थ आहे ! नाहीं तरी सुशिक्षित लोकांना हें क्षेत्र निरुपयोगीच आहे असें मी म्हणालोच होतो, तेव्हां आपण शक्य तितके लवकर इथून पाय काढावा हें बरें असें त्याच्या मनानें घेतलें, पण मग शालिनीची काय वाट ! तिला तर रेजिमेंटमध्यें नोकरी करीत असलेला नवरा हवा ! इथे मात्र त्याच्या विचाराची गाडी अडखळली; त्याचें मन गोंधळून गेलें, त्याच्या मनाचा कांहींच निश्चय होईना; शेवटीं कंटाळून त्यानें या बाबतींत विचार करण्याचें सोडून दिलें.

बरोबर १० वाजतां रशियन सर्कसचा खेळ सुरू झाला. कॅप्टन नारा-

यणरावांनीं एक बॉक्स रिझर्व केली होती त्यांत ते, त्यांची पत्नी, पलीकडे शालिनी, व तिच्या पलीकडे रमेश अशी मंडळी बसली होती. रेजिमेंटमधील लोकानाही आज सर्कस पहाण्यास परवानगी दिल्यामुळें तंबू प्रेक्षकांनीं अगदीं गच्च भरून गेला होता. जाळीच्या पडद्याच्याही आंत पुष्कळशा स्त्रियाही खेळ पहाण्यास आल्या होत्या. शालिनी जवळ असल्यामुळें दुपारचे निरुत्साही विचार त्याच्या मनांतून पार नाहींसे झाले होते. सर्कससंबंधीं किंवा घोडयासंबंधीं बरीचशीं माहिती तो तिला देत होता. त्याला स्वतःला असल्या कामाची आवड असल्यामुळें, सर्कसमधील कसरतीची कामें तो अगदीं एकाग्रतेनें पाहूं लागला. कोणतेंही काम झालें कीं शालिनीनें विचारावें "रमेश तुम्ही हें काम करूं शकाल कां? तुमच्यांत पूर्वीची तरतरी कायम आहे कां!"

त्यावर रमेशनें हंसून उत्तर द्यावें कीं "उद्या मीच हें काम करून दाखवितो म्हणून सर्कसच्या मालकाला सांगणार आहे."

सर्कसचीं कामें पुढें पुढें चांगलींच रंगू लागलीं. त्यामुळें तीं दोघेही एकाग्रतेनें तिकडे पहात राहिली.

निम्या खेळाच्या सुमाराला मुख्य रशियन कोसाक्सचें काम होणार होतें, त्याच्या आधीं मालक रिंगमध्यें येऊन सर्वांना उद्देशून म्हणाला "आतां होणारें काम जरूर पहा, असें काम तुम्हांला हिंदुस्तानांत पहावयाला सांपडणार नाहीं. अशा तऱ्हेचें काम करून दाखविणारास एक हजार रुपयांचें बक्षीस देण्याचें मी ज्या ज्या ठिकाणीं गेलो तेथें तेथें जाहीर केलें आहे, पण अद्याप एकजणही छातीठोकपणें पुढें आला नाहीं. आजही पुन्हां मी तेंच बक्षीस जाहीर करतो आहे, आतांचें आमच्या लोकांचें काम पाहिल्यावर कोणीही पुढें येऊन त्यानें तसें काम करून दाखवावें व एक हजार रुपयांचे बक्षीस मिळवावें."

सर्व प्रेक्षकांनीं स्तब्धतेनें तें आव्हान ऐकलें. त्यावेळीं तंबूत विलक्षण गांभीर्य निर्माण झाले होतें. घंटा झाल्याबरोबर ते धिप्पाड रशियन कोसॅक्स घोड्यासह आंत आले. त्यावेळीं सर्व प्रेक्षकांनीं टाळ्यांनीं त्यांचें स्वागत केलें रमेश जवळ जवळ श्वास कोंडून तें काम पाहूं लागला.

घोडा भरधांव पळत असतां त्याच्या पोटाखालून दुसरीकडे निघून जा

हें काम भयंकर धाडसाचें यांत शंका नाहीं. पण रमेशला त्याचें इतकेसें वाटलें नाहीं, कारण त्यानें तसें काम पूर्वी कॉलेजांत असतांना केलें होतें. हे लोक उगीचच गाजावाजा करून व भपक्यांत लोकांचें पैसे उकळतात अशी त्याची दृढ समजूत झाली व त्या सर्कस मालकाच्या घमेंडखोर भाषणाचा त्याला रागही आला. आजूबाजूला दृष्टी फिरविली तेव्हां त्याच्या लक्षांत आलें कीं जवळ जवळ २००० लोकसमुदाय हीं कामें पहाण्यास आला आहे.

टाळ्यांच्या कडकडाटांत त्या घोडेस्वारांचे काम संपलें. तेव्हां मालक पुन्हां एकदां रिंगमध्यें येऊन तशा तऱ्हेचें काम करण्याबद्दल आव्हान देऊं लागला. एक क्षणभर सर्वत्र कमालीची शांतता होती. नंतर तो मालक हंसून पुन्हां म्हणाला. " काय येवढ्या समाजांत असा एकही वीर पुरुष निघत नाहीं ! "

'रमेशला यापुढें थांबणें शक्य नव्हतें, तो एकदम उठून ओरडून म्हणाला, " मी ते काम करून दाखवितो."

रमेश जाग्यावरून उठून असे बोलेल ही कोणालाच कल्पना नव्हती. सर्व प्रेक्षक त्याच्याकडे बघू लागले. शालिनी शेजारीच बसली होती तिनें त्याचा हात खालीं ओढला व त्याला खुर्चीवर बसवून म्हणाली " रमेश तुम्ही केवढा घोटाळा करून ठेवला आहेत हा ! तुमच्या मनावर एवढा कसा ताबा नाहीं ! सर्कसची ती बाब काय आणि त्याकरतां तुम्ही आपला जीव काय म्हणून धोक्यात घालतां ! कॉलेज सोडल्यापासून तुम्हांला असल्या कामाची संवय नाहीं तेव्हां नसतें साहस करूं नका. आपण सर्कसला आलो नसतों तर बरें झालें असतें असें मला वाटूं लागलें आहे. "

नारायणराव त्यांच्याजवळ वाकून म्हणाले " रमेश अरे येवढें स्वतःचें मन तुला ताब्यांत ठेवतां येत नाहीं मग सर्व सैन्यांतील लोकाची मनें कशी तुझ्या आधीन रहाणार ! "

" खरेंच रमेश " नारायणरावांची पत्नी त्याच्याकडे पहात म्हणाली, "तुम्ही शांतपणें बसा आम्ही सर्कसवाल्याला खेळ पुढें सुरूं करण्यास सांगतो."

रमेशला या मंडळींचे बोलणें ऐकूं होतें का नाहीं कोणास ठाऊक तो मालकाकडे सारखी टक लावून पहात होता.

सर्कसचा मालक मात्र मनांत थोडा दचकला; पण त्या इसमाला त्याची

मंडळी मागें खेचत आहेत तेव्हां त्याला काम करण्याचा धीर होणार नाहीं अशी आशा वाटून तो थोडा पुढें झाला व रमेशला उद्देशून म्हणाला, " मिस्टर जरा रिंगमध्यें या. "

एकदा पुढें टाकलेलें पाऊल मागें घेणें नामुष्कीचें काम आहे असा विचार करून त्या मालकानें बोलावतांच तो पुन्हां उठून उभा राहिला. नारायणराव व शालिनीनें त्याला पुन्हां बसविण्याचा प्रयत्न केला त्यावेळीं मालक हंसून म्हणाला " मिस्टर थट्टेची गोष्ट नाहीं, यांत जीव जाण्याचा प्रश्न आहे, तुमच्या प्राणाबद्दल आम्ही जबाबदार नाहीं असे आम्ही या सर्व प्रेक्षकासमक्ष जाहीर करतो. तेव्हा विचार करून या उगीच फुकाची तोंडाची वाफ दवडूं नका. तुम्ही अद्याप बरेच कोवळे दिसता, तेव्हां असली कामें तुम्हांला योग्य नाहींत. "

रमेशला तो अपमान सहन झाला नाहीं त्यानें आपला हात शालिनीच्या हातून सोडवून घेतला व रिंगमध्यें उडी टाकली. सर्व प्रेक्षकांतून टाळयांचा कडकडाट झाला. तो थांबवून मालक म्हणाला " सर्व प्रेक्षक मंडळींनीं या गृहस्थांचें म्हणण्यापेक्षां या मुलाचें काम पहावे याला मी पोषाख करून आणतो. यांच्या जीवाची मात्र आमच्यावर जबाबदारी नाहीं, हे पुन्हां एकदां निक्षून सांगतो, चला मिस्टर आंत चला थोडा पोषाख बदला. "

जाग्यावरून न हालतांच रमेश म्हणाला " तुमचा घोडाच मागवा, या कामाला पोषाख बदलण्याची जरुरी नाहीं. "

बोलतां बोलतां त्यानें आपल्या अंगातील कोट व शर्ट काढून खुर्चीवर ठेवले यावेळीं त्याच्या अंगांत फक्त गंजीफ्राक होता. मालकही त्याच्या धाडसाबद्दल फार आश्चर्यचकित झाला, इतकेंच नाहीं तर त्याला त्याबद्दल कौतुकही वाटलें. पहिल्या प्रथम घोडयाला भरधांव सोडावा असें त्याच्या मनांत आलें पण नंतर त्याचा तो बेत बदलला. रिंगमध्यें घोडा येतांच त्यानें स्वतःच हातांत चाबूक घेतला. घोडयाची रिंगमध्यें एक फेरी होतांच रमेश घोडयावर उडी मारण्याच्या तयारीनें उभा राहिला.

प्रेक्षकांचीं अंतःकरणें अगदीं थरारून गेलीं होतीं. आतां पुढच्या क्षणाला होणार तरी काय ? याची कोणालाच कल्पना होईना. रमेशनें

घोड्याच्या पाठीशिवाय कोठेंच लक्ष दिलें नाहीं व वेळ येतांच धांवत जाऊन एका क्षणांत तो घोड्यावर स्वार झाला.

घोडा चांगला उंच असल्यामुळें रिकीबींत पाय अडकवून खालीं डोकें करायला बराच वाव होता. नवखा मनुष्य पहातांच घोडा बिचकूं लागला. त्याबरोबर मालकानें चाबूक वाजवून त्याला स्थिर केलें. घोडा चांगला स्थिर होईपर्यंत रमेशनें त्याला २।३ फेऱ्या घालूं दिल्या. नंतर एकदम रिकीबींत पाय अडकवून त्यानें डोकें खालीं केलें.

तंबूंत कमालीची शांतता पसरली. शालिनीच्या छातींत कांहीं अडकल्या-सारखें वाटून ती घाबरल्यासारखी झाली व एकदम उठून उभी राहिली. तिला घोड्याकडे पहाण्याचें धैर्य होईना. दुसऱ्या क्षणाला लोकांच्या आरो-ळ्यांनीं व टाळ्यांच्या कडकडाटांनीं सर्व तंबू हादरून गेला. नारायणराव व शालिनी धांवतच रिंगमध्यें गेली.

रमेश कपाळाचा घाम पुशीतच घोड्यावरून खालीं उतरला. नारायण-रावांना पहाताच त्याने पुढ होऊन त्यांच्या पायावर डोकें ठेवलें, त्यांनीं त्याला ताबडतोब वर उचलून घेतलें. शालिनीच्या डोळ्यांतून यावेळीं आनंदाश्रु बाहेर पडत होते. रमेशच्या रेजिमेंटचे सर्व लोक आंत घुसून त्यानीं त्याला आपल्या डोक्यावर घेऊन नाचण्यास आरंभ केला पण नारायणरावांनीं हुकूम करतांच ते लोक नाइलाजानें आपल्या जागीं गेले.

याचवेळीं मालक पुढें येऊन त्यानें रमेशची पाठ थोपटली व अंतःकरण-पूर्वक हस्तांदोलन केलें. फार गडबड झाली आहे असें पाहून मालक रमेशला व नारायणराव व त्याच्या मंडळीना आपल्या खांजगी तंबूत घेऊन गेला व त्यानें तिकडे खेळ पुढें सुरू करण्याची आज्ञा केली. त्याबरोबर पुन्हां स्थिरस्थावर झालें.

मालकानें चटदिशी एक हार आणवून रमेशच्या गळ्यात घातला व एक हजार रुपयाचा चेक फाडून दिला. पण रमेशनें तो घेण्याचें विनयपूर्वक नाकारलें. तो म्हणाला "मी आतां जी गोष्ट केली ती शहराचा अभिमान म्हणून केली. बक्षिसाच्या आशेनें केली नाहीं." पण सर्कसच्या मालकानेंही आग्रह धरला. त्याचें म्हणणें पडलें कीं, आमच्या इभ्रतीकरतां तरी

आम्हाला पैसे देणें भाग आहेत. मी उघड आव्हान दिलें होतें व तें पुरें करणें मला प्राप्त आहे. त्या बाबतींत तुमची इच्छा असो वा नसो."

शेवटीं हो ना करतां करतां ती रक्कम विश्रामबाग कॉलेजच्या व्यायाम शाळेला देण्याचें ठरले व त्याप्रमाणे मालकानें परत तंबूत येऊन तसें जाहीर केलें; त्यावेळीं पुन्हां एकदां टाळ्याचा प्रचंड कडकडाट झाला.

आतां जास्त वेळ खेळ पहात बसण्याइतकी मंडळींची मनें स्वस्थ नव्हतीं. म्हणून तेथूनच मालकाचा निरोप घेऊन ते सर्वजण बाहेर पडले. मालकानें जातांना कांहीं जरुरीच्या कामाकरता भेटणार आहे म्हणून रमेशला सांगून ठेवलें व त्यानेंही भेटण्याचें कबूल केलें.

ती बायका मंडळी मोटारींत बसल्यावर रमेश आंत शिरूं लागला इतक्यांत त्याच्या हातांत कोणी तरी चिठ्ठी आणून दिली. चिठ्ठी कोणी दिली हें विचारण्याच्या आतच तो इसम पसार झाला. बाहेरच्या दिव्याच्या उजेडांत तो चिठ्ठी वाचूं लागला. मजकूर सर्कसच्या हँडबिलाच्या पाठी-मागल्या बाजूला लिहिला होता. तो अत्यंत घाईनें लिहिला असल्यामुळें त्याला तो लावून वाचण्यास वेळच लागला.

चिठ्ठींत पुढील मजकूर इंग्रजींत लिहीला होता.

" Hearty congratulations for your heroic deed Accept my most sincere wish for your furture prosperity
Poornendu

याच पत्राच्या खालीं आणखी दोन ओळीं होत्या.

Be like a flower, give out always the perfume of love and joy. P.

" कसली चिठ्ठी " शालिनीनें विचारलें.

न बोलतांच रमेशनें ती चिठ्ठी तिच्या हातात दिली ती वाचतांच एकच क्षण तिच्या कपाळाला आठ्या पडल्याचा भास झाला, नंतर ती हंसून म्हणाली " आई ही पाहिलीत कां रमेशनें ज्या स्त्रीला बन्नूला सोडविलें ती स्त्री आज सर्कसला आलेली दिसते, तिनें आज चिठ्ठी पाठवून रमेशचें अभिनंदन केलें आहे."

" खरंच कां ! रमेश तिला एकदा भेटा तरी "

" शालिनीनेंच मनावर घेतलें तर शक्य आहे, नाहीं तर या गोषांच्या माऱ्यापुढें मला कुणाचा चेहरा सुद्धां दिसणार नाहीं.

" अरे कोठें कुठें गोषा आहे ?"

" तरी पण एखाद्या स्त्रीला भेटणें गुन्हा आहे. "

" बरें आपण उद्यां दोघेही तिचा शोध करू. "

बाहेर कोणाशी तरी बोलत असलेले नारायणराव इतक्यांत आल्यामुळे त्यांचे बोलणें तितकेंच राहिलें.

मोटार चालू झाल्यावर संधी साधून शालिनी हळूच म्हणाली " रुमाल जाग्यावर आहे ना पहा नाहीं तर मला आणखी एखादा द्यावा लागेल. "

रमेशलाही ती धास्ती पडली. त्याने चटदिशी खिशांतील रुमाल काढला व तो शालिनीनेंच दिलेला आहे असे पाहून त्याला हसूं आले. शालिनीही मनापासून हंसली. ती पुन्हा हंसून म्हणाली " यावेळीं तिचा तुमच्या खिशापर्यंत हात पोहोचलेला दिसत नाहीं. पत्रावरून ती बरीच शिकलेली दिसते. "

" असें वाटतें खरें, पण उद्यां तिच्या शोधाला येणार ना ? मी अगदीं उजाडत येतो. "

" इतके कांहीं उतावीळ नको व्हायला ! "

रमेशनें नुसतेंच तिच्याकडे रागानें पाहिलें पण त्या रागाला उत्तर म्हणून शालिनीनें नुसतें स्मित केलें.

दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणे त्या दोघानीं वीणाशंकर व त्या मुलीचा शोध केला तेव्हां कळलें कीं ती मंडळी आली होती हे खरे पण आज सकाळच्याच आगगाडीनें ते परत गेले.

यावेळींही पूर्णेंदूचा चेहरा पहाणें रमेशच्या नशिबीं नव्हतें.

# “ बागेंतील भेट ” १०

सातव्या प्रकरणांत घडलेल्या गोष्टीला एक वर्ष होऊन गेलें. त्या वर्षांत कितीतरी स्थित्यंतरे झालीं.

आई वारल्यामुळें रमेश सैन्यांत प्रामिलेला न कळवितांच दाखल झाला. व आतां एकदर तेथील परिस्थिती पाहून व सुशिक्षित लोकांना तो प्रांत साधारणपणे वर्ज्यच आहे असे अनुभवाला येऊन तो तेथून कसें निसटून जावें याचा विचार करीत होता. याच सुमाराला कॅप्टन नारायणराव याचे सैन्यांतील एका अधिकाऱ्यांशीं शालिनीच्या लग्नाबद्दल बोलणें चाललें आहे असे त्याला कळलें. या एकंदर परिस्थितीला कटाळून तो कोठूनहून कांहीं दिवस रजेवर जाण्याचा विचार करूं लागला व त्याप्रमाणें त्यानें शालिनीमार्फत नारायणरावांच्याकडे बोलणें केलें व एक महिन्याची रजा मिळवून तो आपल्या गावीं जाण्याच्या तयारीला लागला.

जाण्याच्या आदल्या दिवशीं त्यांचे व नारायणरावाचे बराच वेळ गुप्त खलबत चाललें होतें. तें बरेंच गुप्त असल्यामुळें शालिनीनें त्याबद्दल माहिती काढण्याचा बराच प्रयत्न केला तरी रमेशने कांहीं एक दाद लागूं दिली नाहीं त्यामुळें चिडून तिनें त्याच्याशीं बोलणें वर्ज्य केलें, तिचा राग आपण केव्हाही घालवूं अशी खात्री असल्यामुळें त्यावेळीं तरी तो तसाच आपल्या घरीं गेला.

इकडे किस्मतपुरांतही थोडीशीं घडामोड झाली. गुलाब व पद्माही मय-

सभेत—सिनेमा जगांत गेली होती. वसंतरावांनीं त्यांची चांगल्या तऱ्हेची सोय लावून दिली होती त्यामुळें ते खुशींत होते.

आपल्या गांवीं जाण्याचें आधीं एकदां वीणाशंकरला भेटून जावे असें रमेशच्या फार मनात होतें, त्याप्रमाणें त्यानें एक पत्र पाठवून तो तिथें आहे कां नाहीं हें विचारलें होते. त्याचें त्याला तिसऱ्या दिवशींच उत्तर आलें.

पत्र वीणाशंकरचें नसून पूर्णेंदूचे होतें. त्यामुळे त्याला विशेष आनंद झाला पण पत्र वाचतांच तितकीच निराशा झाली. पत्रांत पुढीलप्रमाणें इंग्रजींत मजकूर होता.

'पत्र मिळालें. फार आनंद झाला व तुम्ही जाणार म्हणून वाईटही वाटलें. बाबा जरूरीच्या कामानिमित्त परगांवीं गेल्यामुळे आपण उद्या आल्यास गाठ पडणार नाहीं याबद्दल दिलगीर आहे. आपल्या गांवचा पत्ता कळवल्यास बाबांना त्या गावीं समक्ष अगर पत्रद्वारे भेटता येईल.

पूर्णेन्दु.

बन्नूला जाणें आतां शक्य नव्हतें. वीणाशंकरच तेथें असतां म्हणजे कांहीं तरी निमित्ताने तेथें जाऊन पूर्णेंदूची गांठ घेण्याचा प्रयत्न करता आला असता पण आजच्या पत्राने तो रस्ताच बंद झाला. तरी पण तिच्या सूचनेंप्रमाणें त्याने एक पत्र पाठवून आपल्या गांवचा पत्ता कळविला होता.

आज दुपारच्या गाडीनें निघायचें तेव्हां सकाळींच तो कॅप्टन नारायणरावाकडे गेला. ते आज परेडला गेले असल्यामुळें मायलेकीच घरांत होत्या. रमेशने खूण करून शालिनीला बागेंत बोलावले. तिचा काल बातमी न सांगण्याबद्दलचा राग होताच तरी पण ती बागेंत आली व एका जाईच्या वेलाशी उभी राहून रमेशाकडे न बघतां ती त्या वेलीची फुलें तोडू लागली. पहिल्या प्रथम तिनें कांहीं तरी बोलण्यास सुरुवात करावी या इच्छेनें रमेश क्षणभर थांबला पण त्याची इच्छा सफल होण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं त्या स्तब्धतेचा भंग करून तो म्हणाला " शालिनी मी आज दुपारीं गांवीं जाणार आहे. जाऊं ना ? "

" गेलात किंवा राहिलात तरी तुमचे तुम्ही मालक, मला कशाला विचारता ! आणि मी कोण ! "

" अरे, कालचा राग अजून गेला नाहीं वाटतें. इतका वेळ राग टिकल्याचें आज मी प्रथमच पहातो आहे. "

" आणि माझ्यापासून कांहीं चोरून ठेवण्याची गोष्ट मी सुद्धां कालच प्रथम पाहिली. "

" असे काय बरें शालिनी, कांहीं तशाच कारणाशिवाय कां मी गोष्ट गुप्त ठेवीन ?"

" म्हणजे माझ्यावर तुमचा विश्वास नाहीं असेंच ना ! "

" असा भलता ग्रह करून घेऊ नकोस. तुझ्या वडिलांचीच तशी मला आज्ञा आहे."

" बाबांच्या आज्ञेप्रमाणेंच तुम्ही माझ्याशीं आजपर्यंत बोलत आलात वाटतें."

" शालिनी, मला असें अडवूं नकोस. खरेंच ते कारण तसें महत्वाचें व गुप्त आहे, "

" पण मी कुठें म्हणते आहे सांगा म्हणून ! आम्ही बोलून चालून बायका, आमच्या तोंडांत गुप्त गोष्ट कशी रहाणार ! "

" शालिनी, कमाल आहे तुझ्या हट्टीपणाची. "

" मी आहे ही अशी आहे, स्वभाव आवडत नसला तर कुणी बोलण्याचा आग्रह कां केला आहे ? "

" शालिनी तुला इतकें तोंडून बोलवतें तरी कसें कुणास ठाऊक ! बरं आहे आतां काय होईल तें होवो मी सांगण्याचें ठरविलें आहे. "

" येवढी परिणामाची भीति वाटते तर सांगण्याचा कुणी आग्रह कां केला आहे ? "

" हें पहा शालिनी पूर्वीचे शब्द बोलण्यांत मी चूक केली असें कबूल करतो मग तर झालें, मी तुला सर्व कांहीं सांगतो पण एकदां इकडे बघ आणि आनंदानें निरोप दे."

शालिनीच्या चेहऱ्यावर हास्य दिसूं लागलें. इतका वेळ ती जाईच्या फुलाकडेच बघत होती पण आतां त्याच्याकडे वळून म्हणाली,

"माझ्यापासून गोष्टी लपवून ठेवतां नाहीं कां? पण मी म्हणते तुम्हाला इतका निष्ठुरपणा करविला तरी कसा!"

"शालिनी, जाऊं दे तो वाद. हें बघ सैन्यातला कामाचा मला कंटाळा आला आहे हें तुला माहीतच आहे."

"हो माहीत आहे आणि माझी इच्छा सैन्यांत राहून तुम्ही नाव कमवावं ही आहे हेही तुम्हाला ठाऊक आहे."

"हो अगदीं अक्षरशः खरे आहे. पण मी काय करूं! येथील लोकाशीं अरेरावीनें वागणें, अधिकार गाजविणें, मला जमत नाहीं."

"पण संवयीनें तुम्ही तयार व्हाल. मी तुम्हाला कसें वागायचे तें शिकवीन.

"तुझ्यापासून शिक्षण घेण्यास तूं फार दिवस येथें रहाशील असें मला वाटत नाहीं. तितका मी नशीबवान नाहीं."

"अस्सं! तुम्हाला या संशयाच्या भुतानें पछाडलेलें दिसतें. तुमच्यापुढें कनी अगदीं डोकें आपटून घ्यायची वेळ आली आहे."

"शालिनी माझ्यापासून का लपवून ठेवतेस! तुझे लग्न ठरलें नाहीं! तुझ्या भावी नवऱ्याचें नांवसुद्धां मला माहीत आहे."

"तुम्हाला मी हजारदा सांगितलेंना, कीं या गोष्टीबद्दल उगाच मनाला त्रास करून घेऊं नका. तुम्ही आपली बढती भराभर मिळवा म्हणजे तुमच्या माझ्यामध्यें कोणीही येणार नाहीं."

"शालिनी ती आशा आतां व्यर्थ आहे."

"कां?"

"तीच तर गुप्त गोष्ट आहे."

"म्हणजे मी नाहीं समजलें, गुप्त गोष्ट मला सांगण्यासारखी नाहीं वाटतें? बरें नका सांगूं."

"एकदा तसा विचार होता पण आतां सांगतोच."

तो काय सांगणार आहे हें ऐकण्याकरतां शालिनी अधीर झाली होती.

आजूबाजूला कोणी नाहीं असें पाहून रमेश हलक्या आवाजांत म्हणाला "शालिनी, सैन्यांतलि नोकरी सोडून देण्याचा निश्चय करून काल मी तुझ्या वडिलाची गाठ घेतली. सैन्यांत एकदा दाखल झाल्यावर मुदत संपल्याशिवाय कोणत्याही कारणानें बाहेर पडतां येत नाहीं तेव्हां कशा रीतीनें बाहेर पडावें या बाबतींत आम्ही विचार करीत होतों."

"आणि बाबांनीं तुम्हाला जायला परवानगी दिली ?"

"पहिल्या प्रथम माझा विचार सांगितल्यावर ते अतिशय रागावले, पण माझा एकंदर स्वभाव, विद्येची आवड व त्याचप्रमाणें एक मोठी नोकरी आलेली पाहून त्यांनीं मोठ्या नाखुषीनें माझ्या म्हणण्याला सम्मती दिली."

"कसली नोकरी !"

"मध्यंतरीं येथें रशियन सर्कस येऊन गेली ना ! त्या दिवशींचें काम पाहून त्याचा मालक एक दिवस माझ्याकडे आला होता व त्यांनीं मी सर्कसमध्यें यावें अशी विनंती केली."

"त्याची विनंती मान्य करणें कसें शक्य नाहीं हें मी त्याला नीट समजावून सांगितलें "पण हे लोक महा उलाढाली असतात व त्यांच्या ओळखीही वाटेल तेथें असतात. तो म्हणाला कीं कांहीं तरी कारण दाखवून Dischare मिळण्याबद्दलच्या अर्जावर खालच्या अधिकाऱ्याकडन recommendations आण म्हणजे पुढचें मी पहातो."

"अगबाई, काय पाताळयंत्रीपणा हा. बरं पुढें."

"दोन दिवस विचाराला मी सवड मागून घेतली त्यावेळीं तो म्हणाला, "आतां फार विचार करूं नका. आमची सर्कस येथें आहे तोपर्यंतच अर्ज जाऊ द्या म्हणजे वरिष्ठ अधिकाऱ्यांना भेटायला मला ठीक पडेल."

"पण सर्कशीत असा पगार तो काय मिळणार ! आणि तुम्हाला तो काम तरी काय देणार !"

"त्या कोसाक्ससारखीं कामें मला करतां येणार हें पाहून त्या लोकांना आतां चांगलाच वचक बसला आहे असं तो मालक म्हणत होता. प्रत्येक वर्षी ते भरमसाट पगार वाढविण्याकरतां अडून बसत असत व असलीं कामें दुसरें कोणी करणार नसल्यामुळें नाइलाजानें त्यांचा पगार त्याला

वाढवावा लागत असे. आतां मी तेथें गेल्यावर त्यांचे मागणें बंद होईल असें त्याचें म्हणणें पडलें पैशाच्या दृष्टीनें हा मोठाच फायदा असल्यामुळें सध्यां मी असिस्टंट मॅनेजरचें काम करावें; व जरूर वाटल्यास एखादे वेळेस सर्कशींत काम करावें असें ठरलें व त्याकरतां तो प्रारंभीं २०० रुपये देऊन २।३ वर्षांत ४०० रुपये करणार आहे."

"मग तुम्ही काय ठरवलेंत !"

"सर्कसमुळें पुष्कळ देश पहायला मिळतील व त्याबरोबर पैसाही भरपूर मिळेल असें वाटून मी ती गोष्ट कबूल केली पण माझ्या बहिणीला विचारून नक्की काय तें एक महिन्यांनीं कळवीन असें त्याला सांगितलें व त्याकरतां एक महिन्यांची रजा घेतली आहे. रजा घेण्यांत दुसराही हेतू आहे. माझा अर्ज येथून न पाठवितां गावाहून पाठवावा असें कॅप्टन् साहेबानीं सुचविलें आहे व त्याप्रमाणें मी तेथें गेल्यावर अर्ज करणार आहे व त्याचवेळीं सर्कसच्या मालकालाही अर्ज केल्याबद्दल कळविणार आहे म्हणजे तो इतर गांवीं असला तरी मुद्दाम कोल्हटला येऊन वरिष्ठ अधिकाऱ्याला भेटेल. पण या सर्व गोष्टी वरिष्ठ अधिकाऱ्याच्या लहरीवर अवलंबून आहेत."

"इतक्या सर्व गोष्टी करून मला आतां शेवटीं सांगावयाला येतां कां ! हीच कां तुमची माझ्याबद्दलची आस्था !"

"त्या सर्कसच्या दिवसानंतर तूं मला भेटलीच नाहींस. एक दोनदा मी प्रयत्न केला पण तूं एकटी अशी कधींच सांपडली नाहींस त्याला मी तरी काय करूं. ज्यास्त वेळ थांबायला वेळ नसल्यामुळें मला तुझ्या विचारा-शिवाय सर्व गोष्टी कराव्या लागल्या."

"पण त्याचें प्रायश्चित्त आपल्या दोघांना चांगलें मिळेल हें लक्षांत ठेवा. मला थोडी तरी आधी कल्पना द्यायची होतीत !"

"कसलें प्रायश्चित्त !"

"आपल्या दोघांच्या लग्नांत तुम्ही केवढें विघ्न उपस्थित केलें आहे याची तुम्हाला कल्पना तरी आहे का ! तुम्ही नोकरीवर असतां व दुर्दैवानें तुम्हांला आणखी बढती मिळाली नसती तरी मला हट्ट करायला जागा

होती. आतां मी कोणत्या तोंडानें तुमच्याशींच मला लग्न करायचें आहे म्हणून सांगूं !"

"खऱ्या प्रेमाला या सर्व गोष्टी शक्य आहेत."

"कादंबरींत लिहायला या गोष्टी सोप्या आहेत पण प्रत्यक्ष कृतीचा प्रसंग आला म्हणजे त्यात किती अडचणी असतात याची असल्या कादंबरी लेखकांना कल्पना नसते."

"तूं हट्ट घेतल्यावर, बाबासाहेब खास नाहीं म्हणणार नाहींत !"

"त्याचा काय नेम. पाहिली गोष्ट आपलें एकमेकावर इतकें प्रेम आहे हें त्यांना माहीत नाहीं. दुसरी गोष्ट म्हणजे त्याना लष्करी खात्याची फार आवड, त्यामुळें नवरामुलगा लष्करी खात्यांतलाच असला पाहिजे ही त्यांची पहिल्यापासूनची अट. तिसरी गोष्ट म्हणजे त्यांचा विलक्षण रागीट व करारी स्वभाव. या सर्व अडचणींतून मार्ग कसा काढायचा हें तुम्हीच सांगा ?"

"माझ्या बरोबर येण्याची तुझी तयारी आहे कां ?"

"तुमच्या बरोबर जगांत कुठेंही येण्याला माझी तयारी आहे पण पाऊल टाकताना आपल्याला विचार करायचा हवा. बाबा रागांत असले म्हणजे त्यांना भान रहात नाहीं. एखादे वेळ आत्महत्त्या करायला सुद्धां चुकायचें नाहींत, तुम्ही नागपुराकडील एक उदाहरण वर्तमानपत्रांत वाचलें असेलच ! बापाच्या इच्छेविरुद्ध मुलीने हट्टाने लग्न केल्यामुळें आईबाप दोघांनींही आत्महत्त्या केली. यात मुलीनें स्वार्थाशिवाय काय पाहिलें. तिला त्या लग्नाच्या बाबतींत तिच्या वडिलांची सुद्धां परवानगी मिळविता आली असती पण आमच्या लग्नांत वडिलानीं हात घालण्याचें कारण काय या उद्दाम वृत्तींतच तिच्यावर मातृ–पितृहत्त्येचें पातक बसलें.

"मग तुझें म्हणणें तरी काय ?"

"तुम्हीं नोकरी न सोडतां इथें रहा म्हणजे कोणाची आडकाठी न येतां सर्व गोष्टी सुरळीत होतील."

"शालिनी, तें आतां शक्य दिसत नाहीं; तरी पण मला विचार करायला अवधी दे, मी आज दुपारच्या गाडीनें घरीं जातो, प्रमिलाताईच्या सम्मतीनें काय तें नक्की ठरवून मगच अर्ज करतो, नाहीं तर नोकरीवर हजर होतो."

" फारसा विचार न करता हजरच व्हा. "

" पण आतां एक महिन्याचा अवकाश आहेच. जाऊ मी आता ? "

" जा, पण मी सांगितलेले लक्षांत ठेवा."

" ठेवतो. पण कल्पना कर कीं ताईनेंही नोकरी सोडण्याला सम्मती दिली तर काय करायचें ? "

" ती कल्पनाच मला असह्य होते, तुम्ही आला नाहीं तर मी कोणाकडे पाहूं ! माझा रुसवा कोण काढील ! रमेश इतके निष्ठुर होऊं नका, तुम्ही आला नाहींत तर बाबाचे मन वळवणे मला फार कठीण जाईल. आणि त्यानीं नाहीं ऐकले तर...तर माझें काय होईल याची कल्पनाच होत नाहीं. रमेश, कसेही करून तुम्ही याच. "

" मी प्रयत्न करून पहातो. या बाबतींत कॅप्टन् साहेबाना मी बोलूनही टाकलें आहे. असो तिथे गेल्यावर काय तें नक्की ठरवीन. मी परत येईपर्यंत मला विसरूं मात्र नकोस. "

" विसरण्याची भाषा माझ्यापेक्षां तुम्हालाच ती जास्त लागू आहे; तुम्हीच तेथे जाऊन कुणाशी तरी पटकन् लग्न करून टाकूं नका म्हणजे झालं. "

" जणूं काहीं लग्न म्हणजे पोरखेळ आहे असच ना."

" पुरुषाच्या बाबतींत असंच तर काय ! "

" जाऊं दे हा वाद; माझें मन आज स्वस्थ नाहीं नाहीं तर मी याला चांगले उत्तर दिले असते. जाऊं आतां मी ? आता परवानगी आहे ना ! "

" जा व फिरून लवकर परत या. मी सारखी वाट पहात आहे."

" तुझ्या या प्रेमळ वर्तनानें माझे मन गोंधळून गेलें आहे. या उगवत्या सूर्याला साक्षी ठेवून सांगतो कीं मी तुला विसरणे कधीही शक्य नाहीं."

" मीही पण परमेश्वरालाच साक्षी ठेवून सांगते कीं तुम्ही कोठेही कशा स्थितींत असा दुर्दैवाने तुमचे माझें लग्न होवो अगर न होवो या शालिनीच्या हृदयांत तुमचीच मूर्ती नेहमी वास करील यापेक्षां जास्त काय सांगूं. "

शालिनीचा कंठ दाटून आला. डोळे पाण्यानें भरले. रमेशचीही तीच

अवस्था झाली. यावेळीं त्यानें शालिनीचे हात आपल्या हातांत घेतले होते ते जड अंतःकरणानें सोडून देऊन तो तेथून परतला.

शालिनीच्या आईला भेटण्याच्या मनःस्थितींत तो नसल्यामुळें तो तसाच आपल्या बराकीकडे वळला.

# "शेरखानाचा नवा अवतार" ११

ती रात्र अमावास्येची असल्यामुळें सर्वत्र अंधःकार पसरला होता. नागपूर मेल अशा अपरात्रीं XXX पूर शहराच्या स्टेशनवर येत असल्यामुळें तेथे उतरणाऱ्या उतारूंची फारच गैरसोय होत असे, त्यामुळे त्या गांवाला उतरणारे पॅसेंजर मेलनें न येतां मागच्या Express नें येत. पण तितकें जरूरीचेंच काम निघालें म्हणून आजच्या असल्या काळोख्या रात्रीं दोन उतारू त्या स्टेशनावर उतरले.

अ,समंतात जरी मिट्ट काळोख होता तरी स्टेशनावर विजेच्या लख-लखाटामुळे शुभ्र चांदण्यासारखा प्रकाश पडला होता. हमालाबरोबर सामान देऊन ते दोघे उतारू हळुहळू निघाले. त्यांत एक स्त्री होती ती म्हणाली, " या गाडीनें येण्याचें उगीच काढलेंत, बाहेर कोण काळोख आहे. निदान प्रमिलाताईला आधी कळवायचे तरी होतेत म्हणजे ती स्टेशनावर तरी आली असती ! "

" मला दिवसा प्रवास करायला वेळ कुठें आहे ! एक वेळ प्रमिलेला तारेनें कळवावें असे माझ्या मनांत होतें पण त्यामुळे तिला मात्र उगीचच स्टेशनावर अशा अपरात्रीं यावें लागलें असतें. शिवाय झोपमोड झाली असती ती निराळीच. आतां आपण घरीं जातो तों एक वाजायला येईल त्यावेळेपर्यंत तिची पहिली झोंप तरी पुरी झाली असेल तेव्हां आतां उठ-विलें तरी तिची फारशी झोपमोड होणार नाहीं ! "

" खरेंच तुम्ही पूर्वी रात्रीच्या रात्रीं अशा अंधारांत जागून काढल्या आहेत

नाहीं ! तुमचा तो वेष, ती डोळ्यावरची पट्टी वगैरे गोष्टीची आठवण झाली कीं अंगावर शहारे येतात. काय तुमचें ते पूर्वीचें आयुष्य !

" पण त्या धाडशी वृत्तीमुळें मला उषेसारखी मुलगी मिळाली ना, नाहीं तर मला शेरखान म्हणूनच रहावें लागलें असतें."

" तसें नव्हे उषा नसती तर शेरखानाना प्रमिलाच मिळाली असती खरें ना हें ? मी मधेंच येऊन तुमचा घोटाळा मात्र केला."

वरील भाषणावरून ते दोन उतारू म्हणजे श्रीकांत व उषा आहेत हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. यावेळीं ते प्लॅटफार्मच्याबाहेर आल्या-मुळें त्यांचें बोलणें तितकेंच राहिलें.

एका व्हिक्टोरियांत सामान टाकून व हमालाला रजा देऊन ते प्रमिले-च्या घराकडे निघाले. उषेनें शेरखानाचे नांव काढल्यामुळें श्रीकांताला त्याच्या पूर्व चरित्राची आठवण झाली यावेळीं एकदम कांहीं कल्पना येऊन तो म्हणाला " उषा, माझ्या मनात एक अद्‌भूत गोष्ट आली आहे. तूं मघाशीं शेरखानाचें नांव काढल्यापासून माझ्या मनानें घेतलें आहे कीं आज प्रमिलेच्या घरांत शेरखानाच्या वेषानें प्रवेश करावा."

" कांहीं नको, उगीच ती घाबरून जाईल; पूर्वीचा तिचा तो धीटपणा आतां उरला नाहीं आणि शिवाय तुमच्याजवळ यावेळीं शेरखानाचा वेष घेण्याइतक्या सामानाची तयारीहि नाहीं."

" मी नुसती डोळ्याला पट्टी बांधतो म्हणजे झालें; शिवाय घरांत मुख्य दारानें न शिरतां खिडकींतून उडी टाकण्याचा माझा विचार आहे."

" तुम्ही सध्यां किस्मतपुरांत नाहीं हें विसरतां, तेथें शिपायी लोकांचें इतकें लक्ष नव्हतें इथें एक करतां दुसरीच कांहींतरी भानगड उपस्थित व्हायची."

" तूं अगदींच भित्री बोवा, तुझा भित्रा स्वभाव केव्हां नाहींसा होणार आहे कुणास ठाऊक."

" सिनेमांत काम करायला लागल्यावर."

" वा, सिनेमांत काम करायची तूं बरीच तयारी केलेली दिसते."

" तुमच्या इच्छेकरतां मी काय करणार नाहीं."

" उषे माझ्याकरतां तूं काय करायचें ठेवलें आहेस."

" जाऊं द्या तो विषय हें पहा ताईचें घर जवळ आलें."

" उषा खरेंच, मी होऊं कां शेरखान ? "

" नको गडे, उगीच कां तिला भेवडवितां ! ती यावेळीं चांगली गाढ झोपेंत असेल तेव्हां विनाकारण तिला घाबरवून उठविण्यांत काय मौज आहे ! यांत तुम्हांला काय आनंद वाटतो."

" काय आनंद वाटतो ! उषे तूं शेरखानाच्या स्वरूपांत प्रमिलेपुढें उभे राहिल्याशिवाय ती गंमत तुला नाहीं कळणार. अरे पण हें काय ! यावेळीं तिच्या माडीवर दिवा कसा ! "

" खरेंच कीं; आतां तरी तुमचा शेरखानाचा वेष उपयोगी पडणार नाहींना. पण इतक्या उशीरा दिवा कां ! "

यावेळीं व्हिक्टोरिया तिच्या बंगलीपर्यंत आली होती. गडीमाणसांना वगैरे कोणाला हाक न मारतांच दोघांनी आंत जाण्याचे ठरविलें व त्या-प्रमाणें गाडीवाल्याचे पैसे चुकते करून ते दोघे सामान घेऊन आंत आले.

खोट्या शेरखानाच्या ऐवजीं यावेळीं खरोखरच एक शेरखान प्रमिलेच्या बंगल्यांत शिरला होता. खिडकी उघडी पाहून त्यानें तींतून आंत प्रवेश केला. पण त्याच्या आवाजामुळें जागी होऊन प्रमिलेनें चटकन बटन दाबलें; त्यामुळें सर्व दिवाणखान्यांत प्रकाश पडून प्रमिलेला एक दाढीवाला मुसलमान हातांत बंदुक घेऊन उभा असलेला दिसला. एकच क्षण ती गोंधळून गेली. हे पूर्वींचे शेरखान तर नाहींत अशी तिला क्षणमात्र शंका आली पण आतां शेरखान तिला न ओळखणें शक्य नव्हतें, हा दुसराच कोणी तरी आहे अशी तिची खात्री झाली. ती दरडावून त्याला म्हणाली, 'तूं कोण आहेस तुला काय पाहिजे.'

तो इसम उर्दुत तिला म्हणाला, " मी पैसे न्यायला आलो आहे चल झटपट, पैसा लाव नाहीं तर या बंदुकीनें तुझा कपाळमोक्ष करीन, चलो जलदी करो, खालीं कुणीतरी गाडीतून उतरत आहे असें वाटतें."

व्हिक्टोरियाची चाहूल प्रमिलेलाही लागली होती. पूर्वीं संकटाच्या वेळीं शेरखान जसें धांवून आले तसें यावेळींही येतील कां, ही कल्पना तिच्या

मनांत आल्याशिवाय राहिली नाहीं. पण ती गोष्ट तिला शक्य न वाटल्या-मुळें आपल्या सुटकेचा ती उपाय शोधूं लागली. एकदम तिच्या मनांत एक विचार आला. आपल्या पलंगाखालील किल्ल्याचा जुडगा काढून व तो त्या मुसलमानापुढें फेकून ती अस्सल उर्दूत म्हणाली. 'या शेजारच्या खोलीत तिजोरी आहे ती उघडून पैसा घेऊन जा.'

त्या दरवडेखोरानें मुकाट्यानें त्या किल्ल्या उचलल्या पण तिनें पळून जाऊं नये किंवा ओरडू नये म्हणून त्यानें तिला पिस्तुलाच्या जोरावर त्या खोलींत नेली. व तिच्यापुढें किल्ल्या टाकून तो म्हणाला 'तूंच तिजोरी उघड'

प्रमिलेनें किल्ल्या हातांत घेतल्या व कोणती किल्ली आहे हें पहाण्याच्या मिषानें ती खोलीच्या उंबऱ्यापर्यंत उजेडाकरितां आली. तो मुसलमान यावेळीं थोडासा बेसावध आहे असें पाहून क्षणाचाही विलंब न लावता तिनें बाहेर येऊन दार बंद करून घेतले. त्या खोलीला बाहेर पडण्याला या दाराशिवाय दुसरा मार्ग नव्हता.

त्या चोरानें दार उघडण्याची खूप खटपट करून पाहिली पण प्रमिलेनें कुलूप लावून दाराचा पक्का बंदोबस्त केल्यामुळें त्याचा नाइलाज झाला. आतां तो आपल्या ताब्यांत पुरा सांपडला आहे असें पाहून खालीं कोण आले आहे हें पहाण्याकरतां ती खिडकीपाशीं आली.

श्रीकांत व उषा यावेळीं वर काय गडबड चालली आहे? आपण वर कसें जावें याचा विचार करीत खिडकीखालीं उभे होते. प्रमिलेला खिड-कींत पहातांच उषा ओरडून म्हणाली. "ताई, आम्ही आलो आहोत दार उघड."

"कोण उषा, आणि श्रीकांत, वाहवा किती वेळेवर आलात मी आलें आं दार उघडते."

धांवतच ती खालीं गेली.

त्या दोघांना वर घेऊन आल्यावर प्रमिला म्हणाली. "तुम्हीं अगदीं कमाल केलीत. इकडे येण्याच्या आधीं मला सूचना तरी करायची होतीत! येवढें कसलें जरूरीचे काम निघाले!"

"अग मी पहिल्यापासून तार करा म्हणून म्हणत होते पण यांच्या

आज कुठले डोक्यांत वेड आले कीं आपण आज शेरखान बनून खिडकीं·
तून आंत जाऊन तुला भिवयायचं !"

" मग फारच मौज झाली असती अशा रीतीनें आला असतां तर
खरोखरीच्या शेरखानाची आज गांठ पडली असती."

" म्हणजे'" उषेनें घाबरून विचारलें.

प्रमिलेनें थोडक्यांत सर्व हकीगत सांगितली व नंतर ती म्हणाली कीं,
'प्रत्येक संकटाच्या वेळीं शेरखान माझ्या मदतीला आले होते पण आतां
काय शेरखानाना त्यांची दलिया मिळाली आहे तेव्हां ते कसचे मदतीला
येतात म्हणून मलाच धाडस करून खऱ्या शेरखानाला अशा खोलींत कोंडून
ठेवावा लागला."

" इतकें झालें तरी शेरखान तुला विसरला नाहीं. हें तुला कबूल करावें
लागेल, कारण थोड्या उशीरा का होईना पण तो हजर झाला आहे.
तुला खिडकींत यायला थोडा उशीर झाला असतां कीं मी खिडकीवाटे
आंत येणारच होतो."

" बरें पण त्या चोराला बाहेर काढा कीं " उषेने त्या खोलीकडे पहात
उत्तर केलें.

" त्याच्या हातांत पिस्तुल आहे. एकदम पुढें जाऊं नका."

" आतां तो काय करतो आहे म्हणा. चला मी त्याला बाहेर काढतो"
श्रीकांत त्या खोलीच्या दारापाशीं गेला व म्हणाला, 'हजरत वरच्या जाळीं-
तून तें पिस्तूल बाहेर टाका पाहूं नाहींतर भुके मरावें लागेल."

" मला जिवंत सोडणार असला तर पिस्तुल बाहेर टाकतो " तो चोर
गयावया करून म्हणाला " मी आतां पुन्हां असें करणार नाहीं."

" आधीं पिस्तुल बाहेर टाक. तुला खरोखरच पश्चात्ताप झाला आहे
अशी खात्री झाल्यावर तुला सोडून देऊं."

त्या चोरानें ते पिस्तूल बाहेर टाकले. ते हातांत घेतल्यावर तें बाय-
बाराचे आहे हें श्रीकांताच्या चटकन् लक्षांत आले तेव्हां तो हंसून म्हणाला,
" चोर मनाचा तितका कठोर दिसत नाहीं. बिचाऱ्यानें फुसक्या बारावें
पिस्तुल आणून त्या जोरावर पैसे उपटण्याचा प्रयत्न केला होता."

" बघू पिस्तुल," उषा ते पिस्तुल हातांत घेत म्हणाली, " हें पाहिलंस कां ताई, किती लबाड लोक असतात."

" प्रमिलेसारख्यांनीं या फुसक्या पिस्तुलाला घाबरावें ही मोठ्या नामुष्कीची गोष्ट आहे."

" उगीच बाता नकोत तुम्हीही फसला असतां रात्रीच्या वेळीं नीट दिसतें वाटतें ! "

" जोपर्यंत मी प्रत्यक्ष फसलो नाहीं. तोपर्यंत मी असा फसणार नाहीं असं म्हणायला काय हरकत आहे. बाकी असें फसणें वाईटच."

" आली कां पुन्हां भांडायची बाजू ! आता हा वाद बंद करून त्या चोराला बाहेर काढा बघू." उषा त्या दोघांचा वाद थाबविण्याच्या उद्देशानें म्हणाली.

" बरें आहे. राणी सरकारची आज्ञा मानलीच पाहिजे."

श्रीकांत खोलीचे कुलूप काढीत असतां प्रमिला म्हणाली, " एकदम पुढें होऊं नका त्याच्याजवळ दुसरे एखादे हत्यार असण्याचा संभव आहे."

"मी बरींच वर्षे चोराचा धंदा केला आहे." श्रीकांतानें मुद्दाम प्रमिलेला चिडविण्याकरितां म्हटलें.

प्रमिला कांहीं बोलणार होती इतक्यांत उषेनें तिच्या तोंडावर हात ठेवला व म्हणाली, " माझी शपथ आहे बोलू नकोस." उषा आहे तोंपर्यंत भांडणाला चांगला रंग येणार नाहीं हे श्रीकांतानें जाणून तो ज्यास्त कांहीं न बोलतां दार उघडण्याच्या मार्गाला लागला. आतील इसमाला त्यानें बजाऊन सांगितले कीं, " बाहेर पडायच्या आधीं दोन्ही हात जोडून व ते पुढें दाखवून नतर बाहेर ये."

चोर बिचारा घाबरून गेलेला दिसत होता. श्रीकांतानें सांगितल्याप्रमाणे हात पुढें करून व मान खालीं घालून तो बाहेर आला. त्यानें मान खालीं घातलेली पाहून उषेला कींव आली, ती म्हणाली, " द्या सोडून त्या बिचाऱ्याला. "

" जरा थांबा," श्रीकांत म्हणाला. नंतर त्या चोरापुढें येऊन तो म्हणाला " हजरत कुठले रहाणारे "

" पंजाब " खालच्या मानेनें त्यानें उत्तर दिलें.

" गांवांचें नांव !"

" कोहट "

" धंदा काय करतां ?"

" सरकारी नोकरी "

" कोणत्या खात्यांत ?"

" लष्करांत शिपायी."

" इकडे कुठें आला होता !"

" बहिणीला भेटायला."

" मग चोरीची दुर्बुद्धी कां झाली ?"

" उगीच "

" बरं तुझं नांव काय !"

" रमेश "

"काय !" तिघेही एकदम ओरडले. रमेशही यावेळीं मान वर करून खो, खो, हसत सुटला. त्यानें आपल्या दाढीमिशा काढून टाकल्या होत्या.

" रमेश कमाल आहे हो तुझी, येवढे कोठें शिकलास ? "

" श्रीकांतांना विचार. त्यांना मोठा अभिमान आहे कीं मी आवाज बदलून व मोठी धाडसाची कामें करतो तेव्हां म्हटलें आपणही प्रयत्न करून पहावा, आवाज बदलण्याचें काम बेमालूम झालें. आतां तुझ्यासारखी एखादी स्त्री असती तर चोरीचेंही साहस करून दाखविलें असतें पण ताई-पुढें मला हार खावी लागली. पण ताई खरं सांग हं अगदीं घाबरली होतीस कां नाहीं."

" चल वात्रटपणा करूं नकोस आधी न सांगतां सवरतां इकडे आलास कां तें सांग. बाकी एका माणसाला चांगलाच प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला आहे म्हणायचा, आतां या बाजूतीत फारशी वटवट चालणार नाहीं."

" बहीणीचें गुण भावांत असणारच, पूर्वी बहिणीनें दरवडे घातले आतां भाऊ घालतो आहे. "

" मी पूर्वी दरवडे घातले. उगाच कांहीं तरी बोलूं नका. जिभेला हाड असले म्हणजे वाटेल तें कांहीं बोलायचें नसतें."

" तूं नाहीं दरवडा घातलास! दरवडयांत पैशाचीच चोरी कशाला हवी माणसाची, मनाची सुद्धा होऊं शकते."

"अगदीं कमाल आहे हो तुमच्यापुढें! कुठलें भाषण कुठें नेताहेत पहा. रमेश तूं यांच्या नादीं लागूं नकोस; तूं आपली हकीगत सांग. शहाण्यानें यांच्या तोंडाला लागूं नये."

" श्रीकांताच्या नादीं लागायला मी कांहीं बायको नाहीं." रमेश खंवचटपणें म्हणाला.

" रमेश, तूंही यांना मिळालास होय." उषा मध्येंच म्हणाली. " आतां दुसरा वाद न काढतां तूं आपली हकीगत सांग पाहूं."

" त्याचें असें झालें." रमेश आपली हकीगत सांगूं लागला. ती वाचकांना माहीत असल्यामुळें ती पुन्हां सांगण्याची जरूरी नाहीं. शेवटीं तो म्हणाला, " तेथील सर्व मंडळीचा निरोप घेतल्यावर दुपारीं गाडी गांठली. आगगाडींत नानातऱ्हेचे विचार आले. पुढील आयुष्याची रूपरेषा आखली पण ती इतकी अंधुक होती कीं आमचें तारूं कुठें झुकणार आहे याचा माझा मलाच पत्ता लागेना. शेवटीं ताई जसें सांगेल तसें वागायचें ठरवून त्या बाबतींत विचार करायचें सोडून दिलें. येथें मी संध्याकाळीं उतरलो त्यावेळीं माझ्या मनांत एकदम विचार आला कीं ताईला अचानक भेट द्यावी. शेवटीं विचार करतां एकदम नुसते न भेटतां चोराच्या रूपांत भेटायचें मी ठरविलें व त्याप्रमाणें बाजारांत जाऊन दाढी मिशा व एक खोटें पिस्तुल विकत घेतलें. त्या पुढचा आमचा शर्विलकाचा पार्ट कसा काय साधला हें तुम्हांला माहीतच आहे."

" मग तूं आतां काय करायचें ठरवलें आहेस!" उषेनें प्रश्न केला.

" आज अनायासें तुम्हीहि आला आहांत तेव्हां सर्वांचे विचारें काय ठरेल तें करायचें मी ठरविलें आहे."

" बरं आतां अपरात्र झाली आहे उद्यां याबद्दल विचार करूं."

# उषेची मयसभेंत रवानगी ! १२

दुसऱ्या दिवशीं सर्वांनाच उठायला फार उशीर झाला. प्रमिलेनें शाळे कडून रजा मागविल्यामुळे तिला शाळेत जाण्याची घाई नव्हती त्यामुळें सकाळच्या चहालाच नऊ वाजले.

माडीवरच्या मधल्या हॉलमध्यें एका टेबलाभोंवतीं सर्व मंडळी जमली होती. एका बशींत बिस्किटें, चहादाणी, दूध, साखर, कपबशा ब्राह्मणानें टेबलाच्या मध्यभागीं आणून ठेवलें होतें.

चहाचा कप भरीत असतांच प्रमिला म्हणाली. "मग काय रमेश, सर्कशींत जाण्याचा तुझा विचार कायम ठरला कां ?"

"जवळ जवळ नक्की ठरविला आहे पण एक विचार मनांत येऊन मन थोडेंसें अस्वस्थ झालें आहे."

"कसला विचार ! ज्याअर्थी मन अस्वस्थ होतें आहे त्याअर्थी तो विचार बराच महत्त्वाचा असला पाहिजे."

"माझ्या दृष्टीनें तो बराच महत्त्वाचा आहे."

"कोणता तो ऐकूं दे तर खरें."

"रेजिमेंट सोडल्याबरोबर मला शालिनीची आशा सोडावी लागेल. मी सर्कशींत गेल्यावर तिचे वडील आमच्या लग्नाला कधींही संमति देणार नाहींत."

"मोठाच पेचप्रसंग आहे. राजकारणांतील पेचप्रसंगाप्रमाणेंच हाही मोठ्या घोटाळयाचा दिसतो आहे; पण तिचें तुझ्यावर खरेंखुरें प्रेम आहे कां!"

" प्रेम आहे यांत शंकाच नाहीं पण ती फार अधिकारलोलुप आहे. प्रेमापेक्षां ती अधिकाराला ज्यास्त मानते असं माझ्या अनुभवाला आलें आहे आणि माझ्या असेंही ऐकण्यांत आलें आहे कीं कॅप्टन नारायणराव लष्करमधील एका वराच्या शोधांत आहेत तो वर अधिकारानें तसाच पैशा-नेही श्रीमंत आहे आणि आतां मला वाटूं लागलें आहे कीं नारायणरावानीं मला जी नोकरी सोडण्याबाबत मदत करण्याचें कबूल केलें त्याला हेंही बलवत्तर कारण असेल. माझ्यावर शालिनीचें प्रेम आहे हें त्याना कळून चुकलें होतें तेव्हां अनायासें माझी अडचण दूर झाल्यास त्यांना हवीच असेल. "

" तुझी कल्पना अगदीं बरोबर दिसते. " श्रीकांत म्हणाला " कॅप्टन नारायणरावांची मोठी इस्टेट हैद्राबादकडे आहे हें मला माहीत आहे तेव्हां तो तुझ्यासारख्या फटिंगाला आपली मुलगी देईल असें वाटत नाहीं. त्यांतून त्याच्या मुलीनेंच जोर धरला तर कुणास ठाऊक, तुला कसें वाटतें. "

" मी बापाच्या विरुद्ध जाणार नाहीं असें तिनें स्पष्टच सांगितलें आहे पण मी परत गेल्यास सर्व ठीकठाक होईल असें तिचें म्हणणें आहे. "

" [illegible] मला त्यांत तितकें तथ्य दिसत नाहीं. पुन्हां सैन्यांत अडकून पडून मुलगी मात्र मिळणार नाहीं ती नाहींच. मला वाटतें तूं एक वर्षा-पुरताच सर्कसमध्यें बॉंड द्यावा. तेवढ्या वेळांत नारायणरावांची मुलगी हट्टानें लग्न करण्याचे थांबलीच तर तूं पुन्हां सैन्यांत जा. नारायणरावही पूर्वीची ऑर्डर रहित करून तुला परत घेण्याचा खास प्रयत्न करतील. या सर्व गोष्टी त्या मुलीवर अवलंबून आहेत, प्रमिला तुझें काय म्हणणें आहे ? "

" मलाही हाच विचार पसंत पडतो. रमेश आमच्या दृष्टीनें हीच गोष्ट बरी वाटते. "

" मीही तुमच्या बाहेर नाहीं. "

इतक्यांत पोष्टमननें एक पत्र आणून दिल्यामुळें त्यांचें बोलणें तितक्या-वरच राहिलें. घरीं आल्याबरोबर रमेशच्या नांवानें पत्र आलेलें पाहून सर्वांना फार आश्चर्य वाटलें.

" रमेश, शालिनीचें तुझ्या मागोमाग पत्र आलेले दिसते." उषा हसत म्हणाली.

पाकीटावरचें अक्षर ओळखीचे नसल्यामुळें रमेशही बुचकळ्यात पडला. पत्रावरचा छाप नीट दिसत नसल्यामुळे फोडल्याशिवाय तें कोणाचे आहे हें कळण्यास मार्ग नव्हता.

पत्र वीणाशंकरचें होतें त्यांत त्यानें तो तेथें नसल्यामुळे रमेशला येता आलें नाहीं याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली होती. आतां सर्व कुटुंबिया-सह स्वतःच त्याच्या गांवीं येण्याचें त्याने कबूल केले होते. पत्राचें शेवटीं ताजा कलम घालून त्यानें कळविलें होते कीं कॅप्टन् नारायणराव येथे आले होते व त्यांची मी गाठ घेतली होती वगैरे.

या पत्रापेक्षा त्या पत्रात दुसरी एक बारकीशी चिठ्ठी मिळाली ती त्याला फार महत्त्वाची वाटली. चिठ्ठीत पुढील मजकूर होता.

बाबांच्या न कळत ही चिठ्ठी मी घातली आहे. बाब महत्त्वाची असल्या-मुळे हे धाडस केलें आहे तरी क्षमा असावी. बाबांनीं कॅप्टन् नारायणराव येथे आले होते एवढेंच लिहिले होते पण ते येथे येण्याचा उद्देश त्यांनीं कळ-विला नाहीं. बाबांच्या सांगण्यांत आलें कीं, सध्यां बन्नूला असलेल्या एका रेजिमेंटमधील एका तरुण ऑफिसरला ते भेटायला आले होते. बाबा पुढे इतकेही म्हणाले कीं, त्या ऑफिसरने त्यांची लग्नाची मागणी कबूल केली असून पक्का विचार ते कोहटला जाऊन करणार आहेत. शालिनीचे तुमच्या वर, व तुमच तिच्यावर प्रेम आहे हे मी डोळयानीं पाहिलेलें आहे म्हणूनच इतक्या तातडीने हें पत्र लिहिलें आहे. तिच्या प्रेमाला डावलून जाऊं नका एवढीच विनंती आहे.

पूर्णेंदु

सर्व पत्र इंग्रजींत होतें शेवटीं ताजा कलम घालून खालील दोन ओळी तिनें लिहील्या होत्या.

In the deepest gloom hides,
The saving ray of light. P.

ती चिठ्ठी दोन तीनदां वाचली तरी त्याचा अर्थ त्याच्या नीटसा लक्षांत

आला नाहीं इतका त्या पत्रानें त्याच्या मनाचा गोंधळ उडवून दिला. सर्व पत्र आतां मंडळीपुढें ठेवणें प्राप्त असल्यामुळें तें त्यानें उषेच्या हवाली केलें.

सर्वांचें पत्र वाचून झाल्यावर प्रमिला म्हणाली, " एकूण दाक्षिणी मुलगी टाकून तूं पंजाबी मुलीकडे वळणार तर! "

" तुम्ही असें म्हणाल असें मला वाटलेंच होतें पण ईश्वरसाक्ष या पूर्णेंदुला मी काळी का गोरी पाहिली नाहीं. यापूर्वी पत्रांत ही गोष्ट मी कळविलीच होती. मी केलेले उपकार स्मरून ती मला मदत करीत आहे इतकेंच. तिला जर माझें मन आकर्षण करायचेंच होतें, तर ती स्वतः मला भेटली असती. शिवाय तिचा लिहिण्याचा उद्देश किती पवित्र आहे हे तुम्ही लक्षांत आणलें नाहींत. तिला जर माझ्याशीं लग्न कर्तव्य असते तर तिला पत्रांतून इतका मजकूर लिहायची जरूरीच नव्हती. परस्परच तिच्या मार्गातील काटा नाहींसा झाला असता. "

" तुझें म्हणणें अगदीं बरोबर आहे. " श्रीकांत त्याचे बोलणे थांबवून म्हणाला, " ती मुलगी असल्या भानगडींत पडलेली दिसत नाहीं. "

रमेश पुढें म्हणाला, " तुमच्या आतां लक्षात आलेंच असेल कीं, कॅप्टन नारायणराव, मी तेथून जाण्याची किती उत्सुकतेने वाट पहात होतें. माझी पाठ फिरल्याबरोबर लगेच ते बन्नूला गेले. या वेळपर्यंत तो भावी जावई कोहटला येऊन त्यांचें लग्नही ठरलें असेल. जगांत किती विलक्षण तऱ्हेची माणसें असतात पहा. "

" पुढील आयुष्यांत हेंच तुला शिकावयाचें आहे. आपलें ठरल्याप्रमाणें शालिनी आपल्या प्रेमाला जागल्यास तूं परत जा, नाहींतर सर्कस मोकळी आहेच. मात्र आजच्या आज नारायणरावांच्याकडे अर्ज लिहून टाक. त्याचप्रमाणें त्या वीणाशंकरला पत्र लिहून सहकुटुंब बोलाव, त्याची इतकी हुशार मुलगी एकदा डोळ्यानें पाहूं दे तरी. ती येथें आल्याबरोबर मला बोलावणें पाठीव. "

" ठीक आहे. ती रशियन सर्कस ३।४ महिन्यांनीं काश्मीरांत जाणार आहे असें तो मालक म्हणत होता तरी त्यावेळीं सर्वांनीं तिकडे यावें असें

मी आजच निमंत्रण देऊन ठेवतो, त्यावेळीं पुन्हां एकदां पत्र पाठवीनच. मी सर्कसमध्ये गेल्यास तुम्हाला काश्मीरला आलेच पाहिजे त्या बाबतींत मी कोणतीही सबब ऐकणार नाहीं. ”

“ आम्हीं जरूर येऊं शाळेकडून एक महिन्याची रजा घेऊन. मी येईन, पण श्रीकातांची मी खात्री देत नाहीं त्यांचा लहरी स्वभाव तुला माहीतच आहे. ”

“ तुझ्यापेक्षां पुष्कळ कमी, रमेश प्रमिलेचा तूं विश्वास धरूं नकोस, मी मात्र खास येईन. ”

“ असल्या निश्चयी माणसाचें रोज पायाचे तीर्थ घ्यायला हवें. ” “ अरे आहे तरी काय ! ” उषा मध्यें पडून म्हणाली, “ दोघांनाही सरळ बोलतांच येत नाहीं का काय ! ”

“ पण सुरवात मी केली नव्हती. ” श्रीकांत म्हणाला.

त्याना थांबवून रमेश म्हणाला, “ जरा थांबा, श्रीकांत तुम्ही एकटेच तिकडे येणार, म्हणजे उषाताई कुठें रहाणार आहे ? ”

“ आम्ही ज्याकरतां येथे आलो ती गोष्ट अद्याप सांगायची राहूनच गेली आहे. हं उषा, कर सुरवात.”

“ मी काय म्हणून ! आधी ठरवलें कुणी ! ”

“ बरें बुवा. मीच सांगतो. प्रमिला तुला माहीतच आहे कीं, मागे एकदा माझा एक स्नेही वसंतराव किस्मतपुरला आला होता. ”

“ तो सिनेमा नट होय, आहे माहीत. ”

“ त्यांचें परवा नुकतेंच पत्र आलें होतें त्याचप्रमाणें गुलाबचेंही तिकडील सविस्तर हकिगतीचें पत्र आलें होतें. त्या दोन्ही पत्रावरून आम्ही दोघानीं मिळून ठरविलें कीं, कांहीं दिवस तरी उषेनें सिनेमांत काम करण्यास जाण्यास हरकत नाहीं. एक फिल्म निघाल्याबरोबर तिनें वाटल्यास परत यावें. ”

“ तिच्यापेक्षां तुम्हीच हें सर्व ठरविलेलें दिसतें आहे.”

“ तसें मुळींच नाहीं. विचार, हवें असलें तर उषेला.”

" खरेंच ताई, मीही तिकडे जाण्याला संमति दिली आहे. गुलाब, पद्मा तिथें आहेतच त्यांची मला सोबत व करमणूक चांगली होईल. "

" तूं आपल्या स्वतःच्या पायावर उभी राहून जाणार असलीस तर जा, सिनेमांत कधीं कोणाला अर्धचंद्र मिळेल याचा नेम नाहीं. तूं जाईपर्यंत ते दोघे कदाचित् तेथून निघूनही जायचे."

" त्यांचेच तर आग्रहाचें पत्र आलें ! "

" बहुतेक त्या वसंतरावानें या दोघांनाही बनवलेलें दिसतें त्याशिवाय त्याचे इतक्या आग्रहाचें पत्र, लगेच त्याचें स्वतःचें पत्र असे यायचें नाहीं. "

" प्रमिले, दुसऱ्याबद्दल विनाकारण संशय घेण्याचे वेड अद्याप तुझें जात नाहीं. तूं मात्र स्वतः त्या शेरखानावर वाटेल तसा विश्वास टाकीत होतीस. "

" माणसांची पारख करण्याला डोकें लागतें. उगीच कुणी गोड बोलला कीं, तो चांगला असे म्हणून फजीत पावण्यांत अर्थ नाहीं. "

" निदान तुझी तरी परीक्षा मी बरोबर केली होती, माझ्या बाबतींत मात्र तूं मठ्ठ डोक्याची ठरलीस. "

" पुरे आतां, तुम्हांला भांडणाशिवाय चैनच पडत नाहीं कां काय कुणास ठाऊक ! " उषा त्यांच्या भांडणाला कंटाळून म्हणाली.

" बरें राहिलें आतां वसंतरावाला काय उत्तर पाठवायचे ते ठरवा. उगीच दिरंगाई नको. "

" यांत विचार काय ठरवायचा आहे. ती येत नाहीं म्हणून स्पष्ट उत्तर पाठवा. आणि पुन्हां या बाबतींत विचारूं नये असेंही कळवा. "

" वाः ही तर जाण्याच्या तयारीनें आली आहे."

" होय, उषा ! श्रीकांत काय म्हणताहेत ! "

" होय, वाई, यावेळीं मी जायचें ठरवलें आहे. माझा गुलाबबद्दलचा ओढा तुला माहीतच आहे. ही पद्मा स्वतंत्र विचाराची मुलगी आहे ती त्याला कुठें अडचणींत न आणो म्हणजे झालें मी तेथें जाण्यावरच असलें म्हणजे मला त्यांच्यावर लक्ष ठेवायला सांपडेल."

" तुझें त्याच्यावर व त्याचें तुझ्यावर लक्ष ! खाशी सोय. शेवटीं कोणाचें कोणावर लक्ष न रहाता सर्वच खड्डयात पडूं नये म्हणजे मिळविली. उषे, माझें ऐकशील तर हा विचार तू सोडून दे."

" पण मला काहीं दिवस तरी अनुभव घेण्याची परवानगी दे, मला काहीं वाईट प्रकार दिसला कीं मी तावडतोब परत येईन."

" ते तुला साधेल का नाहीं याची मला शंका वाटते. पण बाई, तूं आपल्या जबाबदारीवर जा. ती मयसभा आहे. कोण कसा फसेल याचा नेम नाहीं. वाटेल तितके प्रणयसंवाद, छचौर बोलणें, कृत्रीमपणानें वागणें वगैरे गोष्टी तुला कराव्या लागणार आहेत. आजपर्यंतच्या आयुष्यात या गोष्टी तूं कधीं केल्या नाहींस तेव्हा तुला त्या कशा काय साधतील त्या साधोत."

" हा आपला माझा प्रयत्न आहे. नच साधल्यास घर आहेच."

" ही विषाची परीक्षा आहे असें मला अजूनही वाटतें पण तुम्ही दोघे त्या तयारीनेंच आला आहात तेव्हा उगीच मोडता कशाला घालूं ! मला काय वाटतें तें मी बोलून दाखवलें आहे. पण यापुढें तुमच्या इच्छेच्या आड मी येऊं इच्छित नाहीं."

" ताई त्या सिनेमांत जाऊन तेथील एकंदर वातावरण मी स्वतः पाहून येऊं का ? रमेशनें मध्येंच प्रश्न केला."

" सिनेमात पाहण्यासारखें आता कांहींच राहिलें नाहीं, तेव्हां तूं या भानगडींत न पडलेला बरा."

संवाद आवरतां घेण्याच्या उद्देशानें श्रीकांत म्हणाला " मग हें ठरलें तर. उषेनें काहीं दिवस सिनेमांत जाऊन जगाचा अनुभव घ्यायचा."

" हो असें म्हणायला हरकत नाहीं."

" मी उद्या पत्र पाठवून वसंतरावाला इकडे बोलावतो."

" तो यायच्या वेळीं मला कळवा. मला सर्व, सर्व गोष्टींचा त्याच्याकडून खुलासा हवा आहे."

" तुला जरूर बोलावीन. तुझ्यासमती करतांच आम्ही इथपर्यंत आलो होतो आमचे काम झालें आतां आम्ही आज रात्रीं परत जातो."

"माझी सम्मती पत्रानेंहि मिळाली असती. इकडे येण्याची येवढी सदी कशाला घेतलीत."

"हेंच मी हिला सांगत होतो, पण ही ऐकेल तेव्हांना."

"अगदीं खोटं. मी चांगली म्हणत होते कीं तुला तिकडे बोला-न घेऊं तर म्हणाले कीं तुला अशा तऱ्हेनें किती त्रास द्यायचा! तुझी ाळजी तरी किती पहा! तुझी झोपमोड होईल म्हणून तारसुद्धां केली ाहीं. प्रमिलेच्या संमतीशिवाय आपल्याला कोणतीहि गोष्ट करायची नाहीं सर पालुपद ठेवलेलेंच, मग आम्हाला इथें न येऊन कसें चालेल."

"हें नुसतें कुभांड आहे. माझी मी कोणतीहि गोष्ट करायला मर्थ आहे."

"हळू हो. कुणी ऐकेल एखादें!" प्रमिला त्याला चिडविण्याच्या द्देशानें म्हणाली. श्रीकांतानें तिच्यावरील व्यक्त केलेल्या विश्वासाबद्दल ाला मनापासून समाधान वाटत होतें. ती पुढें म्हणाली,

"तुमची लहान मुलापेक्षा जास्त किंमत नाहीं हें सर्व जग जाणतें आहे."

"आला पुन्हा वादाचा प्रसंग" माझी शपथ आहे कोणी बोललांत र" उषेनें त्याचें भाषण थांबवून म्हटलें.

लवकरच सर्व मंडळी आपआपल्या उद्योगाला लागलीं. रमेशनें रीतसर ार्ज करून नारायणरावांच्याकडे पाठवून दिला व त्याच दिवशीं लगेच र्कसच्या मालकालाही पत्र लिहिलें.

श्रीकांताच्या इच्छेप्रमाणें वीणाशंकरलाही पत्र लिहून त्यानें सर्व मंडळी-ह येण्याचें खास आमंत्रण दिलें.

वसंतराव श्रीकांताच्याच पत्राची वाट पहात होता. तें आल्याबरोबर ानें आनंदानें टाळी वाजविली व लगेच पहिल्याच गाडीनें तो किस्मत-राकडे निघाला,

उषेने जरी जाण्याची अनुमती दिली होती तरी वेळ येताच तिचा जीव र खालीं होऊं लागला आपण हें भलतेंच साहस करीत आहोत असेंहि ुला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. वसंतरावाच्या नजरेची पुन्हा तिला भीति

वाटूं लागली पण ती दर्शावणें वेडेपणाचें आहे हें जाणून तिनें हास्यमुखानें वसंतरावाचें स्वागत केलें.

वास्तविक प्रमिलेला बोलावून घेण्याचें ठरलें होतें पण वसंतरावानें त्यांत मोडता घातला. " आपले काम उद्याच सुरू आहे. आणखी एक दिवस राहण्यास सवड नाहीं वगैरे हजारो सबबी त्यानें पुढें आणल्या त्यामुळें नाइ-लाजानें त्या दिवशींच जाण्याचें त्यांनी ठरविलें.

श्रीकांत अर्थात् सिनेमाजगापर्यंत उषेला पोंहोचवायला गेला होता. त्या दोघांची ताटातूट व्हायची रात्र उषेला अत्यंत दुःखाची गेली. तिनें रडून रडून डोळे सुजवून घेतले. जणूं काय आपण फिरून एकमेकाला भेट-णार नाहीं असेंच तिला वाटू लागले. तिची समजूत करायला श्रीकांताला कितीतरी त्रास पडला.

एक दिवसा आड तरी दोघांनीं एकमेकाला पत्र लिहावयाचें असे ठरलें रोजचा कार्यक्रम कसा असावा याचा आराखडा श्रीकातानी उषेला काढून दिला.

निघायच्या वेळीं उषेला पुन्हा भडभडून आलें; श्रीकांताची छाती अश्रूंनीं भिजवीत ती म्हणाली " मला कसेंसेंच होतें आहे. प्राण अांत ओढूं लागला आहे. लग्न झाल्यापासून एक दिवसही या हृदयापासून दूर झालें नाहीं. ज्या हृदयाकरतां मी सर्वस्व ओवाळायला तयार आहे त्यापासून आज मी खुषीने दूर होते आहे. हा नेकटाय आतां कोण बांधील. हे विस्कटलेले केस नीट कोण करील. एकादे वेळीं डोकें दुखू लागलें तर तें कोण चेपील. नाथ, कशी हो ही मला दुर्बुद्धी झाली. माझा इथे राह-ण्याचा धीर होत नाहीं. मी परत येते, तुमच्याशिवाय एक क्षणभरही चैन पडणें मला शक्य नाहीं. नाथ मला घेऊन जा. "

तिचे अश्रु पुशीत व तिचे कपाळावर आलेले केस मागें सारीत श्रीकांत म्हणाला, " उषा, वेडी तर नाहींस. आतां एकदां पुढे पाऊल टाकले आहे तें मागें घेऊन चालणार नाहीं. एक दोन दिवस तुला जड जाईल. मग संवयीनें हळुहळु तुझें येथें मन रमूं लागेल. गुलाबला नेहमी जवळ ठेवीत जा. त्याची व जरूर वाटल्यास पद्यावी सोबत तुला फार उपयोगी पडेल,

धैर्यानें वाग, तुझ्या मनाच्या विरुद्ध एखादी गोष्ट झाल्यास तूं बेलाशक निघून ये. मी जाऊं आतां ?"

"या. आपला भेट पुन्हां होणार नाहीं असें मला कां वाटूं लागलें कोणास ठाऊक ! ईश्वर करो आणि हे वाईट विचार माझ्या मनांतून नाहींसें होवोत. नाथ राग नाहींना येणार, एक प्रश्न विचारूं कां ?"

"विचार, राग येण्याचें काय कारण !"

"या तीन चार महिन्यात मला विसरणार नाहींना !"

"वेडीरे वेडी,असल्या गोष्टी या जन्मीं तरी शक्य आहेत कां ! असले भलते विचार मनांत आणू नकोस. ज्यावेळीं तुला माझ्याबद्दल अशा प्रकारची शंका वाटेल त्यावेळीं ताबडतोब निघून ये, मग तर झाले. नीट हुषारीनें वाग, जपून रहा."

"तुम्ही दर आठवड्यांनीं एकदां येत जाल का !"

"उषा, अगदींच लहान मुलीसारखे काय करतेस तूं. रानांत कां पडली आहेस, मी आतां तीन महिन्यांत इकडे न येण्याचा निश्चय केला आहे. पाहूं या कितपत टिकतो तो."

"मी मुळीं तारच करीन."

"लाडके उषे, तूं माझें मन विरघळुं पहाते आहेस पण मला तें दगडासारखें घट्ट करून येथून जाणें प्राप्त आहे. जातो मी आतां."

"नाथ एक क्षण थांबा" उषा आर्तस्वरानें म्हणाली. पण श्रीकांत चटकन् डोळे पुशीत तेथून निघून गेला.

## वसंतरावाचें कारस्थान ! १३

श्रीकांत निघून गेल्यावर उषेला तें घर खावयाला येतें आहे कीं काय असें वाटूं लागलें. बिछान्यावर अंग टाकून ती ओक्साबोक्सी रडूं लागली. श्रीकांत गेल्यावर गुलाब व पद्मा यांनीं येऊन तिचें शांतवन करण्याचा प्रयत्न करून पाहिला पण कांहीं एक उपयोग झाला नाहीं.

पोटभर रडूं दिल्यावर तिचा दुःखभार हलका होईल असें वाटून ते तेथून उठून बाहेरच्या खोलींत येऊन बसले. रडण्याच्या श्रमानें ग्लानी येऊन उषेला केव्हां झोप लागली हें कोणालाच कळलें नाहीं.

तिचा रडण्याचा त्राग्याचा, स्वतःला शिव्याशाप देण्याचा प्रकार दोन दिवस चालला होता; तिच्या कोणत्याही कृतीला कोणी अडथळा न केल्या-मुळे तिचा रडण्याचा भर दोन दिवसानंतर ओसरला.

दोन दिवसांत ती कोणाशीं बोललीही नाहीं पण आतां हळूंहळूं गुला-बशी ती बोलूं लागली, त्याच दिवशीं श्रीकांताचें पत्र आल्यामुळें तिची कळी किंचित उमलली होती. तिसरा दिवस त्या पत्राचें उत्तर लिहिण्यांत गेला. चार दिवसानंतर संध्याकाळीं गुलाब व पद्माबरोबर ती हिंडायला म्हणून बाहेर पडली. उघडी हवा मिळतांच तिला पुष्कळ बरें वाटूं लागलें व हंसतमुख चेहऱ्यानेंच ती परत आली.

वसंतराव जाणूनबुजून तिच्या नजरेला पडला नव्हता. त्याची खात्री होती कीं जर आपण दृष्टीस पडलो तर 'हाच या सर्वाला कारण' म्हणून ती संतापावयाला कमी करणार नाहीं. तरी पण गुलाब व पद्मामार्फत तिच्या

बद्दल सर्व माहिती त्याला मिळत होती. तिनें आपण स्वतः गुलाबच्या व पद्माच्या कामाबद्दल माहिती विचारली व सिनेमात एकदर लोक किती आहेत त्याचे स्वभाव कसे आहेत. किती वेळ रंगून बसावें लागतें याबद्दलही विचारपूस केल्याचें कळल्यावरून एक दिवस सिनेमा मालकांना घेऊन वसंतराव तिच्याकडे गेला.

औपचारिक प्रश्न झाल्यावर वसंतराव म्हणाला " हे सिनेमाचे मालक 'पूर्णानद' आले आहेत. तुमची संमती मिळाल्यावर ते नवीन सीनिरिओ घ्यायला सुरवात करणार आहेत. "

" मला आता थोडें बरें वाटतें आहे आणि त्यांचेंही 'काम तात्काळतोब सुरूं करा' म्हणून आज पत्र आले आहे तेव्हा काम करण्याची माझी लवकरच तयारी होईल असं वाटते. "

" तुमचें स्वतःचे काम सुरु करण्याच्या आधीं तुम्ही कांहीं दिवस स्टूडिओंत नुसत्या येऊन बसल्यात तरी पुष्कळ उपयोग होईल, लोक काम कशीं करतात याचीही माहिती होईल " पूर्णानदानें तिच्या संमतीचा फायदा घेऊन उत्तर केले.

" ही कल्पना चांगली आहे. आठएक दिवस मी तुमतीच येऊन बसत जाईन तोपर्यंत माझ कांहीं भाषण पाठ करावयाचें असलें तर देऊन ठेवा. "

" आम्ही कामाच्या वेळींच मजकूर सांगून पाठ करून घेतो. वाक्यं फारच लहान असल्यामुळे तीं चटकन् पाठ होतात "

" तरीही हरकत नाहीं उद्यापासून मी येईन. "

याप्रमाणें जवळ जवळ १५ दिवस उषेच्या तयारींत गेले. सिनेमाचे मालक नटनटींच्या इतक्या तत्राने कधींच वागत नाहींत, पण वसंतरावानीं विशेष विनती केल्यावरून व चांगल्या स्त्रिया सिनेमांत काम करायला याव्यांत या इच्छेनें पूर्णानंदानें उषेच्या बाबतींत बरेच नमतें घेतलें होतें. श्रीकांताचे पत्र अगदीं नेमानें येत असल्यामुळे तिचा आनंदी व अल्लड स्वभाव आता पुन्हा डोकावूं लागला होता. भुवयाना रंग लावणें, ओठ रंगविणें गालावर गुलाबी छटा आणणें वगैरे गोष्टींबद्दल तिला पहिल्या प्रथम

कसेंसच होई. पण ती लेणीं ह्याल्यावर स्वरूप ज्यारत आकर्षक होतें हें पाहिल्यावर तिलाही ती कृत्रिमता आवडूं लागली. अशा तऱ्हेनें ती रंगल्या-वर पद्मा तिची वसंतरावाच्या शिकवणीप्रमाणे भरमसाट स्तुती करी, त्यामुळें तिच्या मनाचा हळुहळु असा कल होऊं लागला कीं, या कृत्रिम गोष्टींत फारसें वाईट असें कांहींच नाहीं.

मनुष्य नेहमीच स्तुतीप्रिय असतो आणि वसंतराव, पद्मासारखे भाट तिच्या दारीं असल्यामुळें आपणांत अप्सरेलाही लाजविणारे सौंदर्य उत्पन्न करण्याची शक्ति आहे. गाण्यांत आपण कोणालाही हार जाणार नाहीं ही व अशाच तऱ्हेची तिची भ्रामक समजूत होऊं लागली. आजपर्यंत ती फारशी बोलून दाखवीत नसे पण अलीकडे चुकून माकून एखादा अहंकाराचा शब्द बाहेर पडे. तिची सदसद्विवेक बुद्धि अद्याप चांगलीच जागृत असल्यामुळें असल्या गोष्टी केल्या म्हणजे तिला नंतर वाईट वाटे पण तें तात्पुरतेंच.

आरंभी आरंभीं प्रणयाची वगैरे कामें करतांना ती वसंतरावाच्या नजरेला नजर भिडविण्याला भीत असे पण मालकांनीं त्याच्या डोळ्याकडे पाहिलेंच पाहिजे, असा इषारा दिल्यामुळें तिला त्याच्या नजरेशीं नजर भिडाविणें भाग पडलें. कांहीं दिवसांनीं तिचे तिलाच वाटूं लागलें कीं, वसंतरावाच्या डोळ्यात भिण्यासारखे कांहीं नाहीं, आपण उगीचच त्यांना भीत होतो; आणखी कांहीं दिवसांनीं ते डोळे आकर्षक आहेत अशी सुद्धां तिची समजूत होऊं लागली होती, पद्मा त्याच्या डोळ्याचें रसभरीत वर्णन करायला तयार असेच.

अशा रीतीनें पतीशिवाय जगांत कोणालाच न ओळखणारी उषा येथील परिस्थितींत आल्याबरोबर तेथील लोकांच्या संगतीनें परिस्थितीबरोबर वहात चालली. तिनें एक गोष्ट मात्र कायम ठेवली होती ती ही कीं, "तिच्या मनाला पटलेल्या गोष्टी, तिच्या दृष्टींत, कल्पनेंत झालेला बदल ती श्रीकांताला लिहून कळवी व त्याचेही 'असें वाटलें तरी कांहीं हरकत नाहीं, इतरांशी आपण फारसा संबंध ठेवू नये म्हणजे झालें' वगैरे हकीगतीचें उत्तर येई. त्यामुळें तिला बरें वाटून ती हळू हळूं त्यापुढेंही पाऊल टाकूं लागली.

हां, हां, म्हणतां दोन महिने निघून गेले. शूटिंग निम्मे झालें होतें व

त्यात उषेचें संगीत, भाषण, तिचा स्वाभाविक अल्लडपणा व चंचलपणा यामुळें तिचे काम अप्रतिम झालें होतें तिचा तिलाही याबद्दल अभिमान वाटूं लागला होता व आपण आरंभी इकडे येत नव्हतो ही फार मोठी चूक करीत होतो अशी तिची ठाम समजून झाली व केवळ वसंतरावामुळें आपला जगात आतां उदो उदो होणार ! याबद्दल ती त्यांचे आभार मानण्यासही चुकली नाहीं.

पण वसंतरावाचें तिच्या बाबतींत काय मत आहे तें आपल्याला पाहिलें पाहिजे.

सिनेमात कामें करून दमून गेलेले लोक यावेळीं गाढ झोंपीं गेले होते. उषाही श्रीकांताना लिहिलेलें सविस्तर हकीगतीचें पत्र संपवून व तें बंद करून नुकतीच झोपली होती. पद्मा तिच्या सोबतीला रहात असल्यामुळें ती पलीकडल्या खोलींत झोपली म्हणण्यापेक्षां चुळबुळ करीत पडली होती. उषेला गाढ झोप लागली अशी खात्री झाल्यावर ती हळूच अंथरुणावरून उठली तिने कानोसा घेऊन पाहिले त्यावेळीं सर्वत्र शांत होतें. खुंटीवरचा ओव्हरकोट घालून ती हलक्या पावलाने बाहेर पडली दाराला तिनें बाहेरून कुलुप लावून घेतले व ती जलद पावलें टाकीत वसंतरावाच्या खोलीपर्यंत आली. आजूबाजूला कोणी नाहीं असें पाहून तिनें हळूच दाराला थाप मारली. वसंतराव आंत जागाच होता त्यानें बटन दाबून दिवा लावला व दार उघडून पद्माला आंत घेतले.

आंत आल्यावर ओव्हरकोट बाजूला फेंकून ती एका खुर्चीवर स्वस्थ पडून राहिली. तिचा श्वास येवढ्या मोठ्यानें चालला होता कीं पांच मिनिटें तिच्या तोंडून शब्द फुटेना. तेथे असलेल्या तांब्यातील पाणी प्याल्यावर तिला बरे वाटलें. वसंतराव तिची हालचाल स्वस्थ चित्तानें पहात होता.

स्वस्थपणा आल्यावर ती म्हणाली, " वसंतराव मला इतक्या रात्रीं कशाला बोलावलेंत ? "

" तसेच महत्त्वाचें काम आहे. "

" मग ते दिवसा होत नव्हते ? " तुम्हांला बायकांच्या अब्रूची कल्पना

नाहीं असें दिसतें. मी रात्रीं बाहेर हिंडते असें कळले तर मला एक दिवस या सिनेमांत ठेवणार नाहींत."

"अग यांत कांहीं अर्थ नाहीं तुला आपल्या सिनेमांतील किती नटी बाहेर हिंडतांना दाखवूं."

"मला लोकांशी काय करायचें आहे ! हें जर उषाताईला कळलें किंवा समजा, ती जागी होऊन तिने मला हाक मारली तर कसें होईल. बरें जाऊ द्या ते, काय काम आहे ते लवकर सांगा. आधीं दार बंद करा, नाहींतर कोणी तरी आंत येईल."

"वसतराव दार बद करून तिच्याजवळ आला व जवळच्या टेबलावर बसून व सिगारेट पेटवीत म्हणाला, "पद्मा माझ्यावर तुझें प्रेम आहे असें तूं म्हणतेस तेव्हां तुझ्या प्रेमाची मी परीक्षा बघणार आहे, बोल आहेस परीक्षेला कबूल."

"हो एका पायावर."

"ठीक आहे. तुला मी दिवसाच बोलावणार होतो पण माझी व तुझी विशेष ओळख आहे हे उषेच्या नजरेला मला आणायचें नव्हते आणि दुसरी गोष्ट म्हणजे रात्रीशिवाय ती तुझ्यापासून दूर होत नाहीं त्यामुळेंच ही असली वेळ मला काढावी लागली. उषा शात झोपली आहे ना ?"

"हो अगदीं शांत, बरे काय काम आहे तें सागाना ?"

"सागतो. पहिल्या प्रथम गुलाबला मी येथून घालवून देणार आहे."

"कां त्या विचाऱ्यावर कां, गदा ? तो माझ्याकरतां इतक्या लांब आला आहे, आतां त्याला अवघड कामे येत नाहींत तर सोपीं द्या."

"कामाचा प्रश्न नाहीं. येथे कसलीही माणसे खपतात त्याला पाठविण्याचे दुसरें कारण आहे."

"कसलें !" पद्मानें आश्चर्यानें विचारलें.

"उषेच्या आसपास तिची आप्तमंडळी मला ठेवायची नाहींत. तो नजरेसमोर असला म्हणजे तिला श्रीकांताची वरचेवर आठवण होणारच; शिवाय तोच तिच्या पत्राची नेआण करतो. यापुढें तें काम मला स्वतःच

हातांत घ्यावयाचें आहे त्यांत तुझी मदत मला हवी आहे, यांतच तुझ्या प्रेमाची कसोटी आहे."

"पण तुम्ही तीं पत्रें घेऊन काय करणार आहात !"

"तीं कांहीं मी फाडणार नाहीं पण माझ्याजवळ ठेवून देईन."

"पण असं करण्याचा उद्देश काय !"

"दोन महिन्याच्या अनुभवाने मला कळून आलें कीं मी जें काम योजलें आहे ते उषेभोवतालचे जुनें वातावरण पूर्ण नाहींसें केल्याशिवाय साधणार नाहीं."

"म्हणजे तुमचा विचार तरी काय आहे ?"

"त्या घमेंडखोर उषेचा नक्षा उतरावयाचा आहे."

"म्हणजे मी नाहीं समजले ! त्या बिचारीच्या कां मागें ? ती डोळ्यांत घातली तरी न खुपणारी मुलगी आहे."

"हेंच तर मला पहावत नाहीं. माझी निंदा करणाऱ्या मुलीची स्तुती मला कशी पहावेल ! किस्मतपूरला तिने माझा अपमान केला आहे."

"पण आतां नाहीं ना करीत उलट ती तुमची, तुमच्या डोळ्याची स्तुतीच करीत असते."

"पण आताच्या स्तुतीनें मागचा अपमान नाहींसा होणार नाहीं, आतां मी हें कबूल करतो कीं दोन महिन्यांत तिचें मन मी आकर्षण करीन अशी जी मला घमक वाटत होती, ती पार विलयाला गेली. याचीं कारणें शोधूं लागलो तेव्हां वरील गोष्ट माझ्या लक्षांत आली."

"तिच्यावर फक्त सूड उगवायचा आहे कां तिची अपेक्षा आहे."

"दोन्हीहि आहेत."

"मग मला का फसवलेत ?"

बोलण्यातली चूक आतां वसंतरावाच्या लक्षांत आली. तो ती चूक सावरण्याकरतां लगेच म्हणाला "सूड उगविण्यापुरतीच मी तिची अपेक्षा करतो. तिची एकदा नाचक्की झाली म्हणजे तिला कोण इथें उभे करतो ! तिला हाकलून दिल्यावर तूं मुख्य नटी आहेसच, मग तुझ्याशिवाय सिनेमाचें पान हलणार नाहीं."

" बरें पण आपल्या लग्नाचें काय ! "

" हीं कामें झाल्यावर मग ठरवूं."

" आपण आधींच करून टाकूं या. आपण भेटतो हें गुलाबच्या सुद्धां कानावर गेलेले दिसते, तो कालच मला याबाबतींत विचारीत होता. मी ती गोष्ट हसण्यावारी नेली पण त्याचें समाधान झालेले दिसलें नाहीं. त्याच्या बद्दल मला फार कींव येते. माझें त्याच्यावर प्रेम आहे म्हणून मला अली-कडे खोटेच भासवावे लागतें."

" तू अगदीं निर्धास्त ऐस, ही कामे संपल्याबरोबर पहिलें काम तें."

" मला बाई या कामांत फार भीति वाटते."

" मी आहे ना तू त्याबद्दल मुळीच काळजी करूं नकोस."

" काय काय कामें करायचीं, तीं पुन्हां एकदा सांगा पाहू."

" उषेपासून गुलाबला दूर करण्याकरता त्याला हद्दपार करणें."

" पण उषेनेच त्याची तक्रार केली तर."

" मालकाकडून तिची समजूत करीन, शिवाय तूं तिच्याजवळ असल्या-मुळें गुलाबची आवश्यकता तिला फारशी जाणवणार नाहीं."

" एक झालें. बरं पुढे ? "

" तिनें श्रीकांताला किंवा इतराना पाठविलेलीं पत्रें व तिला श्रीकांताचीं व इतरांचीं आलेलीं पत्रे माझ्याकडे आलीं पाहिजेत. श्रीकांताचें नांव तिच्या कानावर पडतां उपयोगी नाहीं, जेव्हां जेव्हा ते तिच्या कानीं पडेल त्यावेळीं त्याची निंदाच फक्त तिला ऐकावी लागेल. ती प्रमिला श्रीकांताच्या नादीं आहे नव्हे, तें हत्यार चांगले आहे."

" पत्राचें कसें काय जमेल तें जमो, कारण पत्र न आल्यास ती एखादे वेळेस तार सुद्धां करायची "

" ती तार करणार आहे अशी मला वर्दी देत जा म्हणजे मी तिची समजूत काढण्याचा प्रयत्न करीन. श्रीकांत प्रमिलेकडे गेले आहेत वगैरे थापा मारल्यावर ती तार करायची खास थांबेल.'

" तिचीं आलेलीं पत्रें मला कशीं अडवितां येतील ? ती तर रोज पत्राची वाट पहात दारांत बसते."

" पोष्टांत जाऊन मीच सर्वांचीं पत्रें आणीत जाईन म्हणजे झालें. मी पत्र आलें नाहीं म्हटल्यावर माझ्यावर विश्वास ठेवणार नाहीं असें आज तरी खास वाटत नाहीं, पुढचें पुढें पाहूं तूं मात्र पोष्टांत जातांना मी पत्र टाकते म्हणून नेमानें तिच्याकडून पत्र मागून घेत जा."

" त्या बिचारीच्या विरुद्ध वागण्याचें माझ्या जीवावर आले आहे अशा तऱ्हेनें विरुद्ध जाण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं कां ! "

" नाहीं. सध्यां तरी दुसरा कांहीं दिसत नाहीं. आणि हें पहा तिच्या टेबलावर जो श्रीकांताचा बारका फोटो आहे तो नाहींसा कर, नाहीं तर माझ्याकडे आणून दे."

" फोटो आणून काय करायचें आहे ? "

" तिच्या डोळ्यासमोरून श्रीकांत अजिबात नाहींसा झाला पाहिजे मग तिचें मन चंचल कसें होत नाहीं तें बघतो."

" कमाल आहे तुमच्या कारस्थानाची; आणखी कांहीं आहे कां ? "

" आणखी थोडेसें काम आहे तूं नेहमीं माझी व माझ्या कामाची तिच्याजवळ स्तुती करायचीस."

" हें काम मात्र सोपें आणि माझ्या आवडीचें आहे."

" बस्स्, सध्या येवढेच काम तुझ्याकडे आहे. त्या गुलाबला काढल्यावर, तो थोडासा दंगा करील, तुला चल म्हणेल त्यावेळीं त्याला काय उत्तर द्यायचें हें तुला ठाऊकच आहे."

" त्याची नको काळजी मला येवढेच वाईट वाटतें कीं गुलाबला आजपर्यंत विनाकारण नादीं लावले. बाकी तुम्ही भेटायच्या आधीं त्याच्याशींच लग्न करण्याचा माझा विचार होता. आमच्या त्या बाबतींत आणाशपथा सुद्धां झाल्या होत्या."

" पण तुम्हा भाईलोकांना ईश्वरमान्य नसल्यामुळें शपथा पाळायचें तुमच्यावर बंधन नाहींच."

" असेंच कांहीं केवळ नाहीं पण मला आतां त्याच्या प्रेमाचा वीट आला आहे."

" उद्या दुसरा कोणी भेटला तर माझ्याही प्रेमाचा वीट येईल."

" म्हणून म्हणते लग्न करून टाका; माझी उद्यासुद्धा तयारी आहे.

" जाऊं दे माझा तुझ्यावर विश्वास आहे. हें काम; झाल्यावर पहिल्या मुहूर्तावर लग्न उरकून घेऊं."

" बरं आहे जाते मी आतां उषाताई उठली तर पंचाईत."

# काश्मीरचा प्रवास

## १४

रमेशच्या अर्जाला लवकरच उत्तर आलें त्यांत त्याला नोकरी सोडण्याला परवानगी मिळाली होती. सर्कसच्या मालकाचेंहि याच वेळीं पत्र आलें होते त्यांत त्यानें सर्कशींत येण्याबद्दल पुन्हां त्यास विनंति केली होती.

वीणाशंकर व त्याच्या मंडळीची रमेशनें बरीच वाट पाहिली पण त्यांना इकडे येण्याला सवड झाली नाहीं. त्याच्या अदमासाप्रमाणें शालिनीच्या लग्नाची वार्ताहि त्याच्या लवकरच कानीं आली. त्यामुळें त्याला अत्यंत वाईट वाटलें. दुःखात सुख येवढेच कीं लग्नाच्यापूर्वी शालिनीचे त्याला पत्र आलें होतें त्यात तिनें लिहिले होतें कीं नाइलाजानें मला लग्न लावावें लागत आहे, तरी पण माझें तुमच्यावर प्रेम कायम आहे. तेव्हां या पुढील आयुष्यांत पतिपत्नीच्या ऐवजी बहीणभावाच्या नात्यानें खास भेटू.

आतां रमेशच्या मागें कोणताच पाश राहिला नाहीं, तेव्हां प्रमिलेची परवानगी घेऊन त्यानें सर्कसकडे कूच केलें. मालक त्याची वाटच पहात होता, तो आल्याबरोबर सर्कशीतील सर्व लोकांची त्यानें ओळख करून दिली. ते रशियन कोसाक्स मात्र त्याला औपचारिक रीतिनें भेटले पण बारकाईनें पाहिलें असतां ते याच्यावर जळफळतच आहेत असें दिसत होतें. त्यांची वर्तणूक अर्थात् रमेशच्या नजरेतून सुटली नाहीं. बाकीच्या सर्व लोकांना रमेशचे आगमन आनंददायक वाटलें. विशेषतः कामगार लोकांकडून त्याचें मनापासून अभिनंदन झालें. त्या लोकांतील

ल्युसी म्हणून एक प्रमुख मुलगी होती तिनें तर रमेशला माहिती विचारून विचारून नकोसें केलें.

मालकानें जरी सर्कशींत काम फार कमी देण्याचें ठरविलें होतें तरी कांहींतरी निमित्तानें त्याला बहुतेक रोजच कामें करावीं लागत. पुढें पुढें तर त्याचीं कामें इतकीं सफाईदार होऊं लागलीं कीं फक्त त्याचेंच काम पहायला म्हणून लोक येऊं लागले. इतकीं कामें करीत असे तरी मालकानें त्याच्या-कडे आसिस्टंट मॅनेजरचीं कामें दिलींच होतीं. तींसुद्धा कामें इतकीं व्यव-स्थेशीर व चोख होत कीं मालकापासून तो अगदीं खालच्या नोकरा-पर्यंत तो सर्वांना हवासा वाटूं लागला.

हां हां म्हणतां ४ महिने निघून गेले. मालकानें खुशीनें त्याला आतां १०० रुपये पगार सुरू केला होता. त्यामुळें तोहि आनंदांत होता. पूर्वीं ठरल्याप्रमाणें सर्कस काश्मीरांत मुक्काम करणार होती तेव्हां तेथें जाण्याची पूर्वतयारी करण्याकरतां मालकानें रमेशला बोलावलें. तो म्हणाला, "रमेश तुला येणाऱ्या पुस्तु, पंजाबी, हिंदी भाषेमुळें आमचा सबंध पंजाबचा प्रवास फार सुखकर झाला पण आतां काश्मीरांत जायचें आहे. तेव्हां तुला त्यांची काश्मीरी भाषा येते का !"

रमेश हसून म्हणाला, "सैन्यांत असताना पुस्तु, पंजाबी, हिंदी भाषेच्या मी परीक्षाच दिल्या होत्या, त्यामुळें मोडकें तोडकें का होईना, पण मला त्या भाषेंत बोलतां येत होतें. एका मुलीला सोडविण्यांत मला पुस्तु भाषेचा पहाडांत फार उपयोग झाला, पण आतां काश्मीरांत त्या भाषांचा कांहीं उपयोग नाहीं. कांहीं दिवस तरी इंग्रजीवर भागवून नेलें पाहिजे. दुभाषाच्या मदतीनें बोलण्यापुरती तरी ती भाषा लवकरच मी शिकेन असें वाटतें."

"उत्पन्न चांगले झालें, तर आपला तेथील मुक्काम दोन महिने सुद्धां वाढ-विण्याचा माझा विचार आहे तेव्हां तूं पुढें जाऊन महाराजांचे खासगी कार-भारी पंडीत बिंदुमाधव म्हणून आहेत ते चांगले शिकलेले असून B.A.,LLB आहेत त्यांना भेटून सर्कशीची नीट व्यवस्था लागेल असें करावें."

रमेशनें ही गोष्ट तात्काळ कबूल केली व त्याप्रमाणें लगेच तो सर्कशच्या,

मुक्कामातून पुढें निघाला. रावळपिंडीपर्यंत आगगाडीनें नंतर २०० मैल मोटारने प्रवास करावा लागतो हें त्याला माहीत होते म्हणून ती त्या तयारीनेच निघाला. रावळपिंडीस तो सकाळींच उतरला. तेथे महाराष्ट्रीय मंडळी आहेत असे कळल्यावरून सामान स्टेशनावर क्लोकरूममध्यें टाकून तो टांग्यातून नव्या मोहोल्यांत त्याचे बिऱ्हाडीं गेला. बरेच दिवसात दक्षिणी मंडळी भेटली नसल्यामुळें यावेळीं त्याला विशेष आनंद झाला. थोडा वेळ त्याच्याशीं गप्पा मारून व परत येताना एक दिवस मुक्काम करण्याचें वचन देऊन तो पुढे मोटार ठरविण्यास निघाला. सकाळीं गप्पांत वेळ गेल्यामुळे सर्व टूरिंग गाड्या निघून गेल्या होत्या. लॉरींतून जाणें त्याला सोईस्कर नव्हते म्हणून त्याला नाइलाजानें स्पेशल टुरिंग काढून एकटयानेंच २०० मैलाचा प्रवास करणें भाग पडलें. रावळपिंडीतील राजाबझारमधील आकाश हॉटेलात रोटी, आलू, छोले (फुलक्या बटाटे व हरबऱ्याची उसळ) यावर ताव मारून सकाळीं १० वाजतां तो तेथून निघाला.

मरीचा बर्फाच्छादीत डोंगर पाहून त्याला फारच आल्हाद झाला. तिसऱ्या प्रहरीं तीनच्या सुमाराला तो १०० मैलावरील दूमेल गावीं पोहोचला. तेथें काश्मीरांत जाणाऱ्या सामानाची कसून झडती घेण्यांत येते, त्याचप्रमाणें प्रत्येक इसमाचें नांव गांव काश्मीरात किती दिवस रहाणार वगैरे विचारपूस होते व त्या तऱ्हेचा लेखी जबाब एका वहींत द्यावा लागतो.

तेथें विनाकारण वेळ मोडल्यामुळें काश्मीरांत पोहोचायला उशीर होईल कां काय अशी त्याला भीति वाटूं लागली, त्यामुळें गाडीचा वेग वाढविण्यास त्यानें ड्रायव्हरला सूचना दिली. त्यालाहि तेथें लवकर पोहोचण्याची इच्छा होतीच त्यामुळें रस्ता अगदीं वाईट होता तरी त्यानें गाडी भरधांव काढली.

एका तासाच्या आंत सकाळीं ७ वाजतां रावळपिंडीहून निघालेल्या टूरिंगकारला त्यानें गाठलें. धूळ खायला नको म्हणून सर्वांना तो मागें टाकीत चालला; पण एक गाडी रस्त्याच्या मध्यावरच नादुरुस्त झाल्यामुळें त्यालाही आपली मोटार थांबवावी लागली.

रमेश व तो ड्रायव्हर पुढल्या गाडीला काय झालें तें पाहूं लागले. एंजिन फेल झालें होतें. दोन्ही बाजूचीं झांकणें काढून त्या गाडीचा ड्रायव्हर पेट्रोलच्या नळ्या साफ करीत होता. एकट्या मोटारला रानांत टाकून जाणें धंद्याच्या दृष्टीनें गैर असल्यामुळें रमेशचा ड्रायव्हर त्या गाडीच्या दुरुस्तीला आपणही मदत करूं लागला. रमेशही ते काय करतात हें पहात होता इतक्यांत त्याच्या नांवानें कोणीतरी हांक मारली असें त्याला वाटलें. त्या बरोबर चमकून तो पुढच्या मोटारीकडे बघूं लागला. शालिनीला त्या मोटारींत पहातांच त्याला मनापासून आनंद झाला. ती यावेळीं मोटारींतून खालीं उतरत होती "रमेश, तुम्हाला पाहून किती आनंद झाला म्हणून सांगूं! आज चार महिन्यानीं तुमची गांठ पडते आहे. तुम्हाला माझें पत्र मिळालें ना!"

"हो मिळालें" त्या पत्राची आठवण झाल्यामुळें रमेशच्या मनाला किंचित् वाईट वाटलें.

शालिनी पुढे म्हणाली, "चला माझ्या पतीची व तुमची ओळख करून देते" मोटारीजवळ येऊन ती नवऱ्याला उद्देशून म्हणाली, "ज्याच्याबद्दल मी व बाबा नेहमीं बोलत असतो तेच हे रमेश, यांनीं बन्नूला एका मुलीला कशी सोडविली हे आपल्याला सांगितलेंच आहे. रमेश हे लेफ्ट. आनंदराव बन्नूच्या मराठा रेजिमेंटमध्ये असतात."

आनंदरावानें बाहेर येऊन रमेशशीं हस्तांदोलन केलें. डोळ्यावर दारूची निशा रमेशला स्पष्ट दिसत होती, त्यानें त्याच्याकडे पाहून नंतर शालिनीकडे पाहिलें. तो आपल्याकडे कां पहातो आहे हें तिच्या लक्षांत येण्यास वेळ लागला नाहीं, तिचा चेहेरा दुःखी झालेला पाहून आपण उगीच तिच्याकडे पाहिले असें रमेशला वाटलें, तो लगेच हंसरा चेहरा करून म्हणाला, "मिस्टर आनंदराव, ही काश्मीरची प्लेझर ट्रीप दिसते? किती दिवसाची रजा आहे?"

"सध्यां एक महिन्याचीच मिळाली आहे जरूर वाटल्यास पुढे वाढवूं. पण तुम्ही कुठें इकडे?"

"मी सध्यां सर्कसमध्यें नोकरी आहे हे तुम्हांला ऐकून कळलेंच असेल,

आमची सर्कस आता काश्मीरांत जाणार असल्यामुळें तिची व्यवस्था करण्याकरितां मी पुढें जात आहे."

" बरें झालें आम्हांला करमणूक तरी होईल. लग्न झाल्यापासून ही सारखी मागें लागली आहे कीं चार दिवस तरी तुम्हांला पाहुणचाराला आपल्या इथें बोलवा. परवा राखीबंधनाला ती तुम्हांला तार करून बोलावणार होती."

" आनंदराव, शालिनी लाखांत मुलगी आहे. तिच्या गोड स्वभावाची तुम्हांला हळूहळू कल्पना येईलच. आम्ही जन्मानें एका आईची मुलें नसल्यामुळें माझें येणें आपल्याला आवडेल कां नाहीं याची शंका वाटल्यामुळें आपल्याकडे येण्याचे मी आजपर्यंत धाडस केलें नाहीं."

" Nonsense " असली भलती शंका मनांत कशाला आणलीत; आतां यापुढे माझें घर तुम्हाला केव्हांही मोकळें आहे."

" याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे."

मोटार लवकर दुरुस्त होण्याचें चिन्ह दिसेना, तेव्हां काय करावें अशी त्यांना पंचाईत पडली. ज्यास्त वेळ राहिल्यास रात्रीं वाटेंत मुक्काम करावा लागणार हें स्पष्ट दिसत होतें. तेव्हा या दोघांनीं रमेशच्या गाडींतून पुढें चलावें असें त्यानें सुचविलें. पण बाकीचे तीन पॅसेंजर आनंदरावाच्या सैन्यांतील त्याच्याच वरचे अधिकारी असल्यामुळें त्यांना सोडून आनंदरावांना निघतां येईना, शेवटीं आनंदरावालाच काय वाटलें कोणास ठाऊक तो एकदम म्हणाला," Well, मिस्टर रमेश, तुम्ही आपल्या बहिणीला घेऊन पुढें व्हा आम्ही मोटार दुरुस्त झाली की निघतोंच."

हा गृहस्थ खरोखरच मनापासून बोलतो आहे का चेष्टा करतो आहे याचीच एक क्षण रमेशला शंका वाटूं लागली. तो शालिनीकडे पाहूं लागला. तिनें चलण्याबद्दल डोळ्यांनी त्याला खूण केली, तेव्हां तो आनंदरावाकडे वळून म्हणाला. " तुम्ही दोघेही आला असतां तर बरें झालें असतें तुम्ही येईपर्यंत आम्हाला काळजीच आहे तेव्हां म्हणतो की, तुम्हीही माझ्याच मोटारींतून चला."

" तिला एकटीलाच घेऊन जाहो, आम्ही ऑफिसर एकमेकापासून दूर रहात नाहीं. तुम्ही श्रीनगरांत उतरणार कोठें!"

" खालसा हॉटेलात."

" अच्छा जाव, शालिनी तूंही जा व आमची उतरण्याची व्यवस्था कर, आम्ही चौघेही एकाच खोलींत रहाणार आहोत."

जास्त वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं असें पाहून तो शालिनीला घेऊन निघाला. मागची मोटार दिसेनाशी होईपर्यंत शालिनी मागे वळून बघत होती. ती दिसेनाशी झाल्याबरोबर तिला एक जोराचा हुंदका आला. तिच्या या वर्तनाचें रमेशला फार नवल वाटलें तो तिच्याकडे पहात म्हणाला, " शालिनी हें काय ! तुला एकटें आल्याबद्दल वाईट का वाटतें आहे ?"

" रमेश, किती मी अभागी, मृगजळाच्या मागे लागून मी आपला सर्वस्वी घात करून घेतला आहे."

" काय हकीगत आहे ती नीट सांग तरी. आधी डोळे पूस पाहूं."

शालिनीनें डोळे पुसले. ती म्हणाली, " तुम्ही कोहटहून गेल्यावर आठ दिवस मला मुळींच चैन पडलें नाहीं. पुढे हळुहळू बाबांनी माझें लग्न ठरविल्याची वार्ता माझ्या कानावर येऊं लागली. पहिल्या प्रथम लग्नाला साफ नकार देण्याचा माझा विचार होता पण अधिकाराची लालसा, हुकूमशाही गाजविण्याची आशा व सुखांत दिवस काढण्याची प्रबळ इच्छा या सर्व विकारांना बळी पडून थोड्या नाखुशीने का होईना पण मी सम्मती दिली माझी संमति मिळताच आमचें तावडतोब लग्न झाले."

" मग एकूण तुझ्या इच्छेप्रमाणेंच सर्व गोष्टी घडल्या."

" माझें बोलणे पुरते ऐकून तर घ्या. लग्नाच्या दुसऱ्या दिवसापासूनच माझ्या दुःखाला सुरवात झाली."

" शालिनी काय सांगते आहेस हें " तिच्या बोलण्यानें वाईट वाटून रमेश म्हणाला.

" अगदीं खरें आहे तेंच सांगतें आहे. ते मदिरेच्या भयंकर मगरमिठींत सांपडलें आहेत हें मला पहिल्या दिवशींच कळलें. पण मग काय उपयोग ! मदिरेमुळें ते स्वेच्छाचारीही बनले आहेत असें मला नंतर कळलें,

रात्री १२ वाजले तरी मागच्या मोटारींत बसलेल्या त्रिकूटाच्या मगर-मिठीतून ते बाहेर निघत नसत आरे नंतर आले तरी जवळजवळ पूर्ण गैर-शुद्धीतच येत. अधून मधून आमच्या घरींही हा दंगा चाले. अशा अचाट खर्चामुळें सावकारांनीं निम्मा पगार सरकारमार्फत कापून घेतला आहे. त्यामुळें नेहमीं घरूनच पैसे मागवावे लागतात.त्याशिवाय दुसऱ्या सावकारांचे कर्ज आहे तें निराळेंच."

"अरेरे, शालिनी केवढें संकट तू आपल्यावर ओढून घेतलेस !"

"मला जगात तोंड काढायला जागा राहिली नाहीं. बाबाना यांच्या लीला नंतर कळल्या पण मग काय उपयोग ! ते आता माझ्याशीं बोला-यलाही लाजतात."

"नारायणरावांना आतां पश्चात्तापाशिवाय काय मार्ग उरला आहे."

"रमेश, अशा संकटांत सांपडल्यामुळे असा एकही क्षण जात नाहीं कीं तुमची मला आठवण होत नाहीं. तुमच्याबरोबर मी शिळी मीठ-भाकरीसुद्धां आनंदानें खाल्ली असती. माझा हावरा स्वभाव मला नडला माझ्या सर्व आयुष्याचा सत्यानाश झाला आहे."

"ही तुझी जन्मठेप कैद आहे आतां त्यांतून सुटका नाहीं."

"त्या दुसऱ्या ऑफिसरांच्या तडाख्यांतून सुटले म्हणून मला किती तरी समाधान वाटतें आहे. खरोखर रमेश, त्यावेळीं तुम्ही मला देवासारखे वाटलात."

"पण आनंदरावानीं तुला एकटीला माझ्याबरोबर यायला कशी पर-वानगी दिली ?"

"त्याला कारण आहे. दारूपुढे त्यांना बायकोची काय किंमत आहे मी मोटारींत असल्यामुळे त्याना मनसोक्त पिता येत नव्हतें, आतां बाटल्याच्या बाटल्या फस्त करीत असतील."

"त्यांना आपल्याबरोबर येण्याची इच्छा याचकरतां नव्हती वाटतें ?"

"मग दुसरें काय ! म्हणूनच मी तुम्हाला चला म्हणून खूण केली, नाहींतर एखादेवेळीं पुन्हा बेत फिरायचा. ते विघेही ऑफिसर फाजिल दिसतात; मध्यंतरी त्यांनीं माझीसुद्धां चेष्टा केली होती त्यावेळीं मला फार

संताप आला होता पण यांनीं हंसण्यावारीच नेले. लग्न झाल्यापासून तुमच्याबद्दल जेव्हां जेव्हां बोलण्याची वेळ येई तेव्हा तेव्हां सांगत असें कीं, तो माझा भाऊ आहे त्याला घरीं घेऊन या, हेतु हा कीं तुमची अवचित गांठ पडल्यास दोघांनाही संकोच नको आणि त्याकरतांच तुम्हाला पत्र मिळालें कां म्हणून आठवण दिली. माझ्या कमनशिबानें मला आज हें नातें जोडावे लागत आहे. रमेश त्याबद्दल राग नाहीं ना आला?"

"खरं सांगायचे म्हणजे तुझ्याबद्दल राग आला होता पण लगेच नाहींसाही झाला. नंतर दुसऱ्या क्षणीं तुझ्या हावरेपणाची कींव आली पण तुझ्या हावरेपणाला असें बक्षीस मिळेल असे वाटले नव्हते. आतां तूं काय करायचें ठरवलें आहेस ?"

"तुम्ही असल्यामुळें मला आतां बराच धीर आला आहे. या चौकडीचा कोठेंतरी रानांत ट्रिप काढण्याचा विचार आहे. मलाही बरोबर नेण्याचा त्यांचा आग्रह चालला आहे पण मला त्या तिघांची फार भीति वाटते. मी निघेपर्यंत हे तिघेजण येणार म्हणून कल्पना दिली नव्हती. नाहींतर मी निघालेंच नसते. पण नंतर काय उपयोग आता माझा नुसता देवावर भरंवसा आहे."

"नुसत्या देवावर विसंबून ईश्वर मुळींच मदत करणार नाहीं स्वतः खटपट करणारालाच ईश्वर मदत करीत असतो."

"तें खरें पण मी काय करूं तें सांगा."

"श्रीनगरांत गेल्यावर काय तें ठरवूं. आधीं पहिल्याप्रथम तुझे माझ्या-बद्दल प्रामाणिक मत हवें."

"तुमच्याबद्दलचें माझें मत काय आहे तें अजूनसुद्धां का माहीत नाहीं?"

"तसं नव्हें. पूर्वीचें मत सोडून देऊ—आतांचा प्रसंग पहा. जिच्या-करतां मी जिवापाड धडपड करीत होतो, तिने माझा धिक्कार करून दुसऱ्याशीं लग्न केलें व तीच सुदैवानें माझ्या ताब्यात सांपडली आहे. एकटी आहे, रात्रीं मुक्काम केल्यावर माझ्याशिवाय जगांत तिला कोणी नाहीं. किंवा मदत करायला कोणी येणार नाहीं. बोल, माझी सूडाची इच्छा

जागृत असताहि तूं विश्वासानें माझ्याबरोबर रहाशील ? नीट विचार करून उत्तर दे."

" यांत विचार करण्यासारखें काय आहे " शालिनीनें ताबडतोब उत्तर दिलें. ती पुढें म्हणाली, " तुमच्या बाबतींत खरोखरच विचार करण्याचे कांही कारण नाहीं. मी ईश्वराला स्मरून सांगते कीं तुम्ही कसल्याहि परिस्थितींत असला तरी आपले शील सोडणार नाहीं अशी माझी खात्री आहे. स्वप्नांतसुद्धां तुमच्याबद्दल माझ्या मनांत कुकल्पना आली नाहीं."

" शालिनी तुझ्या या विश्वासाबद्दल मी तुझा सदैव ऋणी आहे. दुसऱ्या नात्याची मी अपेक्षा केली होती पण ईश्वराने मला भगिनीच अर्पण केली आणि शालिनी तुला आश्वासन देतो कीं आपण दोघे एकत्र कोठेंही असलो तरी आपले बहीणभावाचेच नातें राहील."जगांत माझा एक भाऊ पाठीराखा आहे " हें तुझ्या तोंडचे वाक्य ऐकण्यांतच मी धन्य मानून घेईन."

" हें वाक्य मी पूर्वीच यांच्याजवळ एकदोनदा उच्चारले होते. यापुढें मी तुला अहो जाहो न म्हणता अरे तुरे असे हक्काचे शब्द वापरणार आहे. याला तुझी हरकत नसेलच."

" मुळींच नाहीं. यामुळे उलट मला आनंदच झाला आहे."

" तूं भेटल्यामुळें जगात थोडे दिवस जगावें असें मला वाटूं लागले आहे. नाहीतर कदाचित् त्या तिघाच्या त्रासाने कडेलोट करण्याचें मी ठरविलें होतें."

" असले वेडे विचार यापुढें कधीं मनांतसुद्धां आणूं नकोस."

" आतां त्याची आठवण सुद्धां होणार नाहीं. बरें पण पूर्णेदूची काय वाट ! तिचा कांहीं पत्ता लागला कां !"

" छे मुळींच नाहीं. आमच्या गांवीं तिचें एकदा पत्र आलें होतें त्यानंतर कांहीं माहिती नाहीं."

" माझाच त्यांत हलगर्जीपणा झाला आहे. कोल्हापूला असतांना मीच तिच्याबद्दल चवकशी करायला हवी होती पण मी स्वतःच्याच फिकीरींत

असल्यामुळें मला तें धोरण राहिलें नाहीं. आतां पुन्हां परत कोठेंला गेल्या-
वर असली चूक होणार नाहीं."

"ती स्त्री तरी कसली आहे हें पहाण्याच्या उत्कंठेशिवाय तिच्याबद्दल
मला कसल्याच भावना नाहींत, त्यामुळें तिच्याबद्दलची माहिती तूं परत
गेल्याबरोबर दिलीस काय किंवा एक वर्षानें दिलीस तरी माझ्या वृत्तींत
कांहीं फरक होणार नाहीं."

## मीनाची भेट ! १५

आनंदराव व त्यांची पार्टी त्या रात्रीं न आल्यामुळे रमेशनें शालिनीची एका स्पेशल खोलींत झोपण्याची व्यवस्था केली व आपण बाहेर व्हरांड्यांतच आसन ठोकलें. कारण यावेळीं आणखी एकही खोली रिकामी नव्हती.

एकंदर श्रमानें व प्रवासाच्या दगदगीमुळें रमेशला इतकी गाढ झोप लागली कीं सकाळीं शालिनीला त्याला हलवून जागा करावा लागला. झोप उत्तम लागल्यामुळे त्याला चांगलीच हुषारी वाटत होती. प्रातर्विधी आटोपल्यावर नोकरानें किटलींत आणलेला चहा ओतींत शालिनी म्हणाली, " आजचा तुझा काय कार्यक्रम आहे ? "

" आज पहिल्या प्रथम पंडित बिंदुमाधवाचा बंगला गाठतो, तें काम आजच्या आज उरकल्यास मी आणखी एखादा दिवस राहूं शकेन. "

" कसेंही करून एक दिवस रहाच तितकाच मला आधार होईल. ही मंडळी बहुतेक ११ वाजतां येतील असे हॉटेलच्या मालकाचे म्हणणें आहे."

" मीही बहुतेक तोपर्यंत परत येईन. आज शेजारची खोली रिकामी होणार आहे तिची किल्ली तुझ्याजवळ देण्यास मी मालकाला सांगितलें आहे. "

" ठीक आहे आज संध्याकाळीं आपण फिरावयास जाऊं या. "

" आधीं आनंदरावांना येऊं दे मग बघूं. "

" बरें तूं जा आणि लवकर काम आटोपून ये. "

युरोपियन पद्धतीचा पोषाख करून रमेश लवकरच त्या हॉटेलमधून बाहेर

पडला. पडीत बिंदुमाधवाचा पत्ता लागण्यास त्याला फारसा वेळ लागला नाहीं. शंकराचार्यांच्या टेकडीच्या पायथ्याशींच विस्तीर्ण बगीचानें वेष्टिलेला असा त्याचा प्रशस्त बंगला होता. त्या बंगल्याचें नांव 'इंद्रभुवन' असून नावाप्रमाणेच तो वैभवसपन्न दिसत होता.

इंग्रजी पद्धतीप्रमाणें त्या बंगल्याची रचना होती. आंत शिरल्याबरोबर एक मोठा हॉल असून, मध्यभागी एक मेज व त्याभोवती पांचसहा खुर्च्या नीट रीतीनें मांडून ठेवल्या होत्या. टेबलावर दोनतीन इंग्रजी वर्तमानपत्रें व मासिके पडलीं होतीं.

रमेश दिवाणखान्यांत येताच तेथें पहाऱ्यावर असलेल्या शिपायानें त्याला उत्थापन देऊन सलाम केला. रमेशला काश्मिरी भाषा येत नसल्यामुळें त्यानें आपले व्हिजिटिंग कार्ड त्या शिपायाच्या हातांत दिलें. शिपायी कांहीं तरी बोलला पण रमेशला त्याचें बोलणे मुळींच कळेना. त्यानें तूं काय म्हणतोस ते कळत नाहीं असें खुणेने कळविले तेव्हां तो शिपायी ते कार्ड घेऊन आत गेला. जातांना खुर्चीकडे बोट दाखवून त्यावर बसण्याची रमेशला त्यानें विनंती केली.

टेबलावर पडलेल्या मासिकाकडे दृष्टी जातांच तेथे लहान मुलाकरतां असलेले मराठी शालापत्रक मासिक पाहून त्याला अत्यंत आश्चर्य वाटलें. कित्ती तरी दिवसांत त्याला मराठी मासिकें वाचायला मिळालीं नव्हतीं, त्यामुळें तें मासिक हातांत घेऊन मुलाच्या गोष्टी वाचण्यांत तो गढून गेला.

शिपायाला जवळ जवळ त्याला हलवावें लागलें तेव्हां दचकून त्यानें वर पाहिलें. त्यावेळीं समोरच त्याच्यापुढे १९।२० वर्षांची मुलगी उभी असलेली त्याला दिसून आली. त्याबरोबर स्वतःच्या गबाळेपणाची त्याला इतकी लाज वाटली कीं त्याच्या हातून तें मासिक खालीं गळून पडलें व तो मान खालीं घालून उभा राहिला.

रमेशचा पोषाख अपटुडेट युरोपियन पद्धतीचा होता. जात्या तो चांगलाच गोरा असल्यामुळें नीट निरखून पाहिल्याशिवाय तो युरोपियन नाहीं हें लोकांच्या लक्षांत येत नसे. त्याच्याकडे अत्यत विस्मयानेंच निरखून पहात ती मुलगी अस्खल इंग्रजींत म्हणाली.

" आपल्याला कोण पाहिजे. "

" मला कारभारी साहेबांना भेटायचे आहे." रमेशनें विनयानें उत्तर दिलें. तिच्या चेहऱ्याकडे बघण्याचा त्याला अद्याप धीर होत नव्हता.

" ते सध्या महाराजांना भेटायला गेले आहेत. आमच्या शिपायानें तुम्हांला हाच निरोप सांगितला होता पण तो तुम्हाला न कळल्यामुळें मला स्वतः इकडे येऊन तो सांगावा लागला. "

" आपल्याला तसदी पडली याबद्दल दिलगीर आहे मला काश्मीर भाषा कळत नसल्यामुळे हा घोटाळा झाला. आता ते केव्हां भेटतील ! "

" आणखी दोन तासानें ते परत येतील त्यावेळीं त्यांची गांठ पडेल. त्यांना कांहीं निरोप असल्यास सांगून ठेवावा. "

" निरोप कांहीं नाहीं. मीच स्वतः दोन तासानीं पुन्हां येईन. तसदीची माफी असावी. "

रमेश उठलेला पाहून ती व्हिजिटिंग कार्डकडे पहात म्हणाली, " या चिठ्ठी-वर फक्त ' मॅनेजर रशियन सर्कस ' येवढींच अक्षरें आहेत आपले नांव नाहीं तरी ते कळलें म्हणजे बाबासाहेबांना निरोप सांगण्यास ठीक पडेल. "

ही बिंदुमाधवाची मुलगी असावी असें रमेशने अनुमान केलें. तो एक क्षण विचार करून म्हणाला " मी हिंदु असून रशियन सर्कसचा मॅनेजर आहे हे युरोपियन वगैरे लोकांना आवडणार नाहीं म्हणून व्यापारी दृष्टीने त्या चिठ्ठीवर फक्त ' मॅनेजर रशियन सर्कस ' असाच मजकूर छापविला."

" आणि तुमच्या पोषाखावरून व स्वरूपावरून तुम्ही हिंदु असाल अशी कोणाला फारशी शंका आली नसेल. " त्या मुलीनें हंसत प्रश्न केला.

" हो. असें झालें खरें. "

" तुम्ही महाराष्ट्रीय आहांत अशी तुम्हांला पाहिल्याबरोबर माझी कल्पना झाली. "

" माझ्या चेहऱ्यापेक्षा माझ्या हातांतील पुस्तकांमुळेंच माझें बिंग बाहेर फुटलें असावें." तिच्या मोकळेपणाच्या बोलण्यानें धीर येऊन रमेश पुढें म्हणाला. " पण हें मराठी मासिक येथें कसें ? "

" माझ्या वडिलांचे दोन तीन महाराष्ट्रीय स्नेही आहेत. त्यामुळें

मराठी भाषा काय असते याचा मी आपल्या घरींच पुस्तकावरून अभ्यास सुरूं केला. अक्षरओळख झाल्यावर अगदीं सोपे मराठी मासिक म्हणून मी हा अंक मागविला आहे."

"स्तुत्य आहे. बरें आपली रजा घेतो माझें नांव रमेश."

"दोन तासांनीं बाबासाहेबांना भेटायला जरूर या. एक दक्षिणी इसम एका मोठ्या रशियन सर्कसचा मॅनेजर आहे हें आमच्या बाबासाहेबांना कळल्यावर त्यांना फार आनंद होईल त्यांना दक्षिणी लोकांच्या विद्वत्तेबद्दल फार आदर आहे."

"या बातमीनें मला मनापासून आनंद झाला आहे. आतां त्यांना भेटतांना मला कितीतरी मोकळेपणा वाटेल !"

"तुम्ही उतरलात कोठें ?"

"खालसा हॉटेलांत."

"असे कां बरें एक क्षणभर बसा."

त्या मुलीनें क्षणभर बसण्यास कां सांगितलें हें रमेशच्या लक्षांत आलें नाहीं. पण एका ब्राह्मणानें कपबशीत चहा व बिस्किटें आणून ठेवलेलीं पाहून त्याचा उलगडा झाला. त्या मुलीचें नांव कळल्यास पहावें म्हणून त्यानें मासिकाचें पहिलें पान उलगडून पाहिलें तों त्यावर 'मिस् मीना' असें वाकड्या तिकड्या मराठी अक्षरांत नांव काढलेलें दिसलें. तें नांव कळतांच त्याला फार आनंद झाला.

चहाचा स्वीकार केल्यावर तो उठला. जातांना त्या मुलीचा निरोप घेऊन जावें असें त्याच्या फार मनांत होतें पण ती त्याला पुन्हां दिसली नाहीं.

आपल्याला काश्मिरी भाषा येत नसल्यामुळें मोठाच फायदा झाला अशा आनंदी वृत्तीनें तो तेथून परतला. परत जातांना शालिनीनें कांहीं सामान आणायला सांगितलें होतें तें खरेदी करून तो हॉटेलांत आला यावेळीं ११ वाजून गेले होतें.

घरीं आल्याबरोबर त्याला शालिनीची चिठ्ठी मिळाली त्यांत तिनें लिहिलें होतें कीं 'मंडळी १० वाजतांच येथें आलीं. पण सर्वांनीं बोटीवर रहाण्या-चेंच पसंत केल्यामुळें तिकडेच जाण्याचा सर्वांचा विचार ठरला. मी फारच

आग्रह केल्यावर यांनीं हॉटेलांत रहायचे कबूल केलें आहे, पहावें निश्चय कितपत टिकतो तो. बोटीवर रहाण्याची काय काय व्यवस्था असते हे पहाण्याकरतां मी तिकडे गेले आहे. कदाचित् तिकडूनच जेवण करून येईन तरी माझी वाट पाहू नये. मी ३।४ च्या सुमाराला परत येतें त्यावेळीं आपण बागा पहाण्यास जाऊं अधिक खुलासा भेटीअंतीं."

शालिनीकरतां थांबण्याची आतां जरूरी नसल्यामुळे रमेशनें आपलें जेवण उरकून घेतलें व पंडीत बिंदुमाधव याच्याकडे जाण्याची तयारी करूं लागला. इतक्यांत त्याला नेण्याकरतां बिंदुमाधवाचीच मोटार आलेली पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें पण फारसा विचार न करतां तो मोटारींत जाऊन बसला.

योग्य वेळीं तो बंगल्यावर पोहोचला. पंडीत बिंदुमाधव यांनीं त्यांचे चांगल्या तऱ्हेनें स्वागत केलें व त्या सर्कसला सर्व तऱ्हेची मदत करण्याचें आश्वासन दिलें. आपल्याबद्दलची त्याची कळकळ पाहून रमेशला मनापासून आनंद झाला. काम झाल्यावर त्यांची परवानगी घेऊन तो बाहेर पडला. ते आपली मोटार देत होते पण याने आभारपूर्वक तींतून जाण्याचें नाकारले, तो म्हणाला, वाटेत "मला बरींच कामें असल्यामुळ मोटारची जरूरी नाहीं. पायींच जाणे मला जास्त सोईचे होईल."

दुसऱ्या भेटींत ती मुलगी दिसेल अशी त्याची अपेक्षा होती पण ती सफल झाली नाहीं."

तेथील सर्व कामें आवरून तो तीन वाजतां परत आला.

खोलीच्या दारात पाऊल ठेवताच त्याच्या सर्कसमधील ल्यूसी नांवाच्या मुलीला तेथें पाहून तो आश्चर्यानें थक्क झाला. शिष्टाचाराप्रमाणें तिच्याशीं हस्तांदोलन करून त्यानें तिला बसायला खुर्ची दिली.

मालकानें पाठविलेला चहा घेत घेत तो म्हणाला "ल्यूसी तूं मला आज विलक्षण आश्चर्यचकीत केले आहेस ! तू इकडे केव्हां आलीस ! उतरलीस कोठें ! कां आलीस ! वगैरे हकीगत झटपट सांग."

" रमेश " त्याच्या दृष्टीला दृष्टि भिडवून ती म्हणाली, "तुमचा माझा परिचय होऊन फक्त चार महिनेच झाले पण या चार महिन्यांत तुम्ही केव्हांहि माझ्यापासून दूर झाला नाहींत. सर्कसमध्यें तुमच्याबरोबर काम

करण्यांत मला किती तरी आनंद होतो म्हणून सांगूं ! ज्या ज्या वेळीं तुमच्या शिवाय त्या दांडगट कोसॅक्स बरोबर कामे करण्याचा प्रसंग येई त्यावेळीं मला अगदीं मरणप्राय दुःख होई, पण काम करून आंत गेल्यावर तुमचा हंसतमुख चेहरा दृष्टीस पडल्याबरोबर सर्व दुःख पार नाहींसे होई. पण तुम्ही इकडे आल्यामुळे तुमच्याबरोबर काम करण्याचे तर नाहींच पण तुमचे हसतमुखही दृष्टीस पडण्याची आशा नाहीं हें पाहून मालकाकडून १५ दिवसाची रजा घेऊन मी इकडे आलें."

रमेशच्या हातातून पेला खालीं पडण्याची वेळ आली होती. पेला तसाच खाली ठेवून तो म्हणाला "ल्यूसी, केवढे तुझे हे धाडस ! मालकाना तूं इथे आली होतीस असे कळलें तर ते काय म्हणतील ? माझ्यावरचा त्याचा विश्वास उडेल."

" तुमच्यावर मालकाचा इतका विश्वास आहे कीं कांहीं झालें तरी त्यांत बदल होणार नाहीं. आता माझ्याबद्दल म्हणाल तर माझे तुमच्यावर प्रेम आहे हें सर्व जगाला माहीत आहे, तेव्हां मी इकडे आलें होतें असें कळले तरी त्याबद्दल त्यांना कांहीही वाटणार नाहीं."

" हर, हर, ल्यूसी माफ कर, दुसऱ्याने माझ्यावर प्रेम करणें मला टाळतां येणार नाहीं, पण मी तुझ्यावर प्रेम करतो असे आजपर्यंत कृतीनें कधीं तरी दर्शविलें आहे कां ? जर कदाचित् गैरसमजाने तुला तसें वाटलें असले तर त्याबद्दल तू मला क्षमा कर."

" माझ्यावर तुमचें प्रेम आहे असें तुम्ही कधींही दाखवलं नाहींत हें मला कबूल आहे पण, तुम्ही मालकाच्या धाकानें तसें वागत असाल अशी माझी कल्पना होती. शिवाय मी प्रेम दाखविल्यावर माझ्यावर प्रेम केलें नाहीं असा तुमच्याशिवाय एकहि मनुष्य मला आढळला नाहीं. त्या कोसॅक्स दांडगेश्वराची माझ्याबद्दल काय धडपड चाललेली असते याची तुम्हाला कल्पना नाहीं."

" मग त्यापैकीं एकाला पसंत करून त्याशीं लग्न कां लावीत नाहींस ?"

" पण माझे फक्त तुमच्यावरच प्रेम आहे.आणि अनायासें तुम्ही एकटेंच

या नंदनवनांत सांपडला आहात तेव्हां तुमच्याकडून कबूली मिळविण्याचा निश्चय करून मी आलें आहे."

" ल्यूसी वेडी आहेस, बळजबरीने कां कुठे प्रेम मिळते, जा, आल्या पावलीं परत जाऊन सर्कशींत कामें करूं लाग, तुझा हेतू सफळ होण्याची इथें बिलकूल आशा नाहीं."

" रमेश, मला असे निराश करूं नका, तुमच्याशिवाय मी जगणार नाहीं आज तुम्ही कबूल करीपर्यंत येथे धरणें धरून बसणार आहे."

" ल्यूसी तूं विलक्षणच पण करून आलेली दिसतेस. पण हा पण सिद्धीस जाईल असें तुला वाटतें तरी कसें."

" असे काहो तुम्ही बोलता! माझी तुम्हाला कांहींच कां दया येत नाहीं?"

" येऊन काय उपयोग ! माझ्या हातीं यापैकीं कोणतीच गोष्ट नाहीं. आपला संवाद आतां इथेंच संपवावा असें मला वाटतें."

" तुम्ही इतके निर्दय असाल असें मला वाटले नव्हतें. तुम्ही अगदीं पाषाणहृदयी आहांत. तुम्हांला मी मेले तरी पर्वा वाटणार नाहीं असंच ना?"

" कां वाटणार नाहीं, जरूर वाटेल. प्रत्येक क्षणाला आठवण होण्यासारखी तूं आनदी मुलगी आहेस, पण त्याकरतां तूं लावूं पहातेस तें नवीन नातें मात्र जुळणार नाहीं."

" पुरुष निर्दय असतात हेंच खरें. त्यांना आमच्यासारख्या विरहानें तळमळणाऱ्या जीवाची काय कल्पना येणार ! मग मी जाऊं? रमेश असें निष्ठूर होऊं नका."

" ल्यूसी जाच. नाइलाज आहे. माझ्या निर्दयपणाबद्दल क्षमा कर" ती जितकी लवकर जाईल तितकी बरी असे त्याला वाटत होतें कारण शालिनी कोणत्या क्षणाला येईल याचा नेम नव्हता.

" नशीब माझें, जातें, पण निदान आज सध्यांकाळीं तरी येथील नदंनवनांत माझ्याबरोबर हिंडायला नाहीं कां येणार ! कां त्यालाही तुमची हरकत आहे?"

" त्यालासुद्धां हरकत आहे" रमेश मनांत म्हणाला, "कारण एका ख्रिश्चन मुलीबरोबर मी हिंडत होतो असें शालिनीला किंवा बिंदुमाधवाना

कळलें तर त्यांना काय वाटेल ! बिंदुमाधवाचा मुलगी काय म्हणेल ? याची त्याला मोठी धास्ती वाटत होती. पण तिचे मन आतांपर्यंत दुखविलें या पेक्षां जास्त दुखविण्याचे त्याच्या जीवावर आले तरीपण एक कल्पना येऊन तो म्हणाला," "संध्याकाळीं यायला माझी मुळींच हरकत नाहीं पण माझी एक बहीण येथें आली आहे तिच्याबरोबर मला बाहेर जावें लागेल."

" बहीण आली आहे ! मग माझी ओळख करून द्या कीं, केव्हां येतील त्या इथे !"

" संध्याकाळीं पांचच्या सुमारास ती इथें येईल."

" बरें तर मग मी त्याच वेळेला येते. त्यांना यायला उशीर लागला तर मात्र तुम्हांला एकट्यालाच माझ्याबरोबर आलें पाहिजे आहे कबूल?"

" कबूल. पण ती आली तर मात्र आपल्या तिघांना बरोबर जावें लागेल."

" काही हरकत नाहीं, येते मी आतां आज जरी तुम्ही माझी निराशा केलीत तरी मी प्रयत्न सोडणार नाहीं. Good Bye"

ती गेल्यावर रमेशला अगदीं सुटल्यासारखे झाले. शालिनी अद्याप न आल्यामुळे त्याला चैन पडेना तेव्हा मनुष्य पाठवून बोटीवर चवकशी करण्याचें त्यानें ठरविलें व त्याप्रमाणें तो हॉटेलच्या मालकाकडे गेला.

## मयसभेंतील वातावरण ! १६

आज शूटिंगचें काम सपल्यावर रोजच्या प्रमाणें वसंतराव वगैरे मंडळीशी गप्पा मारीत न बसतां उषा तडक आपल्या बिऱ्हाडीं परतली. अंधार प लागला होता तरी दिवा वगैरे लावण्याच्या भानगडींत न पडतां पलंगावर ती स्वस्थ पडून राहिली, तिच्या मनाला तापदायक अशी काहीतरी गोष्ट आज सिनेमाचे शूटींग घेताना झाली असली पाहिजे, एरवी नेहमी आनंदी असणारी उषा आज मलूल आणि विचारी अशी दिसली नसती. पद्मा तिच्या मागोमाग तेथे आली, तिने बटन दाबून सगळीकडे प्रकाश केला नंतर उषेजवळ येऊन ती म्हणाली, " आज बरं नाहीं का वाटत ! डोकं कां दुखतें आहे ? "

" नाहीं तसें कांहींच दुखत नाहीं पण मनाला त्रास झाल्यामुळे थोडे डोकें चढलें आहे इतकेंच."

" आज कशानीं येवढें डोके चढलें ?"

" शूटिंगच्या वेळीं तूं होतीस ना ?"

" हो, होतें तर. आजच्या सारखी तुमची दोघांचीं सुंदर कामें पूर्वी कधींच झालीं नाहींत असें प्रत्येकजण आज म्हणत होता."

" कामाचे जाऊं दे ग, पण शेवटीं भेटण्याचा सीन घेण्याच्या प्रसंगी वसंतरावांनीं किती त्रास दिला तो पाहिलास ना !"

" थोडा त्रास झाला खरा. भेटण्याचा प्रसंग वरचेवर चुका करण्यामुळें अनेक वेळा आणावा लागला, वसंतराव आज इतके कसे चुकले कळत नाहीं.

" अग कां चुकलें हें लोकांना कळत कां नाहीं पण काय करायचें ! काम पत्करलें आहे खरें तें पुरें करायलाच हवें."

" तुम्हांला वसंतरावांचा फार राग आला असेल नाहीं !"

" राग नाहीं आला, पण त्यांनीं असें करायचें नव्हतें."

" त्यांना सुद्धां नंतर वाईट वाटलें. ते आता तुमची गाठ घ्यायलाच येणार आहेत, मी चहालाच तिकडे येईन असें ते म्हणाले आहेत."

" हो कां, येऊं दे, बाकी त्यांचीं कामें आज फारच सुंदर झालीं नाहीं ! त्यांचें काम पाहून बाकीच्या मंडळीनींही कसून. कामें केलीं. त्यामुळें एकंदर कामाचा उठाव फार सुंदर झाला."

" वसंतराव याच्या अगदीं उलट मला मघाशीं म्हणत होते."

" काय म्हणत होते ?"

" ते म्हणाले कीं उषाताईनीं आजचें काम इतकें तन्मय होऊन केलें कीं तें काम पाहून मला उत्तम काम करायची स्फूर्ती आली. त्यांच्या कामानीं मला जवळ जवळ बेहोष केलें व त्याचमुळें भेटण्याच्या प्रसंगाच्या वेळीं मला भान न राहून माझ्या हातून चुका झाल्या."

" माझी भरमसाठ स्तुति करावयाची तुम्हां दोघांना संवयच लागलेली दिसते."

" नाहीं उषाताई, आम्ही खरें आहे तेंच बोलतो. बाकी वसंतरावांचें तुमच्यावर फारच प्रेम आहे."

" इश्श हें काय बोलतेस ! माझें लग्न झालें असून माझ्यावर प्रेम करणारे श्रीकांत किस्मतपुरांत आहेत हें तुला माहीत नाहीं कां !"

" अहो लोकांनीं तुमच्यावर प्रेम करणें ही कांहीं तुमच्या हातची गोष्ट नाहीं. तुम्ही मात्र त्यांच्यावर प्रेम करणें न करणें हा तुमच्या मनाचा प्रश्न आहे. बाकी ते परवा असेंही म्हणाले कीं उषाताई माझ्यावर उलट प्रेम करतात."

" पद्मा तुझ्या जिभेला कांहीं हाड आहे कां नाहीं ! तुझ्यासारखीला तरी हें असलं बोलणं शोभत नाहीं !"

" उषाताई, आज वेळ आली म्हणून बोलते पण सिनेमातले लोकहि मी म्हणाले अशाच तऱ्हेचे कांहीं तरी बोलत असतात."

" लोक आहेत गाढव. या लोकांना नसतां उद्योग लागतो. त्यांना स्त्रियांच्या अब्रूची काहीच किंमत दिसत नाहीं."

" लोकांना काय, तुम्ही त्यांच्याबरोबर हिंडता, हसतां खेळतां, ते तुमच्याकडे नेहमीं चहाला येतात, तुम्ही त्यांच्याकडे जाता, तेव्हां त्यांना आपलें असें वाटलें असेल. शिवाय नवऱ्यानें पत्र पाठवावयाचीं बंद केलीं आहेत म्हणून गावात बोभाटा आहेच."

" लोक काय उपद्व्यापी असतात पहा! आणि आमच्या पत्राची मानगड बाहेर कशी फुटली! कांहीं कारणामुळें त्यांना पत्रं पाठवितां आली नसतील, इतकें कळण्याइतकीसुद्धां यांना अक्कल नाहीं. बरें तूं जा चहाची तयारी ठेव ते आतां येतीलच."

पद्मा आंत निघाली इतक्यांत वसंतराव आलेच. त्यांना बसायला खुर्ची दिल्यावर ती म्हणाली " आज कनी माझं डोकें दुखत असल्यामुळें तुमच्याकरितां मी थांबले नाहीं."

" डोकेंच दुखत असलें तर मग हरकत नाहीं म्हटलें आणखी कांहीं कारण आहे कां काय! त्याकरतां तर मुद्दाम आलों."

" नाहीं तसें कांहीं नाहीं " आपण घडघडीत खोटें बोलतों आहोंत याची जाणीव उत्पन्न होऊन तिचें तिलाच चमत्कारिक वाटूं लागलें.

" मग आतां डोकें बरें आहे ना!"

" हो आतां उतरलें आहे "

" खरोखर आजच्या तुमच्या कामाचा आवेश नि तन्मयता पाहून तर मी थक्क झालों. अशी प्रणयाराधना तुम्ही केव्हां शिकलात ? "

" वसंतराव, मी लग्न झालेली स्त्री आहे हें विसरलांत वाटतें."

" तुमच्या बोलण्यांत, वागण्यांत कृत्रिमपणा बिलकूल दिसत नसल्यामुळें माझ्या किती वेळा मनात आलें कीं असें प्रेम करणारी स्त्री मिळाली तर काय बहार होईल."

" मग पद्मा आहे कीं तयार, ती असेंच प्रेम करून दाखवील. माझी

तरी ती आतां पुढें मुख्य नटी होणारच आहे. तेव्हां तिच्याशीं तह करून टाका म्हणजे झालं."

"कां तुमचा पुढें कामें करण्याचा विचार नाहीं वाटतें ?"

"आज तसें नक्की काहींच ठरवलं नाहीं."

"पद्मा, तुमच्या पासंगालाही पुरणार नाहीं. तुमच्या शिवाय यापुढं कामें न करण्याचा मी निश्चय केला आहे."

"माझ्याकरता तुम्ही आपली कला डाबून ठेवणें इष्ट नाहीं. माझ्या-पेक्षां सरस किती तरी नटी तुमच्याबरोबर काम करायला मिळतील."

"ती आशा व्यर्थ आहे. बरें तें असो. मी आतां आणखी एक निरोप सांगायला आलों आहे."

"कसला निरोप ?"

"आपला आतां फक्त एकच शेवटला सीन राहिला आहे, तो सुंदर व उठावदार होण्याकरतां व नंदनवनाचा सीन मिळविण्याकरतां काश्मीरला जायचें मालकांनी ठरविलें आहे."

"अगबाई, इतक्या लांब कशाला ! इकडे कां बागा नाहींत !"

"आहेत पण तशा तऱ्हेची वनश्री मिळणार नाहीं. बाकीची फिल्म फारच उत्तम साधल्यामुळें मालकांनीं या सीनकरतां तीन चार हजार रुपये खर्च करायचें ठरविलें आहे."

"कोण कोण जाणार ?"

"आपण दोघे, मालक व हाताखालील दोन तीन माणसें."

"पद्मा नाहीं का येणार ? "

"तिचें काय काम आहे ! उगीच कशाला खर्च !"

"पण मी एकटी कशी येऊं."

"किती भित्र्या आहांत हो, मी नाहीं कां बरोबर, शिवाय मालक आहेतच."

"नको बाई, मला एकटीला धीर होणार नाहीं. तुम्ही पद्माला नेण्याचा खर्च करणार नसला तर मी करीन पण ती आलीच पाहिजे. तिच्याशिवाय मी येणार नाहीं."

" या पद्माची लुडबुड हवी कशाला, अहो एक आठवड्याचा तर प्रश्न, आपण ताबडतोब परत येऊं."

" नको तिला घ्याच."

" बरें आहे. नाइलाज आहे. पण हें भित्रेपण आतां सोडून द्या."

" पण तें सोडणें मला जमेलसें दिसत नाहीं. पद्मा, आणलास चहा, शाबास, ठेव त्या टेबलावर, वसंतराव, पद्मा आहे म्हणून माझे दिवस आनंदानें चालले आहेत."

" पद्मा म्हणजे एक रत्न आहे ती लवकरच जगांत प्रसिद्ध नटी म्हणून चमकेल यांत शंका नाहीं."

पद्मा यावर कांहीं बोलली नाहीं मग तिनें याचे पूर्वीचें भाषण ऐकलें होतें कां काय कोणास ठाऊक !

चहापान झाल्याबरोबर निरोप घेऊन वसंतराव निघून गेला. पद्माही इतर उद्योगाला लागली. उषा मात्र स्वतःच्या परिस्थितीचें सिंहावलोकन करीत स्वस्थ पडली होती. वसंतरावानें केलेल्या अनुचित गोष्टीचा निषेध करण्याचें धैर्य तिला झालें नाहीं, याबद्दल तिला वाईट वाटत होतें, मग पद्मा म्हणते त्याप्रमाणें आपलेंहि त्यांच्यावर प्रेम आहे कां ! नाहीं नाहीं शिवार नाहीं. उषेनें आपलें डोकें घट्ट दाबून धरलें. प्रेम नसलें तरी क्वचित् प्रसंगी त्यांच्याबद्दल आपलें मन व्यथित होतें याची जाणीव होऊन तिचें हृदय धडधड करूं लागलें, डोकें सुन्न झालें. डोकें दाबून ती किती वेळ बसली असती कोणास ठाऊक पण कोणाची तरी चाहूल लागल्यामुळें तिनें वर पाहिलें.

तिचा भाऊ गुलाब तिच्यापुढें उभा होता.

" ताई, वसंतराव कशाला आतां इकडे आला होता ? "

" सिनेमाच्या कांहीं कामाकरतां आले होते का ! आणि तूं केव्हां आलास ? "

" मी आज दुपारींच आलों आहे, ताई या वसंतरावाचें तुझ्याकडे येणें मला मुळींच पसंत नाहीं."

" कां, त्यांच्यावर इतका राग कां ? "

" कां, तें मला सांगता येणार नाहीं. पण यापुढें तूं त्याच्याशी कामाशिवाय बोलतां उपयोगी नाहीं."

" अरे पण येवढें झालें तरी काय तें तर सांगशील."

" तें मग सांगतो, पहिल्या प्रथम हे सांग कीं, श्रीकांतांना पत्रं पाठवायची तूं कां बंद केलीस !"

" काय मी ! वाहवा अरे त्यांचेंच मला दोन महिन्यांत पत्र नाहीं. मी आपल्याकडून गेला महिनाभर पत्र पाठवीत होते पण त्यांचेच उत्तर नाहीं मग कंटाळून पत्र पाठविण्याचें मी थांबलें व शेवटीं विचार केला आतां एकदमच जाऊन भेटावें."

" अगदीं खोटी गोष्ट. मी आपल्या हातांनीं श्रीकांतांचीं पत्रें पोष्टांत टाकीत होतों."

" म्हणजे ! मग मला तीं कशी मिळालीं नाहीत ! आणि मी पाठविलेलीं पत्रें तरी मिळत होतीं कां !"

" गेल्या दोन महिन्यांत तुझें त्यांना एकही पत्र नाहीं. त्यांना त्याबद्दल अत्यंत वाईट वाटलें. रोज टपालची वाट पहायची नंतर तें आलें नाहीं कीं दुःखानें आपला उद्योग सुरू करायचा. धंद्यानिमित्त ते अलीकडे बाहेर गांवींसुद्धां जात नाहींत, हेतु हा कीं तुझें पत्र त्यांना मिळायला उशीर होऊं नये. शेवटी त्यांच्यानें रहावेना; म्हणून त्यांनी मला शोध करण्यास पाठविलें आहे. फिल्म पुरी झाल्याशिवाय तुला भेटणार नाहीं असा त्यांनी मनाचा निश्चय केला असल्यामुळें त्यांना स्वतःलाच इकडे येतां आलें नाहीं."

" गेले चार महिने ते किस्मतपुरलाच होते ?"

" हो. एक दिवसही बाहेरगांवीं गेले नाहींत.

" मी तर ऐकलें कीं ते सध्यां प्रमिला ताईकडेच आहेत म्हणून त्यांना पत्र पाठवायला सुद्धां सवड सांपडत नाहीं."

" ही साफ खोटी गोष्ट आहे. तुझ्या इकडे येण्यामुळें प्रमीलाताई रागावलेलीच असल्यामुळें ती किस्मतपुरास मुळींच आली नाहीं. तुझें पत्र न आल्याबद्दल तक्रार करून श्रीकांतांनी एक दिवस येऊन जाण्याबद्दल तिला लिहीलें होतें पण तिनें स्पष्ट कळविलें कीं उषाबाईला परत आण-

त्याशिवाय मी कांही येणार नाहीं, म्हणून तर त्यांनी शेवटीं मलाच इकडे पाठविलें."

"ते मुळींच प्रमिलाताईकडे गेले नाहींत तुझी खात्री आहे?"

"हो अगदीं पूर्ण खात्री आहे."

"पण मला तर वसंतरावांनी सांगितलें कीं ते मुळी किस्मतपुरला नाहींतच. ते प्रमिलाताईकडे असून आनंदांत आहेत."

"यांत त्याची लुच्चेगिरी स्पष्ट दिसते आहे आणि म्हणूनच म्हणतो कीं त्यांच्याशीं तूं संबंध ठेवूं नकोस."

"यांत समजुतीचा कांहीं तरी घोटाळा होतो आहे, वसंतराव खोटें कशाला सांगतील पद्माला हव तर विचार."

"ती पोरटी अजून तुझ्याजवळच आहे कां, मग झालें तर त्या दोघांनीं कारस्थान करून तुला खड्डयात आणण्याचा विचार केलेला दिसतो. सावध रहा!"

"गुलाब सशयावरून उगीच लोकांची निंदा काय करतोस! तुला तिनें झिडकारलें म्हणून तर सूड उगविण्याकरता तूं हें बोलत नाहींस?"

"तुझ्याशीं तिचा संबध नसता तर मी तिचें नांवसुद्धां काढलें नसतें. नांव काढताच स्नान करायला हवें इतकी अपवित्र मला ती वाटते. ज्या ताईच्या जीवावर मी लहानाचा मोठा झालो, जिचें अन्न खाऊन मी पोसलें आहे तें अन्न मला बजावीत आहे कीं तुझ्या ताईचें रक्षण कर ती धोक्यांत आहे."

"गुलाब तुला वेडबीड तर नाहींना लागले, तूं आज हें काय बडबडतो आहेस! मला कसली भीति! मी आता लहान मूल कां आहे. इथें जरा बैस, मन शांत कर आजची रात्र झोप घे आणि नतर काय तें सांग."

बहिणीच्या मनावर कांहीं परिणाम होत नाहीं हें पाहून गुलाबला वाईट वाटलें. तो खोलींत इकडे तिकडे पाहूं लागला. पूर्वीचा तिचा साधेपणा जाऊन फॅशनेबल जिनसांची तेथें रेलचेल होती. टेबलावरील श्रीकांतांचा फोटो त्याला दिसेना. भिंतीला टांगलेला वसंतरावाचा फोटो पाहून त्याचा

संताप पुन्हां अनावर झाला तो रागानें म्हणाला, " ताई श्रीकांताचा इथला फोटो कुठें आहे ? "

" तो इथून एकाएकीं नाहींसा झाला आहे. दुसरा फोटो पाठवा म्हणून मी दोन तीन पत्रें पाठविलीं पण उत्तर नाहीं मग काय करायचें ! "

" त्याचें पत्र नव्हतें तर स्वत: तुला त्यांच्याकडे जायला काय झालें होतें ! कां तुझा अभिमान आडवा आला ? "

" अरे त्याच्यापाशीं कसला अभिमान ! वसंतरावांच्याकडून मला वरचे-वर त्यांची हकीगत कळत होती, ते प्रमिलाताईकडे सुखांत आहेत असें कळल्यामुळें मलाही समाधान वाटत होतें."

" ताई यांत सर्व लबाडी आहे, कसलें तरी कारस्थान आहे. मी तुझी कशी खात्री करूं आणि हा वसंतरावाचा फोटो कां इथें लावलास ? "

बोलतां बोलतां त्यानें तो फोटो काढून बाहेर फेकून दिला. उषेला या कृत्याचा राग येऊन ती म्हणाली, " गुलाब, मी तुला असला अत्त्याचार करूं देणार नाहीं, तो माझा फोटो नाहीं पद्मानें तो तिला हवा म्हणून आणून लावला आहे."

" ही पद्मा येथून हलल्याशिवाय गाडी नीट रुळावर येणार नाहीं."

" माझें आतां सिनेमाचें काम संपलेंच आहे तेव्हा या सर्व घोटाळ्याचा खुलासा मी समक्ष किस्मतपुरला आल्यावर आपोआप होईलच.

" तूं तिकडे कधीं येणार ?"

" आणखी १०।१५ दिवसांनीं."

" इतका अवकाश कशाला ? "

" आमचा एक बागेंतला सीन राहिला आहे त्याकरतां आम्ही पर-गांवीं जाऊन तो घेणार आहोंत."

" कोणत्या गांवाला जाणार आहात ? "

याचवेळीं पद्मा जी बाहेर गेली होती ती घरीं आली, तिनें काय प्रकार झाला असेल हें तावडतोब ओळखलें व प्रसंगाला तोंड देण्याकरतां ती पुढें झाली, ती खोलींत येऊन म्हणाली, " गुलाब तुला नसत्या चवकशी करून काय करायचें आहे ? तुला इथें यायची बंदी केली असतांना तूं कां आलास !",

"तुझ्या खापर तोंडाला पहायला मी आलों नाहीं. माझ्या बहिणीला भेटायला मी आलों आहे व तिला घेतल्याशिवाय मी येथून हलणार नाहीं."

"गुलाब असा उगीच संताप करून कां घेतोस?"

"ताई संताप करूं नको तर काय करूं, या हडळीनें माझ्याशी लग्नाच्या आणाशपथासुद्धां घेतल्या होत्या. मला घरादागला अब्रूला मुकवून इथें आणलेस् आणि आतां त्या वसंतरावाच्या गळ्यांत मिठ्या मारते आहे."

"गुलाब, तोंड संभाळून बोल, मी असलें ऐकून घेणार नाहीं. मी आतांच वसंतरावांना बोलावणें पाठविते म्हणजे तू इथून कसा हलत नाहींस तें पहाते." पद्मा उसळून म्हणाली. गुलाबचें बोलणें तिचें पापी हृदय कापीत गेलें.

त्या दोघांना थांबवून उषा म्हणाली, "असें भांडूं नका. पद्मा तूं आपल्या कामाला जा. गुलाब तूंही जरा डोकें शांत करून ये मग आपण या बाबतींत बोलू."

"ही हडळ घरांत असतां मला स्वस्थपणा मिळणार नाहीं. मी आतां येथून जातो पण तुला घेतल्याशिवाय मात्र मी परत किस्मतपुरला जाणार नाहीं. श्रीकांतांनाही मी सर्व हकीगतीचें पत्र लिहून नंतर तुला घेऊनच येथून हलेन!"

"आपली धिडका बाहेर जाऊं द्या एकदाची. उषाताईंना नेण्याची गोष्ट आतां विसरा, वाटेल त्या थापा मारून आमच्याविषयीं त्यांचं मन तूं बिघडविण्याचा प्रयत्न करतो आहेस पण माझी खात्री आहे कीं तुला त्यांत यश येणार नाहीं. उषाताई इतक्या अविचारी खास नाहींत."

"पद्मा, गुलाब तुम्ही दोघे गप्प बसा बघूं. गुलाब तूं आतां जा, उद्यां सकाळीं ये; येथून कधीं निघायचें वगैरे मी तुला सर्व सांगेन तोपर्यंत वसंतरावाकडूनही पत्राबद्दलचा खुलासा मागविते."

"बरं आहे उद्यां सकाळीं मी येईन. पण या लोकांशीं जपून वाग येवढेंच मला तुला शेवटलें सांगणें आहे."

विषण्ण वदनानें गुलाब तेथून निघून गेला. तो गेल्यावर उषा म्हणाली.

" पद्मा वसंतरावाना मी बोलावलें आहे म्हणून सांग, फार जरूरीचें काम आहे पांच मिनिटांत मोकळे करतें असेंही सांग. "

" उषाताई, तुम्ही काय गुलाबच्या नादीं लागतां ! अहो, तो घरींसुद्धां गेला नसेल. त्याला घरीं जायला तोंड आहे कुठें ! इकडेच कुठें तरी भटकत असेल व शेवटीं सूडाची कल्पना मनांत येऊन आपल्याकडे तो आला आहे झालं. आमच्याविरुद्ध कांहींतरी कुभांड रचायला हवें म्हणून ही पत्रांची बनावट थाप मारली आहे. वसंतरावाना खोटें सांगून काय करायचें आहे आणि मला तर तुमच्यावांचून एक क्षणही करमत नाहीं हें तुम्ही पहातांच आहा. "

" तूं म्हणतेस तसेंसुद्धां असणें अगदींच अशक्य नाहीं तरी पण गुलाब माझ्याशीं कधींही प्रतारणा करणार नाहीं असें मला वाटतें. माझें मन अगदीं गोंधळून गेलें आहे, तेव्हां एकदां वसंतरावांना घेऊन येच. "

पद्मा वसंतरावाना आणायला गेली. बराच वेळ झाला तरी ती येईना इतक्यांत मालकांचा निरोप आला कीं एक तासाच्या आंत काश्मीरला जायला निघायचें आहे तेव्हां तयारी ठेवा. उद्यां निघायचें असतां आतां कां बेत बदलला हें उषेला कळेना; पण मालकांच्या आज्ञेप्रमाणें तिला तयारी करणें भाग होतें. जरा वेळानें पद्मा परत आली व म्हणाली कीं " वसंतराव मालकाकडे गेले असल्यामुळें मला ते येईपर्यंत बसावें लागलें. त्यांनीं मला निरोप सांगितला आहे कीं आतां जाण्याची घाई आहे, तेव्हां प्रवासांत आपली पूर्ण खात्री करून देईन. गुलाब बडबडतो आहे हें सर्व खोटें आहे. "

त्यांच्या उत्तराने उषेचें पूर्ण समाधान झालें नाहीं तरी पण खुलासा मिळेल या आशेनें आपलें मन घट्ट करून ती आवराआवरी करूं लागली.

बिचारा गुलाब ! दुसऱ्या दिवशीं सकाळीं वहिनीच्या दाराला कुलूप पाहून त्याला काय वाटलें असेल याची कल्पनाच केलेली बरी.

संध्याकाळचे पांच वाजायला आले तरी शालिनीचा पत्ता नव्हता किंवा रमेशनें मनुष्य पाठविला होता तोही परत आला नव्हता. साडेपांचच्या सुमाराला तो मनुष्य एकदाचा परत आला त्यानें निरोप आणला कीं " त्या होडीनेंच परस्पर बागेंत जाणार आहेत तरी तिकडे यावें आम्ही सहापर्यंत वाट पहातो."

ती येत नाहीं हें पाहून रमेशचें मन खट्टू झालें असताच ल्यूसी दारांत येऊन उभी राहिली. ती शक्य तितक्या सुंदर तऱ्हेनें नटली होती. तिच्या गौरवर्ण गालावर व ओठावर तिनें गुलाबी रंग लावल्यामुळें तिचा चेहरा निःसंशय सुंदर दिसत होता.

तिनें सर्व पोषाख गुलाबी केला होता व कानांत हिऱ्याचे डूल घातले होते व हालतांना त्यांचा प्रकाश गालावर पडल्यावर तिचा चेहरा जास्तच खुलून दिसत होता. ती आलेली पाहून त्यानें तिला बसवून घेतलें. ती खुर्चीवर बसतां बसता म्हणाली " तुमची बहीण आली का ? "

" नाहीं ती, तिचा नवरा व इतर स्नेही मंडळी बोटीनेंच बागेंत जाणार आहेत व मलाही तिनें तिकडेच बोलावलें आहे "

" मग कसें जायचें ! बोटीने कां टांग्याने."

" आपण टांग्यानेंच जाऊं, आता कुठें उगीच त्यांना शोधत बसा. "

" मग फारच उत्तम " असें म्हणताना एकटाच रमेश आहे हें पाहून तिला मनापासून आनंद झाला होता.

रमेश आपला ड्रेस करूं लागलेला पाहून ती त्याच्याजवळ गेली व तो नको म्हणत असतांच तिनें त्याच्या केसाला पोमेड लावून चांगला भांग काढला व तोंड धुतल्यावर त्याच्या इच्छेविरुद्ध तिनें त्याच्या तोंडाला रोझी ब्लॉसम लावला. थोडक्याकरतां तिचें मन दुखवायला नको म्हणून तो तिचा हट्ट हळुंहळूं पुरवूं लागला होता आणि त्याचा फायदा घेऊन तिनें आपल्या आवडीप्रमाणें त्याचा पोषाख चढविला.

हॉटेल मालकानें एक तांगा आणल्यावर ही दोघें त्यांत बसून निघाली. ल्यूसी आज विशेष आनंदात दिसत होती, त्यामुळें तिचा हास्यविनोद भरपूर चालला होता व रमेशही त्याला उत्तेजन देत होता. लवकरच ते हिंदुस्थानांतील नंदनवनाजवळ आले. त्या बागेची रचना शहाजहान बादशहानें आपल्या आवडीने केली असून तिचें नाव ' निशतबाग ' असें ठेवलें होतें. तांगा उभा रहातांच ल्यूसी आनदाने रमेशचा हात धरून खाली उतरली.

त्या बागेंत पाऊल टाकतांच आपण कांहींतरी अपूर्व पहातो आहोंत असा भास होऊ लागतो. तो हिरवागार प्रदेश पाहून मन अत्यंत उल्हासित झाल्याशिवाय रहात नाहीं. तो नैसर्गिक पाण्याचा झरा, त्यांतून तीं १००--१२५ कारंजें आकाशांत उडताना पाहून प्रत्येकाचें मन तन्मय होऊन जाई. विजेची व्यवस्था केली असल्यामुळें त्या विजेचा प्रकाश त्या कारंजांच्या फवाऱ्यावर पडतांच जादूचा हिरेमाणकांचा कारखानाच येथें काढला आहे का काय असा भास होत होता. तेथील देखावा निःसंशय अत्यंत रमणीय होता व विधात्याचें मुक्तकंठानें कौतुक केल्याशिवाय कोणीही रहात नसे.

आनदाचा व कौतुकाचा थोडा भर ओसरल्यावर ल्यूसी रमेशचा हात हातांत घेऊन म्हणाली. " अशा नंदनवनांत जोडप्यानें सहल करण्यांत किती तरी आनंद असतो असें नाहीं तुम्हाला वाटत ? "

" ल्यूसी आज तूं खरोखर फारच चित्ताकर्षक पोषाख केला असून बोलण्यांत तूं विशेष मोहकपणा आणते आहेस, आजची तुझी प्रत्येक कृति एकाद्याचें मन चलबिचल करणारी आहे त्यांतच या रमणीय देखाव्याची

भर पडून माझ्या मनावरचा ताबा उडेल असें मला वाटूं लागलें आहे. पुरें झालें आतां बाग पहाणें आपण आतां परत फिरूं या."

"जरा थांबाना, इतका रमणीय देखावा सोडून तुम्हांला जाववतें तरी कसें! हा पाहिलात कां निरनिराळ्या रंगाच्या गुलाबाचा ताटवा त्यांत तें मध्यावर असलेलें सुंदर फूल किती डौलानें आपल्याकडे बघतें आहे. थांबा हं मी तें फूल तोडून तुमच्या कोटाला अडकविते."

"ल्यूसी येथील फुलें तोडायला परवानगी नाहीं."

"फुलें कुणाला हवीत हें माळ्याला कळत कां नाहीं? तो इतका अरसिक खास नसेल आणि फुलाकरतां त्यानीं आडवलेंच तर आपण पैसे देऊन टाकूं म्हणजे झालें."

अत्यंत सुवासिक व सुंदर असें गुलाबाचें तें फूल तोडताना ल्यूसीला कोणी अडविलें नाहीं. पण तें घाईनें तोडतांना गुलाबाचा काटा तिच्य बोटांत शिरून त्यांतून रक्त वाहूं लागलें. तिचा दु:खद स्वर कानीं येतांच रमेश चटकन पुढें झाला व तिचें बोट दाबून धरून त्यानें तिचें रक्त वहा-ण्याचें बंद केलें. नंतर खिशांतला रुमाल काढून तिचें तें दुसरे बोट आव-ळून टाकलें. त्याची ही धांदल पाहून ल्यूसी आपलें दु:ख पार विसरून गेली व अनिमिष नेत्रांनीं ती त्याच्याकडे पहात राहिली.

बोट बांधल्यावर तिनें तें फूल हातांत घेतलें व ती तें त्याच्या कोटाला अडकवूं लागली. दोघांची दृष्टी एक झाली. रमेशला आपल्या हातून कांहीं तरी चूक होत आहे असें वाटून तो कावराबावरा झाला. ल्यूसीचीहि तीच स्थिती झाली. तिला तें फूल त्याच्या कोटाला अडकवितां आलें नाहीं तिची नजर त्याच्या चेहऱ्यावरून खाली कोटाकडे वळेना त्यामुळें तें फूल कोटांत न अडकतां खालीं पडलें. रमेशनें तें तात्काळ उचलून घेतलें. इतक्यांत पाठीमागून हास्यध्वनी त्याला ऐकूं आला त्याबरोबर त्यानें मागें वळून पाहिलें तों त्याला नको होतें तेंच पहाण्याचें त्याच्या नशिबीं आलें.

पंडीत बिंदुमाधवाची मीना आपल्या मैत्रिणीसह याच वेळीं बागेतून हिंडत होती. त्यांचा हास्यविनोद जोरांत चालला होता व त्यांचें या दोघांच्याकडे लक्षहि नव्हतें. पण एकाच वेळीं दोघांचेंहि एकमेकांकडे लक्ष

गेलें. ती एकदम दचकूनच उभी राहिली. ल्यूसीकडे एकदा तीव्र नजरेनें पाहून व भृकुटी वक्र करून ती आपल्या मैत्रिणीसह तेथून एकदम निघून गेली.

रमेशची पाण्यांतील ढेकळाप्रमाणें स्थिती झाली. तिचा कांहींतरी गैर-समज झाला आहे व तो दुरुस्त करायला हवा म्हणून त्याच्या मनानें घेतलें पण त्याचें तोंड उघडेना. त्याच्या पायांतील शक्तीच नाहींशी झाल्यासारखी त्याला वाटली.

ल्यूसीला या दोघांची ओळख आहे ही कल्पना नव्हती. रमेशची मनः स्थिती लक्षांत न येऊन ती विनोदानें म्हणाली, "रमेश ही कोणही मुलगी! आपल्याकडे तोऱ्यानें बघून गेली! आपल्यापेक्षां जास्त सौन्दर्यवान स्त्रिया जगांत असतात अशी तिची खात्री होऊन ती रागानें गेली असावी नाहीं?"

"कुणास ठाऊक!" रमेशनें कांहींतरी उत्तर दिलें. ल्यूसीचें कृत्रीम सौन्दर्य त्या मुलीच्या सहज सौन्दर्याच्या पासंगालाहि पुरणार नाहीं अशी रमेशची खात्री होती.

उशीर झाल्याचें निमित्त करून रमेश त्या बागेंतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करूं लागला तों दुसरें एक संकट त्याच्यापुढें दत्त म्हणून उभें राहिलें.

सहा वाजेपर्यंत रमेशची वाट पाहून शालिनी, आनंदराव व इतर ऑफिसर मंडळी बोटीने बागेकडे निघाली व तीं रमेश व ल्यूसी बागेंतून बाहेर पडण्याचे वेळीं नेमकीं तेथें हजर झालीं. रमेशला अत्यंत लाजल्या-सारखें झालें पण आतां कांहींतरी सांगून वेळ मारून नेणें प्राप्त होतें. तीं मंडळी जवळ येतांच तो हंसून म्हणाला, "शालिनी कमाल केलीस. ११ वाजता येते म्हणून म्हणालीस ती आली नाहींस, चारला येतें म्हणालीस तरी पत्ता नाहीं. माणसानें वाट तरी किती पहावी!"

"रमेश झालें खरें असें, पण ही कोण मुलगी बरोबर आणली आहेस! खूपच नटली आहे."

"तुझी ओळख करून घेण्याकरितां ती दोनदा हॉटेलांत आली.

होती. शेवटीं येथें कुशी गाठ पडल्यास पहावी म्हणून तिला येथें घेऊन आलो. आमच्या सर्कसमध्यें काम करणारी ही मुलगी आहे. कोहटला तूं कदाचित हिला पाहिलें असशील. सर्कस आतां येणारच आहे तेव्हां दोन दिवस ती आधीं इथे आली आहे."

रमेशबरोबर मोटारींत तिला पाहिली नसल्यामुळें त्याचें म्हणणें तिला खरें वाटलें. तिनें पुढें होऊन तिच्याशी हस्तांदोलन केलें. त्या चौघा ऑफि सरनीहि तिच्याशीं शेकहँड केला."

शालिनीचा चेहरा कांहीं आनंदी दिसत नव्हता त्यावरून रमेशनें ताडलें कीं तिला बराच त्रास झालेला आहे. तो आनंदरावांच्या जवळ गेल्याबरोबर त्याला दारूची बरीच घाण आली त्यामुळें रमेशला अत्यंत वाईट वाटलें. गरीब गाय या लांडग्याच्या हातांत सांपडली आहे. तिला कशी सोडवावी हेंच त्याला कळेना. आनंदरावाचा जरी राग आला होता तरी त्याच्याकडे हंसतमुखानें पहात तो म्हणाला, "मिस्टर आनंदराव, तुम्हा सर्वांना वाटेंत फार त्रास झाला त्याबद्दल फार वाईट वाटतें, रात्रीं कुठे झोपलांत ?"

"O Curse that driver and the Village hut" त्या ड्राय-व्हरला व रात्रीं जेथें झोपावें लागलें त्या झोंपडीला. शिव्या देत तो म्हणाला, "आमची मोटार एका तासानें दुरुस्त झाली पण त्यावेळीं अंधार लवकरच पडेल असें वाटूं लागलें; तेव्हां वाटेंतील एका खेडेगांवांत आल्यावर आम्ही तेथें मुक्काम केला, पण झोंपायला नवारीच्या खाटांशिवाय आमची कांहीं सोय झाली नाहीं. भिकार रोटी खावूनच आम्हाला ती रात्र काढावी लागली. सकाळीं लवकर उठून कूच केलें व दहा वाजतां येथें पोहोंचलों. तुमचें हॉटेल कांहीं आम्हाला पसंत नाहीं त्यामुळें आम्ही बोटीवरच रहायचें ठरविलें आहे पण शालिनीकरतां हॉटेलांत येणें मला प्राप्त आहे. ती बोटीवर यायला तयार नाहीं, अगदीं हेकेखोर आहे."

ल्यूसीला यांच्या भाषणाशी फारसें कर्तव्य नव्हतें त्यामुळें ती त्या तिघा ऑफिसरबरोबर गप्पा मारूं लागली. ते तिघे तिच्यामुळें चांगलेच घोड्यावर होते त्यांना गप्पा मारायला एक स्त्री मिळतांच खूष होऊन तिला घेऊन ते बागेंत हिंडू लागले.

" आनंदराव, बायकामनुष्य कोणी नसल्यामुळें तिला करमत नाहीं ती इकेलोर मुळींच नाहीं, बरें जाऊद्या ते. तुम्ही बाग पाहून या मी इथेंच बसतो.

" Alright शालिनी चल."

" माझें कनी फार डोकें दुखतें आहे. मी इथेंच बसतें. पुन्हां येऊं केव्हां तरी पहायला."

" रमेश पाहिलेंत असल्या नाजूक बायका आमच्यासारख्या शिपायाना काय उपयोगी ! आम्ही आतां इतक्यांत हिंडून आलोच. तिची जरा काळजी घ्या. तुमची गेस्ट, आमच्या मंडळींच्या बरोबर पळाली वाटतें. आज रात्रीं तिला ठेवून घ्या तर का."

तो दूर गेलेला पाहून शालिनी म्हणाली " रमेश मला एखादें वीष आणून दे म्हणजे सुटेन तरी या त्रासातून. यांची सुधारण्याची मला काहींच आशा दिसत नाहीं."

" शालिनी धीर धर उगाच मनाचा संताप करून घेऊं नकोस."

" जगण्यात काहीं स्वारस्य आहे असें मला आता वाटत नाहीं तूं वीष आणून दिलें नाहींस तर मी कड्यावरून उडी टाकीन. आतां काय, हें काम सोपें आहे; उडी टाकायला कडा कुठेंहि मिळेल."

" शालिनी शांत हो इतकी जीवाला कंटाळूं नकोस."

" आतां शांतपणा कुठपर्यंत ठेवायचा ! ते आज मला दारू घेण्याबद्दल-च आग्रह करीत होते. यानंतर त्यांची मजल आणखी पुढें कुठें जाणार आहे कुणास ठाऊक ! "

" परिस्थिती बिकट आहे खरी. मी कालच प्रमिलाताईला व श्रीकां-ताना इकडे येण्याबद्दल पत्र लिहीलें आहे, तेव्हा ते येईपर्यंत धीर धर मग काहीं तरी तोड काढूं."

" घरीं असतांना इतर लोकांची भीति वाटत नसे पण आतां इथें रानांत मी एकटी काय करणार ! खरें म्हटलें तर मी निघतच नव्हते पण त्यांचें मन फार दुखविण्याचीहि भीति वाटूं लागली पण आतां पस्तावांत पडलें आहे."

" हें पहा माझ्या मनांत एक कल्पना आली आहे. ही ल्यूसी आहे ना तिला मी सर्कसचा मुक्काम येथें येईपर्यंत ठेवून घेतो. तिची तुला सोबत चांगली होईल."

" सोबत झाली तर बरें आहे, नाहीं तर ही सर्व मंडळी तिच्या नादीं लागली तर नसती पंचाईत व्हायची! ही काय दारू घेणारीच असेल. तेव्हां नसती भानगड उपस्थित होऊ नये म्हणजे झालें."

" हो, ही गोष्टही विचार करण्यासारखीच आहे."

जरा वेळ विचार करून शालिनी म्हणाली " रमेश ठेवून घेच तिला. परिणामाला तिची ती जबाबदार आहे. माझ्याजवळ राहिल्यास ती सुरक्षित आहे बाहेर गेल्यास मी जबाबदार नाहीं."

" ठीक आहे तिला मी विचारून पहातो."

" तुमची सर्कस कधीं येणार ? "

" आणखी आठ दिवसांनीं येईल,"

" आणि प्रमिलाताई ? "

" तिच्या पत्रावर तें अवलंबून राहील. पण मला वाटतें ती पंधरा दिवसाच्या आंत खास येईल."

" त्या येईपर्यंत दिवस काढणें म्हणजे मोठें संकटच आहे, तूं मला तुझ्याबरोबर परत घेऊन कां जात नाहींस?"

" शालिनी अगदीं लहान मुलासारखाच तूं हा प्रश्न विचारतेस. तूं वाटेल त्याच्याबरोबर जायला आतां कांहीं स्वतंत्र नाहींस. आनंदरावांची परवानगी मिळाल्याशिवाय तुला कांहींएक करतां येणार नाहीं आणि ते परवानगी देतील असें वाटत नाहीं, तेव्हां तूं या नसत्या भानगडींत पडूं नकोस."

" सर्व बाजूनीं माझा कोंडमारा चालला आहे पण मी एकदा कोहटला परत गेल्यावर तुला कळून येईल कीं मी माझी मालक आहे. त्यांना सुधारण्याचा मी शक्यतो प्रयत्न करीन नाहींतर बाबानी शिकविलेल्या विद्येवर आपली उपजीविका करीन "

"हरहर, शालिनी काय ही आपत्ती तुझ्यावर आली आहे. पण एकंदर बोलण्याचालण्यावरून माझी कल्पना झाली आहे कीं आनंदराव स्वभावानें

चांगले आहेत. दुसऱ्याच्या नादानें ते व्यसनी बनून आपली अशी दुर्दशा करून घेत आहेत. शालिनी तुलाच त्यांचा स्वभाव बदलला पाहिजे. हें तुलाच एकटीला शक्य आहे."

" मी प्रयत्न करून पाहिला नाहीं असें कां तुला वाटतें. आता तुला म्हणून सांगते कीं त्याकरतां त्यांच्या हातचा मारसुद्धा मी खाल्ला आहे. तुझाच आग्रह असला तर आणखी एकदां प्रयत्न करून पाहीन बापडी."

" माझ्याकरतां पहाच, आणि दुर्दैवानें तुला सुख नाहीं लाभल्यास तुझा एक पाठिराखा भाऊ आहे हें लक्षांत ठेव."

" तुझ्या जीवावर तर मी हें साहस करणार आहे कारण माझी खात्री आहे कीं कोहट सोडल्यास बाबाचें घर मला बंद होईल. तूही आश्रय न दिल्यास माझ्या जिवाचें वाटेल ते करायला मी मोकळी आहेच."

" ईश्वर तितकी वेळ आणूं देईल असें वाटत नाहीं. शालिनी मला तूं अद्याप पुरें ओळखलेलें दिसत नाहीं"

" रमेश वेडा आहेस, अरे माझ्याशिवाय जगात तुला खरें खरें कोण ओळखणार आहे!"

" मग इतके कळत असून असें का बोलतेस?"

" अरे मनुष्य वैतागला म्हणजे त्याला सुमार रहात नाहीं."

" बरें तो विषय सध्यां जाऊं दे. तो पहा मंडळी परत आली आतां ल्यूसीच्या रहाण्याचें पाहिलें पाहिजे."

" हो तेवढें मात्र काम कर."

तीं मंडळी परत आल्यावर सर्वजण बोटीनें निघाले. ल्यूसी त्या चौघांत खूप मिसळून गेली होती. चैन करावी हेंच तिचें ध्येय असल्यामुळें तिला हवे असलेल्या लोकांचीच तिला संगत मिळाली.

बोटींतून उतरताच त्या लोकांनीं तिला बोटीवरच रहाण्याची विनंति केली. ती कदाचित् राहिलीही असती पण रमेशच्या संमतीशिवाय ती गोष्ट तिला शक्य वाटेना म्हणून दुसऱ्या दिवशीं येण्याचें आश्वासन देऊन ती या तिघांच्या बरोबर निघाली.

रमेशनें आपला बेत ल्यूसीला सांगितला; तिला तें हवेंच होतें. त्यामुळें

त्यानें त्या गोष्टीला चटकन् संमति दिली. शालिनीशिवाय कोठेंही बाहेर पडतां उपयोगी नाहीं ही अट त्यानें घातल्यामुळें ती थोडी नाखूष झाली पण एकंदर विचार करता त्याचा विचार तिला पसंत पडला.

आनंदरावांनींही या गोष्टीला आडकाठी केली नाहीं.

## "पूर्णेंदूची मुलाखत" १८

चारपाच दिवसांचे आतच सर्कस श्रीनगरला आणतो असें सांगून रमेश शालिनीचा व ल्यूसीचा निरोप घेऊन निघाला. पंडित बिंदुमाधवांच्या मुलीबद्दल, तिच्या झालेल्या गैरसमजाबद्दल शालिनीजवळ कांहींतरी बोलून ठेवावें असें त्याच्या फार मनांत होतें, पण ल्यूसी सारखी तिच्याजवळ होती म्हणून व त्याला बोलायचा धीर झाला नाहीं म्हणून त्या बाबतींत बोलण्याचें अजिबात राहून गेलें.

ल्यूसीच्या रहाण्यामुळें शालिनीचे दिवस सुखांत गेले. या चौकडीनेंही आपलें वर्तन जरा बदललें, तिनें आपल्याला चांगले म्हणावें म्हणून प्रत्येकजण जपून वागूं लागला. त्यांच्या एकच प्याहयांत तीही सामील होत असे, पण हा सर्व प्रकार शालिनीसमोर चालत असल्यामुळें सर्वजण बेतानें वागत असत. कोणत्याही कारणाकरतां कां होईना पण रमेश परत येईपर्यंत तिचे दिवस सुखांत व समाधानांत गेले. ल्यूसी चैनी असली तरी प्रेमळ व आनंदी होती, त्यामुळे शालिनीला ती हवीशी वाटूं लागली. तिनेंही रमेशबद्दलचें आपलें अंतःकरण उघडें करून सांगितलें. दोघीही समदुःखी आहेत हें जाणून त्यांच्यामध्यें आपलेपणा जास्त उत्पन्न झाला, असो.

ठरल्याप्रमाणें रशियन सर्कस श्रीनगरला आली व तिचे खेळ राजाश्रयाखालीं धूमधडाक्यानें सुरूं झाले. स्वतः राजेसाहेब एक वेळा, पंडित बिंदुमाधव दोनदा येऊन गेले पण ती मुलगी मात्र एकदांही आली नाहीं या-

बद्दल रमेशला राहून राहून फार वाईट वाटे. कांहींतरी निमित्तानें तो दोनदा बिंदुमाधवांच्या घरीं जाऊन आला पण त्याला ती मुलगी दृष्टीस पडली नाहीं.

कांहीं झालें तरी आज त्या मुलीची गांठ घ्यायचीच असा मनाशीं निश्चय करून तो तिकडे जाण्याची तयारी करूं लागला. इतक्यांत दोन पत्रें त्यांच्या हातात पडलीं. एक श्रीकांताचें व दुसरें प्रमिलेचें होतें. आज निघ-वांना शुभशकुन झाला असें त्याचें आपमतलबी मन त्याला सांगूं लागलें.

पत्रात दोघांच्याही येण्याची आनंदाची बातमी होती. श्रीकांत उद्या येणार असून प्रमिला परवां नक्की येणार म्हणून मजकूर होता. उषा येव्हांना परत गेली असेल अशीच रमेशची कल्पना होती व त्याप्रमाणे त्यानें तिला आणण्याबद्दल श्रीकांताना पत्रही लिहिलें होते, पण सध्यां मी एकटाच येत असून उषेबद्दलची माहिती समक्ष सांगेन असा त्यांच्या पत्रांतील मजकूर होता. प्रमिलेच्याही पत्रात उषेबद्दल कांहींच मजकूर नव्हता. आता समक्ष भेट झाल्यावर सर्व खुलासा होईल असें मनाचें समाधान करून व तीं पत्रें खिशांत घालून तो बाहेर पडला.

कामाच्या गर्दीमुळें दोनचार दिवसात त्याला शालिनीकडे जायला सांप-डलें नव्हते, त्यामुळें आधीं तिच्याकडे जाऊन मग बिंदुमाधवांच्याकडे जाण्याचें त्याने ठरविलें. ल्यूसी कामावर रुजू झाल्यामुळें आतां तिचें कसें काय चाललें आहे याबद्दलचीही माहिती त्याला मिळवावयाची होती.

शालिनी गॅलरींत उभी राहून करमणूक या दृष्टीनें रस्त्याकडे पहात होती. तिच्या चेहऱ्यावरून ती आनंदी दिसत नव्हती. रमेशला पहातांच तिला आनंद झाला ती सामोरी जाऊन त्याला आपल्या खोलींत घेऊन आली.

" रमेश, किती दिवसानीं तूं आज येतो आहेस! रोज जरूरीनें जाण्या-इतकें इथं कोणी आहे असें तुला वाटलें नाहीं कां ? "

" शालिनी रागावूं नकोस खरेंच मला इकडे यायला वेळ मिळाला नाहीं शिवाय कालपर्यंत ल्यूसी रजेवरच होती त्यामुळें तुला अगदींच एकटें वाटणार नाहीं अशी माझी खात्री होती. ल्यूसीचा स्वभाव तुला आवडला ना! भारी गोड पोरगी आहे. "

" कां बायको करायचा कां विचार आहे ? "

" तसें नव्हे ग, तिचा आपला तुला गुण सांगितला आणि मी म्हणतो एखाद्या स्त्रीबद्दल चांगले उद्गार काढले म्हणजे ते केवळ याच उद्देशानें आहेत असे थोडेंच म्हणतां येईल ! "

" नाहीं माझें कांहीं तसें म्हणणें नाहीं, पण म्हटलें आपलें सहज विचारून ठेवावें, तिची तर काय एका पायावर तयारी आहे. "

" तिची बिचारीची कींव येते, पण काय उपयोग ! "

" कां उपयोग कां नाहीं. दुसरीकडे कोठें लक्ष गेलें आहे वाटतें ? "

" बस्स्, तुला दुसरा उद्योगच नाहीं, माझ्या लग्नाची तुला येवढी घाई कसली लागली आहे ? "

" अरे तूं आतां लग्नायोग्य वर झाला आहेस, तेव्हां या वयांतच तुला योग्य सुस्वरूप अशा मुलीबरोबर तुझें लग्न लावून दिलेलें बरें. नाहींतर पट्दिशीं एखाद्या नटीच्या किंवा दुसऱ्या कुठल्या तरी अनोळखी मुलीच्या नादीं लागशील, आणि मग जन्मभर पस्तावा करीत बसशील. "

" म्हणजे मला अद्याप कांहींच कळत नाहीं असें तुझें म्हणणें. "

" हो नाहीं तर काय, एरव्ही पूर्णेंदुसारखी सुंदर मुलगी सोडून तूं त्या मीनाच्या नादीं लागला नसतास. "

" शालिनी ही काय भानगड आहे ! ही मीना कोण ! "

" म्हणजे आपण ज्या स्त्रीबद्दल आस्था बाळगतो त्या स्त्रीचें नांवसुद्धां माहीत नाहीं ! आश्चर्य आहे ! "

" हें पहा असली मोघम बोलणीं बंद कर आणि काय असेल तें नीट समजावून सांग. "

" त्या बिंदुमाधवांच्या घरीं तुला कोण भेटलें ? "

" अस्सें अस्सें, हो, तिचें नांव मीना आहे खरें, पण ही माहिती तुला कशी कळली ! बरीच पाताळयंत्री आहेस ! "

" यांत पाताळयंत्रीपणा कांहीं नाहीं, ती हकीगत तुला थोडक्यांत सांगते. काल ल्यूसी येथून गेली ना ? "

" बरें मग, ती कालच कामावर रुजू झाली. "

" ती गेल्यावर मला कांहीं केल्या करमेना म्हणून थोडा वेळ गॅलरींत उभी राहिलें, इतक्यांत मला कुणी तरी हाक मारल्याचा भास झाला. मी मागें वळून बघतें तों माझ्यापुढें एक काश्मीरी स्त्री उभी! मला मोठें आश्चर्य वाटलें, येथील एकाही स्त्रीची माझी ओळख नसताना या स्त्रीनें मला कसें ओळखलें याचें आश्चर्य वाटून मी तिच्याकडे निरखून पाहूं लागलें. माझी शंका लक्षांत घेऊन ती स्त्री इंग्रजींत म्हणाली, " शालिनी-ताई तुम्ही मला ओळखणे शक्य नाहीं, पण मी तुम्हाला ओळखते. मी तुम्हांला कोइटला पाहिलें आहे. या हॉटेलच्या खालून जात असता तुमच्या-कडे सहज माझे लक्ष गेलें. तुमची ओळख विसरणे मी शक्य नसल्यामुळें तुम्हाला पाहून मला फार आश्चर्य वाटलें व तुमच्याबद्दल माहिती विचा-रण्याकरतां मीही वर आले. "

" पण तुमचें नांव काय ! " मी तिला इंग्रजींत प्रश्न केला तिने काय उत्तर दिलें असेल अशी तुझी कल्पना आहे. "

" माझी कांहीही कल्पना नाहीं नाव चटकन् सांग पाहूं. "

" ती म्हणाली माझें नाव 'पूर्णेंदू'. "

" काय पूर्णेंदू ! आणि ती इथें आली आहे ! " रमेशने उत्सुकतेनें विचारलें, " ती एकटीच होती का तिचे वडील बरोबर होते, तिचा इथें किती दिवस मुक्काम आहे ! "

" अरे हो, जरा थांबशील कीं नाहीं इतका अधीर होऊं नकोस. मी सर्व कांहीं सांगते. तिने ते नांव उच्चारताच मला इतका कांहीं आनंद झाला म्हणून सांगूं कीं मी तिला जाऊन घट्ट मिठी मारली व आपल्या खोलींत तिला घेऊन जाऊन व तिचे दोन्ही हात हातात घेऊन म्हणाले, 'पूर्णेंदू तुमची भेट झाली किती किती आनंद झाला आहे म्हणून सांगू ! इतके दिवस तुम्ही कोठें होतां ! मी इतक्या मोकळेपणानें बोलतांना पाहून तिलाही मनापासून आनंद झाला. या अनपेक्षित स्वागतामुळें तिला गहिं-वरून आलें, ती आपला आवंढा गिळून म्हणाली, " शालिनीताई तुम्हीं किती चांगल्या आहांत. तुमचा मी फार मोठा अपराध केला आहे पण त्याबद्दल तुम्ही क्षमा कराल ना ! "

" माझा अपराध ! मी मोठ्या आश्चर्यानें विचारलें."

" हो तुमचाच अपराध मी केला आहे. मी चोरलेल्या रुमालावर तुमचेच नांव होतें."

" तिचें म्हणणें माझ्या चटूदिशीं लक्षांत आलें नाहीं. तेव्हां मी म्हणालें "तुम्ही चोरी केव्हां केली ?"

" ती हकीगत अशी आहे. त्या वीरश्रेष्ठ रमेशनीं माझी व बाबांची त्या दरवडेखोरांच्या हातून सुटका केल्यावर त्यांच्या उपकाराचे अत्यंत अल्प प्रमाणात का होईना पण उतराई व्हावें असे माझ्या मनानें घेतलें, पण कोणत्या स्वरूपांत उतराई व्हावे हें माझ्या लक्षांत येईना. मी नुकताच एक रेशमी रुमाल त्यात जिकचें काम भरून व माझें नाव घालून पुरा केला होता त्याची आठवण झाली. उघड दिल्यास ते कदाचित् घेणार नाहींत अशी भीति वाटून तो गुप्तपणें देण्याचे मी ठरविलें. व ते फराळ करीत आहेत अशी संधी साधून तो रुमाल त्याचे खिशात ठेवला व याच वेळीं अत्यंत अनुचित असा मला मोह उत्पन्न झाला. अशा वीर पुरुषाची आपल्याजवळही काहींतरी खूण असावी असा तो मोह होता. तो मोह अगदी अनावर झाला व काहीएक विचार न करता त्याच्या खिशांत असलेला दुसरा रुमाल मी काढून घेतला व घाईघाईने घरांत गेलें. त्या रुमालाला वंदन करून व तो मस्तकीं ठेवून मी रोज आपल्या कामाला लागते. बरेच दिवस तो रुमाल तुम्ही दिलात ही कल्पना नव्हती पण मीं कोल्हटला आले त्यावेळीं तुमचें नाव मला कळले व त्या रुमालावरही तेंच नाव आहे हें पाहून तुम्हीच तो दिला असला पाहिजे अशी माझी खात्री झाली म्हणून म्हणतें या चोरीबद्दल क्षमा करा व तो माझ्या जवळ ठेवण्याची परवानगी द्या."

" मग तूं काय म्हणालीस?" रमेश मध्येंच तिला विचारूं लागला.

" हें पहा, मध्येच बोलूं नकोस नाहींतर मी पुढें एकही अक्षर सांगणार नाहीं."

" बरें आतां एक अक्षरही बोलणार नाहीं."

" मग ठीक आहे" शांलिनी हसून म्हणाली. "मी त्यांना दुसरा रुमाल

दिला आहे तेव्हां हा तुमच्याजवळ ठेवण्यास हरकत नाहीं असें सांगतांच तिला मनापासून आनंद झाला आणि शेवटीं मी जेव्हां सांगितलें कीं, तुम्ही दिलेल्या देणगीबद्दल रमेश फार आभारी आहे, तेव्हां तर तिचा आनंद गगनांत मावेना. तिचे आनंदाश्रूनीं डोळे भरून आले, ती माझ्या पाया पडूं लागली पण त्याचें निवारण करून मी म्हटलें. हें पहा अशानें मला संकोच वाटेल. तुम्ही कांहीही मनात आणूं नका. तुम्ही इतका सुंदर रुमाल दिल्याबद्दल रमेशना स्वतः तुमचे आभार मानायचे आहेत. तेव्हां त्यांना मी बोलावून घेऊं का?"

मी वरील वाक्य म्हणतांच ती थोडीशी गोंधळून गेलेली दिसली. तिच्या मनाची चलबिचल झाली आहे हें स्पष्ट दिसत होतें. एक क्षण थांबून ती म्हणाली, "ते इथें आहेत हें मला ठाऊक आहे पण कांहीं कारणाकरतां त्यांची भेट होऊं नये असें वाटतें."

"कसले कारण" मी आश्चर्यानें विचारलें. तिनें या बाबतींत बरेच आढेवेढे घेतले पण शेवटीं म्हणाली कीं ते अलीकडे बरेच वेळा बिंदु-माधवाच्या घरीं जातांना दिसतात तेव्हां तेथील मुलगी मीना हिचें त्यांच्या बाबतींत काय मत आहे हें पाहिल्यावर मग जरूरी असल्यास मी भेटेन नाहींतर इथूनच माझें त्यांना शतशः प्रणाम सांगा."

या मीनाची बातमी मला नवीन होती व कसा चोर पकडला या आनंदांत तिच्याकडून त्या मुलीबद्दल सर्व माहिती विचारून घेतली व नीट शोध करून तुला काय ते २--४ दिवसांत कळवीन असें तिला आश्वासन दिलें. ती गांवाला जाणार असल्यामुळें तेथून परत आल्यावर ४-६ दिवसांच्या आंत जरूर भेटेन असें सांगून ती माझा निरोप घेऊन गेली.

"ती आतां कोणत्या गांवाला गेली आहे कां जाणार आहे?"

"आतां तुला त्या स्त्रीबद्दल चवकशी करून काय करायचे आहे."

"तिचे मला आभार मानायचे आहेत."

"आभार मानण्याच्या निमित्तानें तिचा चेहरा पहावयाचा आहे असें म्हणेनास! रमेश खरेंच सांगते तिच्यासारखा चेहरा हजारांत तर नाहींच नाहीं पण लाखांत तरी सांपडेल कां नाहीं याची शंका वाटते.

तुला आल्याबरोबर मी जे म्हणाले कीं तुझें लग्न करून दिलें पाहिजे तें याचकरता. नाहींतर कोणाच्या तरी नादीं लागून असले रत्न गमावशील !'

" शालिनी तूं मीनाला पाहिलें नाहींस म्हणून असें बोलते आहेस, तिच्यासारखी सुंदर व गुणवान मुलगी मी अजून पाहिली नाहीं."

" मी म्हणत होते ते हेंच, एकदा मनुष्य नादीं लागला कीं त्याला ती अप्सरा वाटूं लागते, सर्वगुणसंपन्न असते इतकेंच काय पण जगांतला कोणताही दुर्गुण तिच्या अंगी नसतो."

" शालिनी ही गोष्ट थट्टेवारी नेऊ नकोस, बर. पण या पूर्णेंदूच्या स्वरूपाची थोडीशी कल्पना दे पाहूं."

" अरे तिच्या स्वरूपाला नांवे ठेवण्याला जागाच नाहीं. ते चाफेकळी नाक, ते केतकी गोरेपण. ते काळेभोर पाणीदार डोळे."

" पुरें झाले वर्णन. काश्मिरांतील प्रत्येक स्त्रीला हेंच वर्णन लागू पडेल. या प्रांतांत वाईट नाकाची पिचपिच्या डोळ्याची किंवा काळी मुलगी तुम्हाला आढळायाचीच नाहीं. सर्व हिंदुस्थानांत सौंदर्यवती स्त्रियांचे प्रमाण सर्वांत जास्त इथेच आढळते. तेव्हां तुझ्या या वर्णनांत कांहीं अर्थ नाहीं. आतां तू स्वतः एकदां मीनाला पहा म्हणजे डावी कोणती व उजवी कोणती हें तुला कळेल."

" पण ते कसें शक्य आहे ?"

" त्या मुलीला सर्कसला येण्याला आज मी विनंति करणार आहे. ती बहुतेक नाकारणार नाहीं असें वाटते तूही ये मी तिच्या शेजारीच तुला नेऊन बसवतो म्हणजे बोलणे, चालणे, पहाणे सर्वच गोष्टी साधतील. मग ठरले तर."

" अरे थाब, तुझें तूंच ठरवूं नकोस. इतक्या वेळ आनंदांत असल्यामुळें एक वाईट गोष्ट सांगायची राहिलीच."

" कसली गोष्ट ?"

" आम्ही आज दुपारच्या मोटारनें पेहेलगावाला जाणार, ते मोटार सुद्धां ठरवून आले आहेत व आतां त्या त्रिकुटाकडे गेले आहेत, रमेश, गेला आठवडा किती आनंदांत गेला आणि आतां आठ दिवस कां होईनात

पण ते मला एकांतांत काढावे लागणार. ही बातमी मला काल कळली असती तर त्या पूर्णेंदूला तरी बरोबर घेतलो असती पण आतां काय उपयोग !"

" तरीच आज सकाळीं आल्याबरोबर तुझा चेहरा उतरलेला दिसत होता."

" दुःखी चेहरा आतां माझ्या जन्माचाच मागे लागला आहे. ती ल्यूसी होती तोपर्यंत सर्व ठीक चाललें होते पण कालपासून पुन्हां बिघडले आहे. तिला जाऊ कां दिली म्हणून माझ्यावर रागावून बसले अहेत. बाकी ती गेली हेंच बरें झालें. त्या तिघांचे लक्षण कांहीं मला ठीक दिसत नव्हतें."

" बरे ते असो मग पुढें काय ! तू इथे राहूं शकत नाहींस कां !"

" मी विचारून पाहिल पण त्यानीं साफ नाहीं म्हणून सांगितलें, मी आग्रह धरला तर नसत्या भानगडी उपस्थित व्हायच्या म्हणून देवावर हवाल ठेवून स्वस्थ बसले."

" काश्मिरसारख्या ठिकाणीं येऊन तुला आनंदांत रहाता येत नाहीं हें केवढे दुर्भाग्य ! मग तू आज दुपारीं जाणार तर !"

" हो. त्याला इलाज नाहीं."

काहीं आठवण होऊन रमेश म्हणाला. " तुला आनंदाची बातमी सांगायची राहिलीच."

" काय ती " शालिनीनें उत्सुकतेने विचारले.

" श्रीकांत दद्यां व प्रमिलाताई परवा इथे येणार आहेत."

" फारच आनंदाची बातमी तू सांगितलीस पण मी मात्र दुर्भागी, यावेळीं इथे नाहीं. ते दोघे आल्यावर दोन दिवस रजा काढून तुम्ही सर्वच पेहेलगावाला या म्हणजे त्यानाही देश पाहिल्यासारखा वाटेल व माझे-ही दिवस आनंदांत जातील."

" तुझी सूचना काहीं वाईट नाहीं. मी रजा काढून येतोच."

" अगदीं जरूर ये, मी सारखी वाट पहात बसतें."

" पण पूर्णेंदूची काय वाट ! ती तुझा शोध करीत इथें आली तर !"

" तो एक घोटाळाच झाला आहे."

" तिचा पत्ता विचारला असतास म्हणजे एखादें पत्र तरी पाठवायला सांपडलें असतें. धोरण नाहीं तें हेंच."

" तूं किती धोरणानें वागतोस हे दिसतेंच आहे, तूं मागें चांगल्या धोरणानें वागला असतास तर मी अशी असहाय्य स्थितींत कां पडले असते. पण जाऊं द्या तो विषय, आपल्या दोघात चूक जास्त कोणाची हा वाद उकरण्यांत अर्थ नाहीं. मी मात्र जन्माची नाडले हे खरें. पण मी यावेळीं मात्र धोरण चुकलें नाहीं. तिला तिचा पत्ता मी दोनतीन वेळेला विचारला पण ती म्हणाली कीं हे काश्मिरचे रस्ते तुमच्या लक्षात येणार नाहींत. जायच्या आधीं मीच एकदा येऊन जाईन म्हणजे झालें."

" त्यामुळे सर्व घोटाळा होउन बसला आहे. आता हॉटेलच्या मालकाला तुझा पत्ता देऊन ठेवु त्याचेंच हॉटेल पेहेलगावाला आहे, तिनें मालकाकडे चौकशी केल्यास तिला तुझा पत्ता बरोबर कळेल अशी व्यवस्था करतो."

" बरे आहे. आज सकाळपासून माझ्या पोटांत धस्स का होतें आहे कुणास ठाऊक, काहीतरी अनिष्ट बातमी कळणार का काय अशी भीति वाटतें."

" वेडी आहेस असल्या भलत्याच कल्पना मनांत आणूं नकोस. आनंदानें जा, आम्ही मागून येतोच. बरें मी जाऊं आतां !"

" थांब, चहा घेऊन जा हे आतां केव्हां येणार आहेत कुणास ठाऊक ! अजून सर्व बांधाबाधी करायची आहे."

" थांब, मीच तुझी सर्व तयारी करून देतो."

शालिनीच्या सामानाची बांधाबांध करून चहा घेतल्यावर रमेश तेथून निघाला. बराच उशीर झाल्यामुळे झपाझप पावलें टाकीत तो बिंदुमाधवाच्या बंगल्याकडे वळला. जेहलम नदीचा पहिला पूल ओलांडतांच, बोटहाऊस मधून कोणीतरी एक दक्षिणी स्त्री व तिच्या मागोमाग एक अपटूडेट फॅशनेबल गृहस्थ येत आहेत असे त्याच्या नजरेस आले, त्याबरोबर साहजिकच दक्षिणी स्त्री या प्रदेशात कोण आली आहे हें जाणण्याकरतां तो त्या बाजूला निरखून पाहूं लागला. ती स्त्री त्याच्या बाजूलाच येत होती. ती जवळ येतांच ओळख पटून त्याला अत्यंत आश्चर्य वाटलें. स्वतःच्या डोळ्यावर त्याचा विश्वास बसेना. त्याने पुन्हां एकदां निरखून पाहिलें व खात्री झाल्यावर तो तिच्या पुढे जाऊन म्हणाला "उषाताई"

उषा आपल्याच नादांत असल्यामुळे, रमेश अगदीं जवळ येऊन हांक मारीपर्यंत तिचें त्याच्याकडे लक्ष नव्हतें.

"कोण रमेश! " एकदम थबकून उभी राहून व त्याच्याकडे आश्चर्यचकित मुद्रेनें पहात ती म्हणाली, "तूं इकडे कोणीकडे ? तूं भेटल्यामुळें मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं."

"आमची सर्कस सध्यां श्रीनगरांत असल्यामुळें मी इथेंच आहे, तुला इकडे पाहून मात्र आनंदाच्या ऐवजीं आश्चर्य वाटूं लागलें आहे. तूं यावेळीं इकडे कशी! आणि तुझ्याबरोबर हे कोण गृहस्थ आहेत?"

"हे मिस्टर वसंतराव, आमच्या फिल्म कंपनींतील सुप्रसिद्ध नट आहेत, आणि वसंतराव हा आमच्या प्रमिलाताईंचा भाऊ रमेश."

दोघांनीं स्मित करून हस्तांदोलन केलें. एकमेकांनीं एकमेकांकडे निरखून पाहिलें. आपलें वसंतरावाबद्दल काय मत झालें आहे हें चेहऱ्यावर न दर्शवितां निर्विकार मनानें तो म्हणाला, "आपली नवी ओळख झाली फार आनंद झाला. या नवीन ओळखीप्रीत्यर्थ आतां चहा घेऊनच पुढें जा, मी कांहीं फार वेळ घेणार नाहीं."

"माफ करा, आम्ही चहा घेऊनच निघालो आहोत, आता वेळ नाहीं पुन्हां केव्हां तरी येऊं."

"पण आतां येवढ्या घाईनें निघालात कोठें! इथें कशाकरतां आलात हें तर सांगाल?"

"कांहीं 'सीन्स' घेण्याकरतां आमची कंपनी इथे आली आहे."

"काय सीन्सकरतां काश्मीर! खूपच कमी खर्चाची बाजू पाहिलीत! पण तें जाऊं द्या इकडे येऊन किती दिवस झाले?"

"झाले असतील आठ दहा दिवस."

"दहा दिवस! आणि उषाताई तूं मला आज भेटते आहेस!"

"तूं इथें असशील ही मला काय कल्पना! आणि शिवाय आम्ही आसपासच्या प्रांतात फिरत होतो."

"बाहेर कशाला फिरत होता?"

"आमच्या फिल्मला एक बागेचा सीन घ्यावयाचा आहे त्याकरतां योग्य जागा पहात होतो."

"बागेकरतां श्रीनगरच्या बाहेर भटकत होता! कमाल केलीत. त्यापेक्षां वनींत हिंडायला बाहेर प्रांतीं भटकत होतो असें म्हणानात, अहो या श्रीनगरांतल्या बागेइतक्या सुंदर बागा सबंध हिंदुस्थानांत नाहींत."

"रमेश बराच बोलायला शिकला आहेस. आम्ही चैन करायला कांहीं इथें आलों नाहीं. दुसऱ्याला लागणार नाहीं अशा तऱ्हेनें बोलण्याचा माणसानें नेहमीं प्रयत्न करावा."

" उषाताई माफ कर. तुला ते शब्द लागावेत असा कांहीं माझा उद्देश नव्हता. बरं पण जागा ठरली कां ?"

" हो, येथील " शालिमार " बागच शेवटीं आम्ही कायम केली आहे आणि तेथील व्यवस्था करण्याकरतांच आम्ही आतां तिकडे जात आहोत. आजचें एकदां काम संपलें कीं मी मोकळी झालें. आजच्या दिवस मी जरा गडबडींत आहे, तेव्हां जाऊं आतां ? "

" जरा थांब, मला तुला थोडं आणखी विचारायचं आहे. "

" मिस्टर रमेश " वसंतराव एकदम मध्येंच म्हणाला, " आम्हाला बिलकूल वेळ नाहीं आज दुपारीं शूटींग आहे. "

" अहो दोन मिनिटांनीं कांहीं उशीर होत नाहीं. "

' माफ करा, उषाताई चालू लागा आतां अगदीं बोलूं नका. "

" रमेशला वसंतरावाच्या वर्तनाचें फार नवल वाटलें व संतापही आला. उषा न बोलताच निघालेली पाहून त्याच्यानें रहावेना, तो ओरडून म्हणाला, " उषाताई उभी रहा "

उषेचें पुढे पाऊल टाकण्याचे धारिष्ट झालें नाहीं. ती उभी राहिलेली पाहून वसंतराव चिडून म्हणाला, "मिस्टर रमेश तुम्हाला कांहीं काळ वेळ कळतो आहे कां नाहीं. त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांना उगीच अडवूं नका, आम्हाला तिकडे जाऊन ताबडतोब परत आलें पाहिजे."

" तुम्हांला घाई असली तर तुम्हीच एकटे जा ना ! जागा वगैरे सर्व कांहीं ठरलें आहे मग तिची येण्याची आतां काय जरूरी आहे ! "

" मिस्टर, हा प्रश्न तुमचा नाहीं. आम्ही आपल्या मताप्रमाणें वागण्यास आम्ही स्वतंत्र आहोत. "

" मग तुमच्या स्वतंत्र मताप्रमाणें तुम्ही जा कीं, उषाताई येत नाहीं. ती जात असतां तिला हक्कानें उभी करण्याचा अधिकार मला आहे हें तुम्हाला अद्याप माहीत नसल्यास आता तरी लक्षात ठेवा. यावेळीं तुमच्या-बरोबर उषाताईला पाठवायला माझी तयारी नाहीं. तुम्ही एकटेच जाऊन काय ते ठरवून या तोंपर्यंत ती आमच्या सर्कसच्या तंबूत राहील अगर हवें असल्यास बोटहाऊसवर तिला पोहोचती करीन. "

" असली अरेरावीची भाषा कोणाजवळ बोलता. उषाताईंना माझ्याबरोबर आलेच पाहिजे त्या आमच्या कंपनीच्या नोकर आहेत स्वतंत्र नाहींत हें विसरूं नका."

" कंपनीची नोकर असली तरी तुमची नाहीं. ती येणार नाहीं काय करायचें असेल तें करून घ्या उषाताई चल माझ्याबरोबर."

प्रकरण भलत्याच थराला लागलेलें पाहून उषा मध्ये पडली ती रमेशला म्हणाली " रमेश असं काय करतोस ! तूंच चलेनास माझ्याबरोबर मला तुला कितीतरी गोष्टी विचारायच्या आहेत आजचं काम संपले कीं मी मग मोकळीच आहे."

" पण तुझी तिकडे जाण्याची काय जरूरी आहे हेंच मला कळत नाहीं. कंपनीचे मालक काय घरीं माशा मारीत बसले आहेत. सिनेमा शूटींग घेतांना त्याची व्यवस्था कोण करतो हें मी स्वतः पुष्कळ वेळेला पाहिलें आहे. नटनटींना तिकडे जाण्याची कधीच जरूरी नसते त्यांना असलीं कामें करण्यास सांगणें हा त्यांचा अपमान आहे."

" अरे, सध्या वसंतराव एकटेच इथली सर्व व्यवस्था पहात आहेत हो, त्यांच्या कामांत उगीच अडथळा करूं नकोस."

" मग त्यांना हवें असलें तर जाऊं दे तूं कशाला बरोबर हवीस. ! "

" उगीच वाद वाढवूं नकोस, त्यांची इच्छा आहे म्हणून मी बरोबर चालले आहे आज संध्याकाळीं सर्कशींत येऊन मी तुला भेटते."

" माझ्या इच्छेपेक्षां त्यांची इच्छा तुला ज्यास्त वाटली काय ! नाइलाज आहे नाहींतर असल्या लोकांची घमेंड उतरविण्याला फार वेळ लागला नसता."

" रमेश उगीच कांहींतरी बोलून वाद वाढवूं नकोस, तूं येणार कां आमच्याबरोबर खरंच चल."

" नाहीं ताई, असल्या मनस्थितींत मला येतां येणार नाहीं तुझ्या मनाच्या कमकुवतपणाबद्दल मात्र मला फार वाईट वाटत आहे."

" तुमच्या मताची इथें कोण पर्वा करतो, उषाताई चला असल्या लोकाशीं बोलण्यास आपल्याला वेळ नाहीं."

" उषाताई एक मिनिट थांब. श्रीकांत उद्यां इथें येणार आहेत हें तुला माहीत आहे कां ! "

" काय ते येणार आहे ! इथें येणार आहेत ! किती आनंदाची बातमी रमेश तूं मला सांगितलीस केव्हां येणार आहेत ते ? "

" बहुतेक उद्यां येतील. तूं इथें आहेस हें त्यांना माहीत नाहीं वाटतें ? "

" त्यांना कसें माहीत असणार ! आज दोन महिने ते मुळीं पत्रच पाठवीत नाहींत त्यामुळें मीही अलीकडे त्यांना पत्रें पाठविलीं नाहींत. उद्यां किती वाजतां येतील ? "

" कुणास ठाऊक ! " उषेच्या एकंदर वर्तनानें दुःखित होऊन त्यानें कांहींतरी उत्तर केलें.

" रमेश माझें एक काम करशील कां ! "

" कसलें ? " तिच्याकडे न पहातांच रमेशनें प्रश्न केला.

" हें बघ तें उद्यां इथें आल्याबरोबर त्यांना माझ्याकडे घेऊन ये नाहींतर मला कळवायला ये म्हणजे मी येईन. त्यांच्याकडून मला कितीतरी गोष्टींचा खुलासा हवा आहे. "

" तुला कसला खुलासा हवा. ? "

" त्याची वाच्यता आज नको उद्याच सांगेन "

" पण तूं संध्याकाळीं येणार ना ? "

" शूटिंगचें काम संपल्याबरोबर संध्याकाळीं येईन नाहींतर रात्रीं सर्कसला खास येईन. "

" बरें आहे मी वाट पहातो."

" रमेश मी जाते. आता काय वादविवाद झाला तो मनावर घेऊं नकोस सर्व विसरून जा, उगीच डोक्यांत राख घालूं नकोस. "

सबंध आयुष्यांत त्याच्या मनाला इतका जोराचा धक्का कधींच बसला नव्हता. ते दिसेनासे होईपर्यंत तो त्यांच्याकडे पहात होता. त्याचें डोकें सुंद झालें. किती वेळ तरी त्या पुलाच्या कठड्याला डोकें टेकून तो उभा होता. नदीचा गार वारा डोक्याला लागल्यावर त्याचें डोकें थोडेसें शांत झालें. सिनेमामुळें माणसाच्या स्वभावांत इतकी क्रांती होते कां ! उषेला

संतरावांच्या तंत्रानें वागण्याची इच्छा कां व्हावी हेंच त्याला कळेना ! दोन हिन्यांत पत्रव्यवहार नाहीं ! केवढी शरमेची गोष्ट आहे. ते तिकडे ाळजीत असतां हिने चैनींत भटकावें, जरूर नसतां नटाबरोबर हिंडावें कती उद्वेगजनक गोष्ट आहे ! याला कारण ! याला कारण रमेशला ापडेना, उद्यां श्रीकांतच याचा उलगडा करतील, तेव्हां डोक्याला उगीचच ीण देण्यांत अर्थ नाहीं असें जाणून तो जड अंतःकरणाने तेथून निघाला.

बिंदुमाधव यांच्या घरीं जाण्याची त्याला आतां इच्छाच उरली नव्हती हणून तो सर्कसच्या तंबूकडे परतला. सकाळीं स्नान केलें होतें तरी त्यानें व्हां एकदा स्नान केले तरी पण त्याला स्वस्थपणा वाटेना. अशा तऱ्हेनें ायकांचे विचार बदलूं लागले तर त्यांनीं सिनेमांत जाणे किती धोक्याचें ाहे याचा तो विचार करूं लागला. कलेकरतां म्हणून एखादी सुविद्य ी सिनेमांत गेली व तिच्याबरोबर काम करणारा नट, मालक किंवा इतर डळी स्वभावाची उत्तम व :निर्व्यसनी असली तर ठीक, नाहींतर सर्व ंसाराचें वाटोळें होण्यास मुळींच वेळ लागणार नाहीं असें त्याला वाटूं ागेल. उषेचें प्रकरण कोणत्या थराला गेलें आहे याची त्याला कल्पनाच ाईना यामुळें त्याच्या मनाला अतिशय यातना झाल्या.

जेवण करून तो पडून राहिला तरी त्याला बरें वाटेना. मन दुसरीकडे ुतविल्याशिवाय त्याला विश्रांति मिळणार नाहीं असा शेवटीं विचार करून ो पोषाक करून बाहेर पडला. "

शालिनीकडे पहिल्या प्रथम तो वळला. पण ती मंडळी नुकतीच गेल्याचे कळलें तेव्हां आतां कुठें जावें याचा तो विचार करूं लागला. पंडीत बिंदु-ाधवाच्याकडे जावें असें शेवटीं ठरवून तो त्या बाजूला वळला.

" पंडितजी घरीं असतील अशी त्याची अपेक्षा नव्हतीच, तरीपण तो देवाणखान्यांत कोणाची तरी येण्याची वाट पहात बसला. "

थोड्या वेळानें पंडितांचा धाकटा मुलगा बाहेर येऊन मोडक्या तोडक्या इंग्रजी भाषेंत म्हणाला कीं, " बाबा घरीं नाहींत; संध्याकाळीं या म्हणजे भेटतील. "

हें उत्तर तो त्या घरांत यायच्या आंतच त्याला माहीत होतें, या उत्तराकरतां तो आलाच नव्हता, त्याला त्या मुलीचा, त्यूसीबद्दल झालेला गैरसमज दूर करायचा होता व त्याकरतां तीच यावेळीं बोलण्याकरतां यावी अशी त्याची मनापासून इच्छा होती. ती मुलगी बाहेर येण्याला काय युक्ति करावी हे त्याला सुचेना, ज्यास्त वेळ थांबण्याची सोय नव्हती. तेव्हां नाइलाजानें तो उठून उभा राहिला पण चटकन् एक कल्पना येऊन त्यानें त्या मुलाला उद्देशून भराभर चार पांच इंग्रजी वाक्यें उच्चारलीं, तीं अर्थातच त्या मुलाला कळणें शक्य नव्हतें. तो मुलगा गोंधळांत पडला आहे असें पाहून रमेश हळूच सोप्या इंग्रजी भाषेंत त्याला म्हणाला कीं, " तुझ्या बहिणीला बोलावून आण म्हणजे एक निरोप सांगतो. "

त्या मुलानें ती गोष्ट तात्काळ मान्य केली व तो घरांत गेला. बराच वेळ कोणीच आले नाहीं पण शेवटीं एकदाची त्यांची इच्छित वस्तु दिसली. त्याबरोबर डोक्यावरची हॅट काढून त्यानें तिला अभिवादन केलें.

त्याच्याकडे न बघतांच ती त्याला इंग्रजींत म्हणाली, " आपला काय निरोप आहे ! "

" निरोप येवढाच आहे कीं " रमेश अडखळत म्हणाला, " आमची सर्कस आतां लवकरच येथून हलणार आहे. तेव्हां या पुढील खेळ अत्यंत निवडक असे होणार आहेत तरी आपण स्वतः येऊन त्या खेळाचें चीज करावें अशी विनंती आहे आपण वाटल्यास थोडा वेळ येऊन जा. "

" माझी तब्येत अलीकडे बरी नसल्यामुळें मला जागरण सोसणार नाहीं म्हणून मला येता येणार नाहीं ! "

तिची ही सबब म्हणजे निव्वळ थाप आहे, अशी रमेशची खात्री होती म्हणून तो म्हणाला, " आपल्याला मी फार वेळ बसण्याचा आग्रह करीत नाहीं. एक तास निदान अर्धा तास तरी येऊन जा. "

" पण माझा येण्याचा एवढा आग्रह कां ! बाबासाहेब आले होते, मुलेही आलीं होतीं, मग झालें तर. "

" तुम्ही स्वतः न आल्यास माझ्याबद्दल तुमच्या मनात कांहींतरी अढी आहे असें मी समजेन. आता स्पष्ट बोलतो याची माफी असावी. आपण

त्या दिवशीं बागेंत पाहिलेल्या प्रकारामुळें तुमचा कांहींतरी गैरसमज झालेला दिसतो असें मला वाटतें."

ती कांहींतरी बोलणार होती पण तिला थांबवून रमेश पुढें म्हणाला, "ती मुलगी आमच्या सर्कशींत काम करणारी असून ती येथील युरोपियन हॉटेलांत उतरली होती. तिला ती बाग पहायची होती म्हणून व तिनें फार आग्रह केल्यावरून मी तिच्याबरोबर गेलो होतो इतकेंच, यापेक्षां बागेंत जाण्यांत माझा दुसरा कसलाही हेतु नव्हता."

मीनानें एक वेळ त्याच्याकडे तीव्र नजरेनें पाहिलें. त्याच्या बोलण्यांत कांहींतरी तथ्य असावें असें त्याच्या डोळ्यावरून तिला वाटलें. पण आपण केवळ याच गोष्टीकरतां येत नाहीं हे कबूल करण्याची तिची इच्छा नव्हती म्हणून ती म्हणाली, "मला तुमच्या हकीगतीशी कांहींएक कर्तव्य नाहीं पण तुम्ही आतां इतका आग्रह करतांच आहांत तर जमल्यास थोडा वेळ सर्कसला येऊन जाईन."

"आनंद झाला" रमेशनें हास्यवदनानें उत्तर केलें, "येतो मी आतां, आपली मी आज जरूर वाट पहाणार आहे."

मीना कांहींच उत्तर न देतां घरांत निघून गेली.

बऱ्याच उल्हासित वृत्तीनें तो मुक्कामाच्या जागीं परतला. पण तंबूजवळ येईपर्यंत उषेची आठवण होऊन त्याचा आनंद बराच मावळला.

संध्याकाळीं सात वाजले तरी कबूल केल्याप्रमाणें उषा आली नाहीं. रात्रीचे आठ वाजले तेव्हां एका नोकराला चिठ्ठी देऊन त्यानें ती बोटहाऊस-वर उषेला देण्यास सांगितलें. बरोबर ९ वाजतां सर्कस सुरू होई. रमेश उषेची व मीनाची मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात दारावर उभा होता. त्यानें उषाला चिठ्ठी लिहिली होती कीं, "कबूल केल्याप्रमाणें तू संध्याकाळीं आली नाहींस तरी आज रात्रीं न चुकतां सर्कसला यावें मी वाट पहात आहे."

दोन घंटा झाल्या तरी दोघींचा पत्ता नाहीं. बाहेर वाजवीत बसलेला बँड आंत जाऊन आतां लवकरच सर्कस सुरू होईल म्हणून वर्दी देऊं लागला. लोकही उत्सुकतेनें वाघ सिंहाचीं कामें पहाण्यास तयार झाले.

तिसरी घंटा होऊन काम सुरू झाले तरी त्या दोघींपैकीं कोणाचाही पत्ता नव्हता. पहिल्या कामानंतर त्याचेंच काम असल्यामुळें नाइलाजानें त्याला आंत जावे लागलें.

खेळाचा पोषाख करीत असतांच नोकरानें निरोप आणला कीं, उषाताई अद्याप बाहेरून परत आल्याच नाहींत. इतकी रात्र झाली तरी अद्याप उषाताई घरीं परत येत नाहीं याचा अर्थ काय! याबद्दल तो मनाशीं विचार करूं लागला. त्याच्या डोळ्यापुढें सकाळचा त्याचा वसंतरावाशीं झालेला संवाद दिसूं लागला. सर्कसचें काम करायचें आहे हें तो अजिबात विसरला; पण चाबकाचा मोठा आवाज ऐकून तो एकदम भानावर आला. त्याचा उत्साह पार मावळला, आज आपण काम करूच नये व उषेची प्रत्यक्ष स्थिति काय आहे तें पहावें असें त्याच्या मनानें घेतलें.

पुढचे काम करण्याबद्दलची सूचना देण्यास नोकर आल्यामुळें ते विचार त्याला थांबवावे लागले. कर्तव्य म्हणून झटकन् पोषाख करून तो रिंगमध्यें गेला.

टाळ्यांच्या कडकडाटांत रमेशनें आपलीं कामें सुरू केलीं. प्रत्येक कामाचे वेळीं त्याला टाळ्या पडत, त्यामुळें घटकाभर तो आपले दुःख विसरला. जमिनीवर अधांतरी उड्या मारीत असतां भराभर उड्या मारण्यांत एक उडी जवळ जवळ रिंगच्या बाहेर गेली. तेथील तारेला धरून तो मागें फिरत असता त्याला समोर मीना दिसली. त्यामुळें त्याला फार समाधान वाटलें पण त्याच वेळीं उषेची आठवण होऊन त्याचे मन बावरलें. त्याच्या मनाचे अशा तऱ्हेचे अंदोलन चालले असतांच त्याला घोड्यावरचें काम करण्याचा प्रसंग आला. घोडा रिंगमध्यें येऊन एक फेरी घालीपर्यंत तो स्वस्थ उभा होता पण तेवढ्या वेळांत त्याच्या मनाची अस्वस्थता इतकी वाढली कीं, आपल्याला कोणतें काम करायचें आहे हेंही तो विसरला. घोडा भरधाव चालूं असतां त्यानें त्यावर उडी मारली पण ती चुकली व तो झोक जाऊन रिंगच्या बाहेर पडला.

त्याच्या दुर्दैवानें तो पडला तेथें दोर बांधण्याचा मोठा खिळा ठोकलेला

होता. त्याला टाळतां न आल्यामुळें त्यावर डोकें आपटून व त्यामुळें मोठी खोंक पडून तो तेथल्या तेथेंच बेशुद्ध होऊन पडला.

ही सर्व गोष्ट एका क्षणांत झाली. रमेश मीनाच्या पुढच्या बाजूला पडला होता. डोक्यांतून रक्ताचा पाट सुरू होता तो तिनें झटकन् पुढें होऊन आपल्या रुमालानें थांबवून धरला.

जिकडे तिकडे धांवपळ सुरू झाली. मीना घाबरली, सर्कसचा मालकही घाबरला. सर्व लोक उठून गडबड करूं लागले. पण प्रसंगावधान साधून मीनानें शिपायाकरवीं रमेशला उचलून आपल्या मोटारींत घातले व मोटार भरधांव सोडली.

मालकाचें मन द्विधा झालें पण योग्य माणसाच्या ताब्यांत रमेश आहे अशी खात्री वाटून तो त्या मोटारीबरोबर गेला नाहीं. लोकांची स्थिरस्थावर करून त्यानें सर्कस पुढें चालूं केली व आपण टांगा करून बिंदुमाधवांच्या बंगल्यावर निघाला.

## "अपघात नं. २" २०

ठरल्याप्रमाणें शालिमार बागेंत शूटींगचें काम उत्तम तऱ्हेनें पार पडले. हीरो व त्याची प्रेयसी यांचें मीलन झाल्यानंतरचा तो सीन होता.

त्याच्या हातून निसटून ती बागेंत पळाली होती व तिला हुडकून काढण्याकरता तिचा प्रियकर इकडे तिकडे फिरत होता. प्रियकरणीच्या वेषांतील उषेचें तें अल्लडपणाचें काम निःसंशय फारच सुंदर झालें; तिचा तो मोहक चेहरा, सुमधुर हास्य व आनंदाच्या उर्मीमुळे तिचे पाणीदार डोळे विलक्षण आकर्षक झाले होते. बराच वेळ लपंडाव झाल्यावर ती एकदाची तिच्या प्रियकराला दिसली त्याबरोबर तिनें दाखविलेली धांवपळ अत्यंत कौतुकास्पद होती.

शेवटीं प्रियकरानें तिला पकडून आपल्या बाहूपाशांत घेतले व ती तोंड चुकवीत असतां व तो तिचें चुंबन घेण्याचा प्रयत्न करीत असताच तो सीन संपला गेला.

इंग्रजी सिनेमाप्रमाणें चुंबन संपल्यानंतरच तो सीन संपवावयाला हवा होता पण उषेनें त्या गोष्टीला संम्मती न दिल्यामुळें अशा अर्धवट स्थितींतच तो खेळ संपवावा लागला.

शूटींग संपल्यावर उषेला हायसें झालें, एखाद्या मोठ्या जबाबदारींतून उत्तम तऱ्हेनें पार पडल्यानंतर माणसाला जसा अगदीं मनापासून आनंद होतो त्याचप्रमाणें आज उषेची स्थिती झाली होती. मालक, वसंतराव,

पद्मा व इतर मंडळींनीं तिच्या कामाचें अभिनंदन करून स्तुतिसागरांत तिला अगदीं बुडवून टाकली. उषेनेंही हंसतमुखानें सर्वांचें आभार मानले.

बागेंतील आवराआवर होईपर्यंत संध्याकाळ झाली. मोटार लॉरीतून सर्व सामान पुढें पाठविण्यांत आलें, मालक व इतर मंडळींही त्या लॉरीबरोबर पुढें गेलीं. वसंतराव, उषा व पद्मा यांच्याकरतां एक टूरिंगकार मागें ठेवण्यांत आली होती.

बागेंत एकदां शेवटची सहल करून आल्यावर ते तिघे मोटारींत बसले. एकदम कांहीं आठवण होऊन उषा म्हणाली, " अगबाई, मी रमेशला येईन म्हणून सांगितले होते तें अगदींच विसरून गेले होते कीं, वसंतराव मोटार आतां एकदम सर्कसच्या तंबूजवळ घेऊन जाण्यास सांगा. "

" उषाताई, रमेशला भेटण्याला इतक्या कां अधिर होता ? आपल्याला आतां गांवांत जायचेच आहे, त्याला खरोखर गरज असली तर तो येईल तुमचा शोध करीत."

" वसंतराव, तुम्हाला रमेश किंवा प्रमिलाताई यांची इतकी माहिती नाहीं म्हणून तुम्ही असें बोलतां. ती सर्व मंडळी माझ्याकरतां जीव टाकणारी आहेत आतां संध्याकाळीं त्यांच्याकडे मी न गेल्यास तो स्वतः किंवा कोणीतरी मनुष्य शोधाला येईल कां नाहीं तें पहा."

" फुकटच्या अघळपघळ गप्पा मारायला त्याचं काय वेचतें आहे ! बरं तें जाऊं द्या आपण अद्याप शंकराचार्यांची टेकडी पाहिली नाहीं तिकडे जाण्याचा मी बेत केला आहे."

" शंकराचार्यांच्या टेकडीवर " उषेनें आश्चर्यानें विचारलें " आणि तें इतक्या उशीरा ! आतां काळोख पडूं लागला आहे तेव्हां आपण दिवसा उजेडीच केव्हांतरी जाऊं."

" आतां तुम्ही कसच्या हातीं लागता ! उद्यां श्रीकांत आल्यावर तुमची भेटसुद्धां होणं मुष्कील होईल."

" उगीच वाटेल तें म्हणण्यांत काय अर्थ आहे. त्यांना घेऊनच आपण उद्यां जाऊं म्हणजे झालं. पद्मा तुला कसें वाटत. "

" आज जितका मोकळेपणा आहे तितका उद्यां मिळणार नाहीं असं

मला वाटतं. शिवाय आज भरपूर चांदणं आहे, तेव्हां अंधेराची भीति वाटण्याचं कांहीं कारण नाहीं."

" वा तूंही वसंतरावाच्या बाजूची झालीस, बरोबरच आहे आतां त्यांच्या राणीपदावर आरूढ व्हायचें आहे ना, तेव्हां त्यांच्या मताप्रमाणें बोलायलाच हवें असंचना! "

" त्याकरतां म्हणून नाहीं कांहीं, पण मी खरंच मनापासून सांगतें."

" बरं आहे चला, तुमच्या दोघांच्या इच्छेच्या विरुद्ध मी तरी कशाला जाऊं, पण अर्ध्या तासाच्या आंत परत फिरले पाहिजे हें लक्षांत ठेवा. कांहीं झालें तरी मला आज नऊ वाजतां सर्कसला गेलेंच पाहिजे."

तिची कबुली मिळतांच वसंतरावानें पद्माचा हात हळूच दाबला व तिनेंहि सहेतुक दृष्टीनें त्याच्याकडे पाहून हास्य केले.

शंकराचार्यांची टेकडी वाटेतच लागते. चंद्रोदयाला थोडा अवकाश असल्यामुळें यावेळीं सर्वत्र अंधार पसरला होता. त्या टेकडीवर देवदर्शनाला किंवा हिंडायला जाणारे सर्व लोक यावेळीं परतूं लागले होते. ते तिघेजण मोटारींतून खालीं उतरले. उषेला तो डोंगर भयाण असा वाटत होता, तिला त्या डोंगरावर जाऊं नये असेंच सारखें वाटत होतें पण न जाण्यासारखें कांहींच कारण तिला सागतां येण्यासारखें नसल्यामुळें धडधडणाऱ्या अंतःकरणानें ती वर चढूं लागली. वसंतरावाच्या हातांतील टॉर्चनें प्रकाशांची बरीच उणीव भरून काढली होती.

वर पोहोंचेपर्यंत चंद्रोदय झाला त्यामुळें उषेला पुष्कळ हायसें वाटलें. ती टेकडी पुष्कळच उंच आहे लहान लहान दोन तीन टेकड्या चढल्यानंतर ही मुख्य टेकडी लागते. शंकराचार्यांचें देऊळ लहान पण टुमदार आहे आत फक्त एक मोठी ाळुंकी असून इतर कसलीच मूर्ति नाहीं. देवळाभोवती विजेची रोषणाई केली आहे पण आज पूर्णचंद्र असल्यामुळें सर्व दिवे बंद होते. वर येईपर्यंत उषा व पद्मा अगदीं दमून गेल्या त्यांना देवळाच्या पायऱ्यावर पांच मिनिटें विश्रांति घेणें भागच पडलें. वर येईपर्यंतच एक तास निघून गेला तेव्हां दोन तासांत सुद्धां परत जाणें शक्य नाहीं हें उषेला स्पष्ट दिसून आलें, तरी पण पांच मिनिटांची विश्रांति घेऊन ती

उठलीच. पद्माला मात्र अगदीं हलवेना ती पायऱ्यावरून उठण्यास बिलकूल तयार होईना शेवटीं दोघेच आसपासचा प्रदेश पहाण्यास निघाले.

स्फटिकासारखें सुंदर, स्वच्छ व आल्हाद देणारें चांदणें, समोरचा बर्फाच्छादित शुभ्र पर्वत, टेकडीच्या पायथ्याशीं सुंदर सरोवर, लांब दूरवर पसरलेल्या नितांत रमणीय सुंदर बागा व सर्व नगरीला नागमोडीनें वेढा घालून खंदकाप्रमाणें तिचे रक्षण करीत असलेला तो झेलम नदीचा प्रवाह पाहून ईश्वराच्या करणीच्या अद्‌भूततेबद्दल अत्यंत आदर उत्पन्न झाल्या- शिवाय रहात नाहीं.

वसंतराव तो देखावा पाहून बेहोष झाला. अत्यंत कामुकतेनें तो उषा- कडे पाहूं लागला पण मोठ्या कष्टानें आपलें मन आवरून तो म्हणाला " उषाताई किती मनोहर देखावा आहे हा ! असला देखावा पाहून ज्याचे मन चलबिचल होणार नाहीं तो प्राणी मनुष्य कोटींतलाच नसला पाहिजे असं मला वाटतं."

" खरंच किती नयनमनोहर हा देखावा आहे ! वाटतं कीं नेहमींच इथें बसून रहावं. उद्यां हे आले म्हणजे त्यांना हा देखावा पाहून किती आनंद होईल नाहीं. वसंतराव तुम्ही उद्या पुन्हा आमच्याबरोबर या, रमेश येईल म्हणजे खूप मौज होईल नाहीं ! "

उषेच्या अरसिकपणामुळे आपल्या भाषणाला भलतेंच वळण लागलेलें पाहून वसंतरावाचा फार जळफळाट झाला तरी बाह्यात्कारी शांतपणा धरून तो म्हणाला, " श्रीकांत अत्यंत नशिबवान खरा."

" कां, त्यांच्या नशिबाची आठवण झाली ! "

" त्याला असलें हें स्त्रीरत्न सुखासुखी मिळालें म्हणून ! खरोखर सांगतो, उषाताई, तुम्हाला मिळावयाला मी वाटेल तें केलें असतें तुमची वाटेल ती आज्ञा, तुमच्याकरतां वाटेल तें साहस मी कृतींत उतरविलें असतें. आज दुपारीं तुम्हाला बाहूपाशांत घेतले त्यावेळीं अशी पत्नी असती तर मी किती सुखी झालो असतो. असें मला वाटलें.उषाताई तुम्हाला माझ्याबद्दल कांहींच कां वाटत नाहीं ? "

बोलतां बोलतां वसंतरावानें तिचे हात आपल्या हातांत घेतले. आपले

हात हळूच सोडवून ती म्हणाली, " वसंतराव तुमच्याबद्दल मला कांहींच वाटणार नाहीं असं कस होईल! तुमची शरीरयष्टी, डोळे हे कोणाही स्त्रियांचे मन आकर्षण करण्यासारखें आहेत पण मन आकर्षण झालें तरी त्या गोष्टीला वैषयिक दृष्टी लावतां उपयोगी नाहीं. सदसद्विवेकबुद्धी ही ईश्वराची एक मोठी अमूल्य देणगी आहे त्या बुद्धीच्या जोरावर मनुष्य अशा संकटातून सहज निभावूं शकतो."

" माझी बुद्धी वगैरे सर्व यावेळीं नाहींशीं झाली आहे. उषा, माझ्या सर्व अंगाचा भडका उडाला आहे, तुझ्या प्राप्तीशिवाय मला यावेळीं कांहींएक दिसत नाहीं."

बोलतां बोलतां उषेला बाहुपाशांत ओढून घेऊन तिच्या प्रतिकारास न जुमानता त्यानें तिचे चुंबन घेतलें. त्याच्या हाताला कडकडून चावा घेतल्यामुळे वसंतरावाला हात चोळींत मागे सरावे लागले. उषा नखशिखांत थरथर कापत होती; तिला उभे राहण्याचीहि शक्ति राहिली नाहीं ती तेथें जवळच असलेल्या एका शिलाखंडावर बसली तिनें आजूबाजूला पाहिलें यावेळीं एकहि मनुष्य त्या टेकडीवर नव्हता. पद्मा मात्र हळुहळू इकडे येताना दिसली त्याबरोबर धीर येऊन तोंडाला कोरड पडली होती तरी जीव एकत्र करून तिनें मोठ्यानें हाक मारली, " पद्मा धांव, "

त्वरीत गतीनें पद्मा तेथे येऊन पोहोचली; तिच्याजवळ बसून ती म्हणाली " उषाताई काय झालं."

" काय सांगूं तुला कपाळ ? वसंतराव कायहो केलेत हें, तुमच्या स्नेह्याची मी पत्नी आहे हे कसेहो विसरलात ! "

" उषाताई, काय झालें तें मी पाहिलें आहे त्याबद्दल मनाला कांहीं लावून घेऊं नका ही बातमी कुठेंहि बाहेर फुटणार नाहीं."

" पद्मा तूं किती अज्ञानी आहेस अग लोकापासून ही गोष्ट लपून राहिली तरी ईश्वराची नजर कशी चुकवितां येईल ! "

" ईश्वर बघतो हे सर्व थोतांड आहे मी ईश्वर वगैरे कांहीं जाणत नाहीं तुमच्याप्रमाणें मीहि पहिल्या प्रथम अशीच घाबरले होते पण आतां

ते अगदीं अंगवळणीं पडून गेलें आहे माझी खात्री आहे कीं तुम्हीसुद्धां हें ईश्वराचे थोतांड सोडून दिल्यास माझ्याप्रमाणेंच तरबेज व्हाल."

" पद्मा, पद्मा, तुझ्या जिभेला कांहीं हाड आहे कां ? तू काय बोलतेस याचा तूं विचार तरी केला आहेस कां ! " ईश्वराची भीति आहे म्हणूनच समाजाला कांहींतरी बंधन आहे. ईश्वर तुला मूर्तींत दिसत नसला तरी निराकार ईश्वरांचे स्मरण कर; त्याच्या स्मरणाशिवाय मनुष्याची आत्मशुद्धी होणार नाहीं त्याचे स्मरणच मनाला शांतता देईल. "

" उषा " वसंतराव यावेळीं पुढे येऊन म्हणाला " तिला असले उपदेश करून तिचा किंवा तुझा कोणाचाही फायदा होणार नाहीं. ईश्वराच्या प्राप्तीऐवजीं तुझी प्राप्ती हेच माझे आजचें ध्येय आहे आणि तें सफल झाल्याशिवाय तुझी सुटका नाहीं. "

त्याचे शब्द ऐकून उषा ताडकन् उभी राहिली. वसंतरावाकडे संतापानें पहात ती म्हणाली " तुम्ही काय म्हणता याचा विचार केलेला दिसत नाहीं. आम्ही दोघी असतां तुम्हाला काहींही करता येणार नाहीं हें कसं तुमच्या लक्षांत आले नाहीं. "

" उषा, तूं मूर्ख खरी, तुला थोडी तरी अक्कल असती तरी तुझ्या ध्यानात आले असते कीं या बाबतींत पद्माचा तुला काहींएक उपयोग होणार नाहीं, तुला आतां संशयांत ठेवून तरी काय करायच आहे मी तुला स्पष्टच सागतो कीं आजचा हा तुला इथें आणण्याचा बेत आम्ही पूर्वीं ठरवूनच घडवून आणला आहे. उद्यां श्रीकांत आल्यावर तूं कसची हातीं लागतेस हें जाणूनच आजचा हा योग घडवून आणावा लागला आहे. एकदा तूं ताब्यांत आल्यावर मग जन्मभर जातेस कोठें ! "

" पद्मा हे म्हणतात ते खरे आहे कां ! बोल चांडाळणी बोल ! आजपर्यंत तुला पाठच्या बहिणीसारखी वागवली त्याचें हेच का बक्षीस ! बोल, तूं नाहींना मला मदत करणार ? "

" तिला काय विचारतेस, पद्मा तिला सोडून तूं माझ्या इकडे येऊन उभी रहा. "

पद्मा तिकडे गेलेली पाहून उषेला काय करावें हें सुचेना. ती उद्वेगानें

वसंतरावाला म्हणाली, " वसंतराव, विश्वासानें ताब्यांत दिलेल्या तुमच्या मित्राच्या स्त्रीचा असा गळा कापण्याचा प्रयत्न करूं नका, यांत तुम्हांला यश येणार नाहीं मी जिवंत असेपर्यंत कोणी कांहीं करूं शकणार नाहीं. "

" उषा, या धमक्या फुकाच्या आहेत, बहुतेक स्त्रियांनीं पहिल्या प्रथम मला अशाच धमक्या दिल्या आहेत पण त्या आतां सुखानें संसार करीत आहेत. तुझ्याही संसारांत यापुढे मी कोणताही अडथळा आणणार नाहीं असें वचन देतो. "

" शिवशिव, किती भयंकर शब्द आहेत हे ! सिनेमांत येणाऱ्या स्त्रियांशीं तुम्ही असेच कां वर्तन करतां ! "

" उषा, बोलत बसायला मला आतां वेळ नाहीं तो खालीं मोटारवाला वाट पहात असेल ! तुझ्या बाबतींत जितका त्रास झाला तितका सबंध आयु-ष्यांत मला झाला नाहीं. पत्रापासून मला तयारी करावी लागली, तुझीं पत्रें बंद झाल्यामुळे तरी तूं आज हातीं लागत आहेस नाहींतर मला आशा मव्हतीच. "

" हें मी काय ऐकते आहे ! त्यांचीं पत्रें येऊन मला मिळालीं नाहींत ? गुलाब म्हणत होता तेंच खरं तर. नाथ किती मी अपराधी ! तुम्ही तिकडे दुःखी असतां मी इकडे चैन करीत हिंडत आहे. निर्दया काय केलेस हें. प्रमिलाताईकडे ते आहेत हें सांगितलेलें खोटेंच तर. "

" यांत काय शंका आहे ! इतकेंच काय पण तुझ्या खोलींतला श्रीकांताचा फोटोही मी लांबविला आहे, बोल, तुला आणखी काय माहिती हवी आहे. यावरून तुझ्या लक्षांत आलेंच असेल कीं मी किती तयारीनें आलो आहे व माझ्यापासून यावेळीं सुटणं किती कठीण काम आहे. "

" शुद्ध कसाई आहेस. इतके सर्व केलेस तरी मी श्रीकाताची पत्नी आहे हें तूं विसरलास ! त्यांच्यासारख्या वीरपुरुषाची पत्नी वीरच राहील, तुलासुद्धां ज्यास्त सशयांत ठेवण्याची माझी इच्छा नाहीं. मी जगांत कांहीं दिवस तरी एकटीच रहाणार असल्यामुळें किस्मतपुराहून निघतेवेळीं आपल्या स्वत्वरक्षणाचें कांहींतरी साधन असावें म्हणून ही विषाची कुपी मी नेहमीं जवळ बाळगली आहे, नीट डोळे फाडून पहा, तूं एक पाऊल पुढें

टाकल्याबरोबर माझा अचेतन देह येथें श्रीशंकराच्या पायाशीं पडला म्हणून समज. मी आता एकटीच खालीं जाते आहे कोणी मला धरण्याचा प्रयत्न केल्यास परिणाम सांगितलाच आहे."

हा अनपेक्षित प्रकार पाहून वसंतराव अगदीं गोंधळून गेला. एक क्षण काय करावें हेंच त्याला सुचेना. उषा त्याच्या डोळ्यासमक्ष त्याचा धिक्कार करून त्याच्या पुढून चालली होती. तिला अडविण्याचा त्याला धीर झाला नाहीं. ती बरीच दूर गेल्यावर तो मोठयाने म्हणाला, "उषा एक मिनिट उभी रहा. माझी एक विनंती ऐक."

तें उषेचें अंतःकरण होते! अजातशत्रु, स्वप्नांतही कोणाचे मन न दुखविणाऱ्या, अत्यंत कोमल हृदयाच्या स्त्रीचें ते अतःकरण होतें! प्रत्यक्ष डोळ्यासमोर भयानक मृत्यु किंवा बेअब्रू दिसत असतां सुद्धा वसंतरावाची विनंती ऐकून तिचें मन द्रवलें; ती उभी राहिली. वसंतराव व पद्मा हळु-हळु तिच्याकडे जाऊं लागले. उषेनें सहज सभोवार पाहिलें. समोरच तिला शंकराचे देऊळ दिसत होतें. डाव्या बाजूस खालीं उतरण्याचा रस्ता होता व पाठीमागें थोड्याशा अंतरावर टेकडीचा कडा तुटलेला होता. ते दोघेही तिच्यापासून दूर अंतरावर उभे राहिले, वसंतरावानें खालीं मान घातली होती त्याच्याकडे पाहून उषा म्हणाली, "काय म्हणणं आहे?"

"उषाताई, माझी चूक माझ्या पूर्ण लक्षांत आली. इतर स्त्रियाप्रमाणेंच तुम्ही आहात ही कल्पना करून माझ्या हातून अत्यंत अनुचित असा प्रमाद झाला आहे. तेव्हा त्याबद्दल क्षमा करा व झालेल्या गोष्टी विसरून जा येवढीच विनंती आहे."

"वसंतराव तुमची मला कींव येते, आजपर्यंत तुम्ही नाहीं नाहीं तें अत्याचार केलेले दिसतात, तेव्हा तुम्हांला क्षमा करणं म्हणजे असल्या गोष्टी-ला उत्तेजन देण्यासारखं आहे, तरीपण माझं मन कठोर होत नाहीं यापुढील आयुष्य तरी नीतीनें घालवा. पद्माही बहकलेलीच मुलगी आहे तेव्हां तिच्याशीं लग्न लावून गृहस्थाश्रमी व्हा येवढंच माझं सांगणं आहे."

"पण माझ्या वर्तनाची क्षमा केली ना!"

"बराच विचार केल्यावर माझंसुद्धां वर्तन थोडं चुकलं असं मला वाटूं

लागलं आहे. चांगली सुखांत माझ्या राज्याची मी राणी होते, माझा एक शब्दही खालीं पडत नव्हता पण मला दुर्बुद्धि आठवून आपण जगांत नांव कमवावें, आपल्याला येत असलेल्या कलेचं सार्थक करावं असं वाटून प्रमिलाताईची इच्छा नसताना मी हट्टानें निघून आले. नाथांची पत्रें कां येत नाहींत याची नीटशी चवकशीही केली नाहीं, इथेंच काय पण माझ्या-बद्दल तुम्हाला अनुराग उत्पन्न होईल असेंही माझ्या हातून वर्तन झालें. असो, आज तुम्ही केलेल्या अनुचित गोष्टीबद्दल मी क्षमा केली आहे पण आजचा तुमचा हा अपराध मी नाथांच्या कानावर घालणार आहे ते शांतिसागर आहेत. तुमच्या या कृतीबद्दल ते खात्रीनें क्षमा करतील. चला आपण आतां खालीं जाऊं या. "

" उषाताई, मला वचन द्या, त्याशिवाय माझें समाधान होणार नाहीं आपल्या आज्ञेप्रमाणे मी पद्माशीं लग्न लावायला तयार आहे, मला फक्त तुमचें वचन हवें. "

उषा हंसून म्हणाली, " माझ्या शब्दावर विश्वास नाहीं ! बरं हे घ्या वचन. "

उषेनें हात पुढे केला. वसंतरावानेही आपले दोन्ही हात पुढें केले. वचन दिलेला तिचा हात दोन्ही हातात धरीत असताच वसंतरावाला तिच्या पोलक्याच्या खिशातील कुपी दिसली त्याला हवी होती ती संधी मिळाली. एक क्षणाचाही विलंब न लावतां त्यानें ती कुपी झटकन् तिच्या खिशातून काढून घेतली. उषेलाही परिस्थितीची पूर्ण जाणीव झाली. वसंतराव हर्षानें म्हणाला," मला तूं अगदींच कच्चा समजतेस होय. सापावर पाय देऊन त्याला सोडून देण्याइतका मी खुळा नाहीं. उषा, एक मिनिटही तुझ्याशीं बोलण्याची माझी इच्छा नाहीं तुला येथून माझी पत्नी म्हणूनच खाली गेलें पाहिजे. "

उषा शांतपणें म्हणाली, " तू म्हणतोस तेंच खरं! सापावर दया करण्यात मी चूक केली व त्याचें प्रायश्चित्त मला आतां भोगलेंच पाहिजे, वसंतराव मघाशी सांगितलें तेंच पुन्हां सांगतें कीं श्रीकांतासारख्या वीर पुरुषाची मी पत्नी आहे व ती वीराप्रमाणेंच आपला आत्मा समर्पण करील. या जगांत

आम्ही दोघानीं येपुढें सुखी असावं अशी ईश्वरेच्छा दिसत नाही. पुढील जन्म येणार असल्यास पुढील जन्मीं अगर स्वर्गात त्यांचीच पत्नी होऊन मी राहीन. नाहींतरी माझ्या अपराधाचं प्रायश्चित्त मला हवंच होतं आणि ते घेण्यांत मला मुळींच खंत वाटणार नाहीं."

"उषा, ही बडबड आतां व्यर्थ आहे तुझी आतां कोणत्याही तऱ्हेची धडपड मी चालूं देणार नाहीं पद्मा ओढ तिला पुढें."

"थांबा अशी घाई करूं नका. दांडगाई करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं, पद्मा कशीही वागली तरी माझे तिच्यावर प्रेम आहे. तिच्याशीं मला दोन शब्द बोलू द्या. पद्मा अजापही वेळ गेली नाहीं. वसंतरावाशीं कां होईना पण लग्न लावून संसार कर. वाईट संगती शक्यतोंवर टाळ. वाईट संगतीनें माझ्यावर काय परिणाम झाला हें तुला दिसतेंच आहे, आयुष्यात माणसानें शक्यतोंवर वाईट संगती टाळली पाहिजे नाहींतर त्याचे वाईट परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहींत. सिनेमांत रहाणं सोडून दे. कलेकरतां सुखाचा संसार सोडून आर्य स्त्रियांनीं सिनेमात येणं किती धोक्याचं आहे हें तुला आतां कळून चुकलेंच असेल. नाथ भेटल्यास त्याना माझ्या अपराधाची क्षमा करण्यास सांग. त्याचप्रमाणें प्रमिलाताईला निरोप सांग कीं तुझी बहीण या जगांत रहाण्यास नालायक ठरली. रमेशलाही माझ्या मूर्खपणाची क्षमा करायला सांग."

तिला थांबवून पद्मा म्हणाली, "उषाताई, तुम्ही ही निरवानिरव कशाला करतां! या घटकेला तुमची सुटका होईल असं मला तरी वाटत नाहीं. माझं ऐका व हा हट्ट सोडून द्या. आजची हकीगत कोणाला कळणार नाहीं याबद्दल मी वचन देते."

"पद्मा काय ही तुझी अधोगती! तुझ्या पंक्तीला मी केव्हां येऊन बसेन अशी तुला घाई झालेली दिसते पण ती तुझी आशा व्यर्थ आहे मी जिवंतपणीं शीलभ्रष्ट होणार नाहीं."

"या गमजा फोल आहेत" वसंतराव आवेशानें म्हणाला, "तुला सोडवायला, तुझे रक्षण करायला कोण येणार आहे तें पहातो. तुझा शेवटला आधार जो ही विषाची कुपी ती पहा मी अस्मानांत फेकून देतो."

वसंतरावानें ती विषाची कुपी दूर भिरकावून दिली.

" वसंतराव, मी शेवटची विनंती करते आहे कीं असला अधःपात करून घेऊ नका, यांत तुमचें कल्याण नाहीं. यावेळीं माझ्या कोणी मदतीला येणार नाहीं हें मी जाणून आहे, आणि कोणी मदत करावी अशी माझी इच्छाही पण नाहीं. माझं सत्व रक्षण करण्यास मी समर्थ आहे. "

" तुझ्या सत्वाची आतां मला परीक्षाच पहावयाची आहे मी तुझा धरलेला हात कोण सोडवितो तें पहातों. "

त्यानें तिचा एकदम हात धरला, त्याला हिसका मारित उषा म्हणाली, " मेल्या, अधमा, दूर हो माझा हात सोड, नाहीं सोडत, मग भोग आपल्या कर्माचीं फळे "

उषेनें संतापाने इतक्या जोरानें लाथ मारली कीं वसंतराव कोमलडून दूर जाऊन पडला. पद्मानें घाबरून किंकाळी फोडली. प्रसंग अत्यंत आणीबाणीचा होता, उषा धावतच कड्याच्या टोंकाला जाऊन उभी राहिली. इकडे वसंतरावही अंग झटकून उभा राहिला. त्याचे डोळे एखाद्या खुनी इसमाप्रमाणें दिसूं लागले. तो दांत ओठ चावीत व अस्तन्या मागें सारून त्वेषानें तिच्याकडे निघाला. पद्मा त्याला आडवूं लागली. पण एका हाताने त्यानें तिला दूर भिरकावून दिली. उषा त्या कड्यावर उभी राहून पद्माला उद्देशून म्हणाली, " पद्मा, नाथ भेटल्यास सांग कीं तुमची लाडकी उषा वीराच्या मरणानें मेली. खऱ्या आर्य स्त्रीला शोभेल त्याच मार्गानें ती गेली. मरणाच्या वेळीं एकही दुःखाचा सुस्कारा तिनें टाकला नाहीं. मी कळून न कळून पुष्कळाचे अपराध केले असतील तरी त्या सर्वांनीं मला क्षमा करावी अशी विनंती; झालं माझं काम, पापी दुरात्म्या, ये आतां पुढे, तुझ्या हातावर तुरी देऊन, सौभाग्याच्या लेण्यानें ईश्वराच्य, पायापाशीं मी जात आहे. नाथ येते मी, मला क्षमा करा, श्रीकांत, श्रीकांत श्रीकांत. "

उषेनें धाड्दिशीं कडयाखालीं उडी घेतली ! किती वेळ तरी श्रीकांत ! श्रीकांत ! ! असा आवाज त्या टेकडीवर दुमदुमत होता. पद्मानें डोळे झाकून किंकाळी फोडली.

## "अपघातानंतर" २१

योगायोग किती विलक्षण असतात पहा! वस्तविक श्रीकांत दुसऱ्या दिवशीं सकाळीं येणार होता पण रावळपिंडीला मोटार सोईची मिळून आदल्या दिवशीं रात्रींच तो काश्मीरला आला. फक्त दोन तासांचा फरक! फक्त दोन तासानें उशीरा श्रीकांत आला. संध्याकाळच्या आत श्रीकांत आला असता तर केवढे अपघात टळले असते. पण जगात नेहमींच सुख कायम राहिले तर दुःखाची कल्पना लोकांना येणार नाहीं. दुःखातच सर्वांना ईश्वर, सर्व आप्तवर्ग यांची आठवण होते आणि म्हणूनच ईश्वराने दुःखा-मागून सुख, सुखामागुन दुःख असे रहाटगाडगे चालू ठेवले आहे.

श्रीकांत आधीं आला असता तर रमेशाची गाठ पडली असती. त्याच्या मनावरचे दडपण कमी होऊन त्याच्या हातून अपघाताशिवाय काम झाले असते. त्यानंतर त्याच्या इच्छेप्रमाणे श्रीकांताला तावडतोब उपेला भेटता आले असते पण.... दैवाने ठरविलेले अपघात टाळण्याचे मानवी शक्तीच्या बाहेरचें होते असो.

श्रीकांताची मोटार सरळ १० च्या सुमाराला सर्कसच्या तंबूपाशीं आली. रमेशाच्या अपघाताची बातमी त्याला कळण्यास वेळ लागला नाहीं. मालकही रमेशाच्या शुश्रूषेला गेले आहेत असे कळले तेव्हां तो तसाच तिकडे निघाला होता पण मॅनेजरनें विनंती केल्यावरून त्यानें रमेशाच्या बिऱ्हाडीं जाऊन प्रवासाचे कपडे बदलले व चहा घेऊन तो एका इसमाबरोबर बिंदुमाध-वांच्या बंगल्याकडे निघाला.

आपण कोण आहोत याची श्रीकांताने ओळख करून देतांच त्या मंडळींना फार बरें वाटलें व आपण बऱ्याचशा जबाबदारीतून मोकळे झाल्याबद्दल त्यांना हायसे वाटले. तेथील डॉक्टरानें आधींच रमेशची जखम बांधली होती व हातांत नाडी धरून तो त्याची सावध होण्याची वाट पहात होता. श्रीकांतानें त्या डॉक्टरकडून त्याला हवी असलेली माहिती विचारून घेतली व नंतर तोहि त्याला शुद्धीवर आणण्याच्या मार्गाला लागला.

त्याच्या उशागतीं मीना अगदीं बसून राहिली होती, त्या डॉक्टरानें व श्रीकांतानेही तिला विश्रांती घेण्यास जाण्याबद्दल विनंती केली, पण ती तेथून हालली नाहीं.

दोन तास झाले तरी रमेश शुद्धीवर येईना पण लवकर शुद्धीवर येणें अत्यंत जरुरीचें आहे असें श्रीकांताचे मत पडले म्हणून त्यानें एक औषध तयार करून त्याचें इंजेक्शन दिलें. अर्ध्या तासाच्या आंत त्या औषधाचा परिणाम होऊन तो हळु हळु शुद्धीवर येऊं लागला. तो हालचाल करूं लागला आहे असें पाहून मीनाने त्याचें पांघरूण नीट सांवरलें.

अर्धवट शुद्धींतच रमेश बडबडू लागला, " मीना, तुम्ही आलात, माझ्या शब्दाला मान देऊन आलात मला फार समाधान वाटलें, पण उषा कां नाहीं आली ? तिला कोणी बोलावून आणा हो तिच्यावर मोठें संकट आलें आहे. श्रीकांत......पुढचे " शब्द तोंडांतल्या तोंडातच उच्चारल्यामुळें ते त्या मंडळींना ऐकूं आले नाहींत.

त्यानें मीनाचें नांव काढतांच तिला अगदीं ओशाळल्यासारखें झालें. रमेश कोणाला उद्देशून बोलतो आहे हें श्रीकांताच्या चटकन् लक्षांत आलें. त्यानें तिला एका बाजूला नेऊन त्याच्या बडबडण्याचा अर्थ विचारला. तिला माहीत असलेली सर्व हकीगत तिनें सांगितली पण ही उषा कोण ! तिच्याबद्दल तो काय बडबडतो आहे याबद्दल ती कांहींच सांगू शकली नाहीं. अपघाताच्या पूर्वी त्याच्या मनांत जे विचार होते तेच तो आतां बोलतो आहे अशी त्याची खात्री झाली. पण उषेबद्दल तो काय म्हणतो याची कोणालाच कल्पना होईना. उषा इथें आली आहे का काय ! तिच्यावर कसलें संकट आहे ! वगैरे गोष्टींचें ज्ञान रमेशनें स्वतःहून सांगितल्या-

शिवाय कळणें शक्य नाहीं हे जाणून श्रीकांत हताश झाला. त्याला काय करावे हे सुचेना.

तो लवकर चांगला शुद्धीवर येईल असे प्रथमतः सर्वांना वाटलें पण सकाळीं आठाच्या पूर्वी तो चांगला शुद्धीवर येऊं शकला नाहीं. रात्रभर जागत बसलेली मंडळी नुकतीच बाहेर गेलीं होतीं. मीनाच्या डोळ्यावर विलक्षण झोंप येऊं लागली होती, पण रमेश शुद्धीवर आल्याशिवाय उठायचेच नाहीं असा निश्चय करून ती बसलेली दिसत होती व तिच्या श्रमाचे चीज होऊन सकाळीं ८॥ च्या सुमाराला तो डोळे उघडून इकडे तिकडे पाहूं लागला.

मीनाच्या फारच आग्रहावरून श्रीकांत बाहेरच्या खोलींत आरामखुर्चीवर पडून राहिला होता. त्याला झोंप येणें शक्यच नव्हते पण पाठ टेकून पडण्याची त्याला अत्यंत आवश्यकता होती कारण २०० मैल प्रवास करून त्याचें अंग अगदीं खिळखिळें झाले होते.

रमेशच्या कपाळावर हात फिरवीत मीना म्हणाली, " रमेश आता थोडे बरें वाटते का ? "

तो शुद्धीवर आला होता तरी एकंदर परिस्थिती लक्षांत न येऊन तो तिच्याकडे पाहून शून्यदृष्टीने नुसतें 'ऑं' म्हणाला, " म्हटलें आता बरें वाटतें ना ? "

तिच्या प्रश्नाला उत्तर न देतां तो म्हणाला, " मी कुठें आहे? "

आवाज ऐकून श्रीकांत चटकन् उठला व आंत आला. श्रीकांताला ओळखण्याइतका तो खास शुद्धीवर आला होता. तो त्याला म्हणाला, " श्रीकांत केव्हा आलांत ! "

" काल रात्रीं आलो. "

" मग आतां सकाळ कां आहे ! मी इथें कुठें आलों आहे ! "

" तूं घोड्यावरून पडल्याचें तुला आठवतें का ? "

" हं अ ले लक्षांत. अरे पण उषा कुठें आहे ! तिला नाहीं कां घेऊन आलात जा, आधीं जा, वसंतराव तिला फसवीत आहे बोटहाऊसवर जाऊन तिला सोडवून आणा ती खास संकटांत असली पाहिजे. "

" रमेश फार बोलूं नकोस जरा विश्रांती घे मग काय सांगायचें असेल ते सांग. आतां एक अक्षरही बोलूं नकोस."

" श्रीकांत मला बोलूं द्या आतां मी चांगला शुद्धीवर आहे. सिनेमामधील मंडळीबरोबर उषा इथे आली आहे, श्रीकांत येथून उठा व तिकडे बोटहाऊसवर जा. तिच्याकरतां माझा जीव तळमळतो आहे. ती सुखांत आहे हें ऐकण्याकरतां माझा प्राण अडकून राहिला आहे. मी येथें जिवंत असता उषा संकटात होती हे मी कोणत्या तोंडानें लोकाना सांगू ? प्रमिलाताईला मी हे तोंड कसे दाखवू ! सकाळीं मी तिला तिच्या इच्छेप्रमाणे जाऊं दिले हीच मोठी चूक झाली. श्रीकांत ती खास संकटात आहे अशी माझी मनोदेवता मला सांगत आहे जा जा, माझ्या नजरेसमोरून जा."

फार बोलण्याच्या श्रमाने ग्लानी येऊन तो पुन्हां डोळे मिटून पडला. श्रीकांताला काय करावे हेच सुचेना. तो मीनाला हळूंच म्हणाला, " तो काय म्हणतो आहे हे मी पाहून येतो तोपर्यंत तुम्ही याच्यावर लक्ष ठेवालच. तुम्हीच त्याला आज जीवदान दिले आहे. उद्या याची बहीण येथे आल्यावर तिला तुमच्याबद्दल किती तरी आदर वाटेल."

त्याच्या बोलण्याने तिला संकोच वाटूं लागला ती त्याला थांबवून म्हणाली, " आपण जाऊन यावें मी याच्याकडे पहाते जरूरी वाटल्यास मी डॉक्टराना बोलावणे पाठवीन."

श्रीकांत जड अंतःकरणाने तेथून निघाला. उषेबद्दलची बातमी ऐकून त्याच्या पोटात धस्स झालें. रमेशच्या बिऱ्हाडीं जाऊन तेथून एखाद्या इसमाबरोबर बोटहाऊसवर जाण्याचे त्यानें ठरविले व त्याप्रमाणे तो निघाला.

बिऱ्हाडात पाऊल टाकतांच दारातच एक चिठ्ठी पडलेली त्याला आढळून आली, ती रमेशच्या नावानें होती. तींत पुढील मजकूर होता. " अपघातानें उषाताईला एकाएकीं मृत्यु आला आहे ताबडतोब निघून यावें. श्रीकांत आले असल्यास त्यानाही बरोबर आणावे. वसंतराव चिठ्ठी वाचताच श्रीकांताला घेरी येऊन धाडदिशीं तो खालीं पडला. याच वेळीं त्याच्या बरोबर येणारा इसम तेथे होता म्हणून बरें झाले. त्यानें श्रीकांताला सांवरून धरलें व एका बिछान्यावर निजवून झटकन् पाणी आणलें. डोक्या-

वर, डोळ्यावर पाणी शिंपडतांच तो दोन तीन मिनिटांतच सावध झाला. तो उठून बसला त्यानें ती चिठ्ठी पुन्हां वाचली. त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. सद्‌गदीत कंठानें तो म्हणाला, " उषा, हें काय झालं! आतां मी काय करूं! माझी तुला कशी ग दया आली नाहीं, हेंच कां माझ्यावर तुझें प्रेम. माझ्या सुखाकरतां तूं वाटेल तेवढा आत्मयज्ञ करायला तयार होतीस, आजपर्यंत केलाही होतास. मी आनंदी असावें, मला बरें वाटावें म्हणून ना तू सिनेमांत गेलीस आणि आतां हें काय केलेंस, ईश्वरा, आता मी काय करूं माझी लाडकी उषा, माझा प्राण मला कोण भेटवील! हरहर मी किती चांडाळ, तिला कधींही सुख दिले नाहीं, उषा, देवी, तू जगाची देवता होण्याच्या लायकीची आहेस. तू कशाला या चांडाळाच्या घरीं येऊन त्याला पावन केलेंस. तुझ्याशिवाय मी दिवस कसे कंठू! थोडा वेळ थांब मी आलोच तुझ्या मागोमाग. हा अपघात नसून ही आत्महत्या आहे असा माझा संशय आहे. या आत्महत्येला कोण कारण आहे त्याचा सूड घेऊ दे. काय म्हणतेस जाऊ द्या भोगील तो आपल्या कर्मांची फळं! अहाहा देवते, असली क्षमाशील वृत्ती तुलाच शोभते, मी तुझ्या पायाचा दासही होण्याला लायक नाहीं तरी पण मी तुझ्या मागोमाग येणार व तुझ्या पायाची सेवा करीत रहाणार!"

श्रीकांत वेड्यासारखा बाहेर धावूं लागला; त्याला त्या इसमानें थोपवून धरले व तेथील एका खुर्चीवर नेऊन बसविलें. तो दुःखवेग त्याला मुळींच सहन होईना तो पुन्हां बेशुद्ध होऊन पडला.

तो इसमही फार घाबरला पण पुन्हा एकदां पाणी शिंपडून त्यानें त्याला सावध केले. यावेळीं मात्र श्रीकांत बराचसा शांत झाला होता. आंतून अगदीं भडभडून येई, आंतडी पिळवटून निघत पण मोठ्या कष्टानें त्या यातनांचें संयमन करून तो शांत रहाण्याचा प्रयत्न करूं लागला. किती केलें तरी श्रीकांत धीराचा मनुष्य होता. मनावर ताबा मिळवणें जरी अत्यंत कठीण काम होतें तरी मोठ्या सायासानें त्यानें तें मिळवलें.

चिठ्ठींत लिहिल्याप्रमाणें खरोखर वस्तुस्थिती आहे का नाहीं हें पहाण्याकरतां आपलें मन घट्ट करून तो तेथील नोकराला घेऊन बोटहाऊसकडे

निघाला. त्याचें वेडें मन त्याला आशा दाखवीत होतें कीं कदाचित् उषा अद्याप मेली नसेल पण वाईट गोष्टी सहसा खोट्या ठरत नाहींत असा प्रत्येकाचा नेहमीचाच अनुभव आहे त्याचप्रमाणे उषेच्या बाबतींत झालें.

शंकराचार्यांच्या टेकडीवरील तो प्रसंग अत्यंत आणीबाणीचा होता. उषेनें उडी टाकलेली पहाताच वसंतराव घाबरून खालींच बसला. 'हें काय झालें' उषा इतकी निग्रही आहे अशी त्याची खरोखरच कल्पना नव्हती, इतर स्त्रियांच्या बाबतींत त्याचा तसा अनुभव नव्हता पण आतां तो प्रसंग प्रत्यक्ष पाहिल्यावर तो अगदीं गांगरून गेला यात नवल नाहीं. पद्मा तर बेशुद्ध पडायच्या बेताला आली होती, तिला आज पातिव्रत्यतेज व आपल्या मनाचा कमकुवतपणा यातील अंतर कळून चुकलें. तिचा उषेबद्दल आदर कमालीचा वाढला. ती तिला एखाद्या देवतेप्रमाणें वाटूं लागली ती अशा तऱ्हेच्या मनाच्या स्थितींत असतांच वसतराव तिच्या जवळ आला व तिला उठवून म्हणाला, " पद्मा ऊठ या प्रसंगातून कांहींतरी तोड काढलीच पाहिजे. "

पद्मा संतापाने म्हणाली, " मला कांहींएक विचारूं नका. तुम्ही निर्दय, पापी, दुष्ट आहात. या क्षणापासून तुमचा माझा कांहींएक संबंध नाहीं. मी ही पहा निघाले, तुम्हीं मला अडविलेत तर मीसुद्धां उषाताईच्या मागोमाग उडी घेईन. "

" पद्मा शांत हो, आता रागावण्यांत अर्थ नाहीं. आपल्या दोघांचाही अदमास चुकला, तूंही यात सामील आहेसच. मग मला शिव्या देण्यांत काय हंशील आहे ? आधीं खालीं जाऊन ती जिवंत हातीं लागते का तें पाहू."

" याउप्पर मी तुम्हांला कोणत्याही तऱ्हेची मदत करणार नाहीं तुमचा मार्ग निराळा व माझा मार्ग निराळा. "

" अशी डोक्यात राख घालूं नकोस, चल खालीं, काय, नाहीं येत ! थांब मीच आता पोलिसांत वर्दी देतो कीं, 'सिनेमांत महत्त्वाचें काम मिळत नाहीं म्हणून हिनेच जाणूनबुजून तिला ढकलून दिल' नि मग पहातो तुझी मजा. "

" काय वाटेल तें करा मी येणार नाहीं. "

" पहा बरं मागून पस्तावशील. मी आता तुझ्याशीं लग्न केलें नाहीं तर आणखी ५।६ महिन्यांनीं होणाऱ्या मुलाला घेऊन तुला एखाद्या माडीचाच आश्रय करावा लागेल. "

" निर्दय, राक्षस, दुष्ट, सर्व कांहीं तुम्ही आहांत मला तुम्हीं अगदीं कैचींत पकडले आहेत, घ्या एकदा मला छळून चला हवें तिथें. "

" तू त्या उषेसारखी नाठाळ नाहींस हें मला पहिल्यापासून माहीत आहे, तूं आहेसच तशी शहाणी. "

" आपलं काम करून घ्यायचं आहे तेव्हां स्तुती कराल तर काय झालं. उषाताईनीं माझे डोळे चांगलेच उघडले आहेत. आतां एक अक्षरही बोलूं नका. "

नंतर अगदीं स्तब्धपणें तीं दोघें खालीं गेलीं. डोक्याला जबर मार बसल्यामुळे उषेच्या डोक्याची कवटी फुटून तिचा प्राण केव्हांच निघून गेला होता, अद्याप ती तोडानें " श्रीकांत " म्हणते आहे असेंच त्याना वाटलें. ते भयानक दृश्य त्याना पहावेना, ते दोघही अगदीं पायथ्याशीं आले. मोटारवाला वाटच पहात होता. पाय घसरून अपघाताने मृत्यु आला असे सांगण्याचे त्यांनीं ठरविलें होते त्याप्रमाणें बतावणी करून त्या ड्रायव्हरच्या मदतीनें ते प्रेत त्यानीं मोटारींत घातले व दवाखान्यांत आणलें. पोलीसांत वर्दी दिल्यावर पचनामा झाला. त्या तिघांपैकीं कोणाचेंच भांडण नव्हते सर्व आनंदात होते वगैरे सिनेमाच्या मालकांनीं व त्या मोटार ड्रायव्हरने साक्षी दिल्यामुळे व विरुद्ध बाजूस कोणीच नसल्यामुळे 'अपघातानें मृत्यु' अशी पोलिसांत नोंद होऊन तें प्रेत तपासणीकरतां दवाखान्यांत पाठविलें गेलें.

वसंतरावानीं रमेशला अगदीं उजाडत चिठ्ठी पाठविली. पण तो अपघातानें आजारी असल्यामुळे त्याला न मिळतां ती श्रीकांताच्या हातात पडली.

नऊ वाजले तरी रमेशकडील कोणीच तपासाला येत नाहींत तेव्हां प्रेताचें काय करावें या विवंचनेंत तीं मंडळी असतां श्रीकांत तेथें हजर झाला.

त्याला पहातांच वसंतरावानें खालीं मान घातली व पद्मानें हंबरडा फोडला.

चिठ्ठींत लिहिल्याप्रमाणें गोष्ट प्रत्यक्ष घडलेली पाहून श्रीकांतानें कपाळावर हात मारून घेतला. त्याचे पाय थरथर कांपूं लागले त्यामुळें तेथील खुर्चीचा आश्रय घेणें त्याला भाग पडलें.

बराच वेळ मूकरुदन केल्यावर व डोळ्यांतील पाणी बरेचसे नाहींसें झाल्यावर श्रीकांताला थोडें हलकें वाटले. एकटा वसंतराव यावेळीं त्या खोलींत होता बाकीचे लोक बाहेर उभे राहून हळुहळु एकमेकाशीं कुजबुजत होते.

आपल्या रुमालाने आपले डोळे व तोंड पुसून श्रीकांत वसंतरावाला उद्देशून म्हणाला, " वसंतराव हा अपघात नसून ही आत्महत्त्या आहे याबद्दल माझी खात्री आहे तेव्हां याला कारण काय घडले हे कळेल कां ? ती देवता तर आत्मयज्ञ करून निघून गेली तेव्हां हा 'अपघात' नसून 'आत्महत्त्या' आहे वगैरे बातमी पोलिसांत देऊन तिच्या प्रेताचे आणखी धिंडवडे काढण्याची माझी इच्छा नाहीं. "

" श्रीकांत, झाल्यागेल्या गोष्टीबद्दल आतां वाच्यता करण्यांत अर्थ नाहीं. ती आत्महत्त्या करील अशी कोणाचीच कल्पना नव्हती. "

" पण तिला आत्महत्त्या करण्यापर्यंत पाळी आणायला लावून तूं काय मिळवलेस ! "

" मी काय मिळवले व काय मिळवले नाहीं हे मला सांगतां येत नाहीं पण माझ्या प्रेमाचा धिक्कार करून ती गेली श्रीकांत माझे तिच्यावर खरोखरच फार प्रेम होतें. "

" पाजी मनुष्या, प्रत्यक्ष तिच्या नवऱ्यासमोर बोलायला तुला शरम कशी वाटत नाही." श्रीकांत संतापून म्हणाला.

" श्रीकांत रागावूं नका. मी खरें आहे तेंच सांगतो. मी पहिल्या प्रथम जेव्हां तिला किस्मतपूरला पाहिली, तेव्हांच तिच्याबद्दल माझे मन ओढ घेऊं लागले. मला चैन पडेना, मग तिला सिनेमांत घेऊन जायची मी कल्पना काढली, त्याकरतां गुलाब व पद्माला मला सिनेमांत

घ्यावें लागले. पुढें पद्माला वश करून तिच्याकरवीं उषेच्या खोलींतील तुमची तसबीर नाहींशी करून तुमचें नांवही तिच्या कानावर पडणार नाहीं असे केलें. श्रीकांत, उषा तरी स्त्रीच होती, सतत चोवीस तास तुमची निंदा व माझी स्तुती तिच्याजवळ चालू असता दिवसांतून आठदहा तास तरी तिचा माझा निकट सहवास असतां तिचे मन चंचल होणार नाहीं हे अशक्य होते, तिच्याकडे येणारे सर्वच पत्रव्यवहार मी युक्तीनें माझ्या ताब्यात घेतल्यामुळे तिचे मन मी वळवीन अशी मला आशा वाटू लागली होती."

"नराधमा,ज्यास्त बोलू नकोस तुझ्या या पापाला देहांताशिवाय प्रायश्चित्त नाहीं आणि ते मीच देईन हे लक्षात ठेव."

शेजारच्या खोलींत धाड्दिशीं काहींतरी पडल्याचा आवाज झाल्यामुळे त्यांचे बोलणे एकदम थाबले. त्या खोलींतून पद्मा बाहेर आली ते पाहून वसंतराव म्हणाला," पद्मा, त्या खोलीत काय करीत होतीस ?आणि आवाज कसला झाला? "

"मी आपली सगीच बसले होते टेबलावरचा फोटो पडल्यामुळे तो आवाज झाला." पद्मा अगदीं घाबरलेली दिसत होती.

"बरें जा बाहेर इथे बसू नकोस."

ती बाहेर जाताच वसंतराव म्हणाला, "श्रीकांत माफ करा, माझ्या मनांतली खळबळ मी तुम्हाला सांगून टाकली आहे अखेर माझी आशा सफल न होता उषा मला फसवून गेली आहे. तुमचा सर्व पत्रव्यवहार हा साभाळा " वसंतरावानें टेबलाच्या खणातून एक मोठें पुडके बाहेर काढून ते श्रीकांतापुढे टाकले."

"निव्वळ कृष्णसर्प आहेस, आमच्या सुखात बिघाड आणून तूं काय मिळवलेस ? "

"तुमच्या सुखांत बिब्बा घालण्याची माझी इच्छाच नव्हती फक्त तिचें प्रेम मला हवें होते. आजपर्यंत इतर स्त्रियांच्या बाबतीत मी केलेले प्रयत्न कधींच फसले नाहींत पण उषेच्या बाबतींत मात्र हार खावी लागली."

" किती जणांचे तूं अशा तऱ्हेनें संसाराचें वाटोळें केलें आहेस कुणास ठाऊक !"

" इतक्या खाजगी गोष्टी मी सांगत नसतो, पण कुणाचे संसार बिघडल्याचें मात्र माझ्या कानावर आले नाहीं."

" तुमच्यासारखे लोक सिनेमामालक सिनेमांत ठेवतात तरी कसें ? "

" त्याना आमच्या खाजगी गोष्टींत पडण्याचें काय कारण ! त्यांच्या जागेंत कांहीं आगळीक झाली नाहीं म्हणजे झाले."

" तुमच्यासारख्या लोकाना लाथ मारून हाकलून दिल्याशिवाय सिनेमांत सुधारणा होणार नाहींत. तोपर्यंत स्त्रियानीं कलेकरितां म्हणून काम करायला येणे धोक्याचे आहे."

" श्रीकांत तुमचें किती अज्ञान आहे, अहो, माझ्यासारखा एखादा गेला तरी वरून फार सभ्य दिसणारे दुसरे पुष्कळ लोक सिनेमात असतातच कीं, एखादे वेळ मालकही त्यांत सामील होतो. तेव्हा त्याचे काय करणार ! पुरुषाशिवायच फिल्म काढणे झाल्यास मात्र असल्या तऱ्हेची भीति उरणार नाहीं. सिनेमात एकटे एकटे असण्याचे, प्रणयचेष्टा करण्याचे किंवा इतर तऱ्हेनें स्त्रियांचे मन आकर्षित करण्याचे इतके प्रसंग असतात कीं या सर्व दिव्यांतून सहीसलामत सुटणारी स्त्री विरळा."

" तुझ्यासारख्या माणसाशीं बोलणे म्हणजे कालाचा अपव्यय करणें आहे. मी आता दवाखान्यात जाऊन प्रेत ताब्यात घेतो.पुन्हां येईन त्यावेळीं मालकाचा या बाबतींत मला जाब घ्यायचा आहे."

यानंतर एक अक्षरही न बोलतां तीं पत्रे हातात घेऊन तो निघून गेला. तो गेलेला पाहून पद्मा वसंतरावाजवळ येऊन म्हणाली, " तुमचा ते खून नाहीं ना करणार ! त्यांनीं त्यावेळीं ते रागाचे शब्द उच्चारल्याबरोबर मी एकदम घाबरले व माझ्या हातातील तसबीर खालीं पडली."

" वेडी आहेस. माझा खून करायला त्याचा जीव थोडाच वर आला आहे आणि मी तिच्या आत्महत्त्येला कारण आहे असा तरी त्याच्या जवळ कुठे पुरावा आहे.जाऊंदे जगात असे चालायचेंच.उषा माझ्या हातावर तुरी देऊन गेली, पण तूं तर आहेस ना !"

" मग लग्न कधीं करतां !"

" लग्नाची बात इतक्यांत नको काढूंस पुढें पाहूं."

" तुमचें पुढें संपतच नाहीं, पण मी परत गेल्यावर आतां ऐकणार नाहीं. "

" अगदी जरा दमाने घे."

## श्रीकांताची मनोव्यथा २२

प्रेत परत मिळाल्यावर श्रीकांतानें त्यांचें यथोचित और्ध्वदेहिक केलें. या सर्व गोष्टी संपेपर्यंत संध्याकाळ झाली.

उद्यां प्रमिला आल्यावर तिला मी काय सांगूं? ती किती आकाश-पाताळ एक करील याची त्याला कल्पना येईना.

सबंध दिवसांत त्याच्या पोटांत अन्न नव्हतें त्यामुळें व एकंदर श्रमानें त्याला अतिशय ग्लानी आली. सर्कसच्या मालकाने त्याला बराच आग्रह करून खावयाला घातले व थोडा वेळ विश्रांती घेण्याची विनंति केली. अंथरुणावर पडल्यावर त्याला एकदम गाढ झोंप लागली, तो रात्रीं अकरा वाजतां एकदम दचकून जागा झाला त्याची दवाखान्याला लागणारी हत्याराची बॅग उघडीच पडली होती. आजच्या धादलींत आपण ती उघडी ठेवली असेल असे वाटून त्याने ती बॅग लावून टाकली व पुन्हा अंथरुणावर येऊन पडला.

पण त्याला चैन पडेना, तो फिरून उठला व बॅगमध्यें असलेला उषेचा फोटो बाहेर काढून त्याकडे तो पहात बसला. त्या फोटोंतील तिचा तो हंसरा चेहरा पाहून त्याला पुन्हां भडभडून आलें. एखाद्या लहान बालका-प्रमाणे तो रडूं लागला. डोळ्यांतून बरेच पाणी गेल्यावर तो शांत झाला. तिचा फोटो आपल्या मस्तकापाशीं धरून तो त्या फोटोला उद्देशून म्हणाला, " देवी उषे, किती मी अभागी, तूं जिवंत असतां तुझी किंमत मला कळली नाहीं. माझीं पत्रें येत नाहींत या कल्पनेनें किती कळकळीनें तूं मला सारखीं

पत्रें पाठवीत राहिलीस, पण तुझ्या पत्रांत एका शब्दानेंहि तूं मला पत्र न पाठविल्याबद्दल दोष दिला नाहींस, उलट "माझ्यापेक्षा दवाखान्यावर जास्त प्रेम करून मला विसरून जाऊं नका." म्हणून किती नाजूकपणानें तू माझी चूक नजरेला आणलीस. हीं सर्व पत्रे मिळालीं असतीं तर केवढें संकट टळले असते! माझ्या हट्टाकरतां तूं सिनेमांत गेलीस. माझ्या जीवा॰ करता तूं आपल्या शरीराची होळी करून घेतलीस. आरंभीच्या पत्रांत, इतक्या लांब गेलीस तरी दवाखान्यांतील प्रत्येक नोकराबद्दल, नर्सबद्दल, आजारी माणसाबद्दल चवकशी केलेली पाहून त्या लोकांना किती धन्यता वाटे. तुझ्या या अलौकिक प्रेमाबद्दल कित्येकाचे डोळेसुद्धा भरून येत. त्यांना आतां मी काय सांगू! हे काळे तोंड त्याना मी कसे दाखवू!

माझ्याबद्दल प्रत्येक पत्रात किती तरी माहिती विचारलेली असे. मी जेवतो किती वाजता! झोपतो केव्हा! फिरायला जातो का नाहीं! कपडे परटीला कोण देतो! बूट पॉलीश कोण करतो! नेकटाय कोण घालतो! अशा तऱ्हेचे हजारो प्रश्न प्रत्येक पत्रात असत. आता असं मला कोण विचारील! माझ्या केसाचा भाग कोण काढील! माझा नेकटाय कोण घालील! हरहर, मी आता काय करूं मला माझी लाडकी उषा कोण भेटवील! एक दिवस माझे डोके फार दुखत होते म्हणून तं ते आपल्या मांडीवर घेऊन चेपीत होतीस, तुझ्या मृदु हाताचा स्पर्श होताच माझे डोके तात्काळ थांबले पण तशीच झोप लागून गेली. माझी झोपमोड होईल म्हणून सर्व रात्रभर तूं माझे डोके मांडीवर घेऊन स्वस्थ बसली होतीस. माझ्यावरचे तुझे केवढें प्रेम! २।३ तास तुला जाग्यावरून हालतां आले नाहीं. इतकी तुझी मांडा भारावली होती. तुझ्या या फाजिल काळजी-बद्दल मी किती तरी रागावलो होतो पण तूं ती वेळ कितीतरी मनोहर हास्याने भागवून नेलीस! उषा, आता माझी अशी काळजी कोण घेईल, तुझ्याशिवाय मी कसे दिवस कढू. तुझ्या मागोमाग येण्याला काय युक्ती करावी. याचा मी सारखा विचार करीत आहे, नुसती आत्महत्या कर-ण्याचा धीर होत नाहीं. त्या नराधमाचा खून करून फांशीं जाऊं कां? मला

तोच मार्ग पसंत वाटतो बस्स ठरला निश्चय! त्या चांडाळाचा खून करून तुझ्याबद्दल सूड घेणार!

त्याची विचारमालिका येथेच थांबली कारण दारावर कोणीतरी टिचक्या मारीत असल्याचा त्याला भास झाला. बाहेर कोणी आहे असें पाहून तो म्हणाला, "कोण आहे? आत या दार उघडेंच आहे."

नखशिकांत घामाने डबडबलेली पद्मा दार उघडून आत आली. तिला पहाताच श्रीकांत नीट सावरून बसला तिची ती अवस्था पाहून तो म्हणाला, "पद्मा, या वेळीं इकडे कोणीकडे! तू घामाने अगदीं निथळतें आहेस; त्या खुर्चीवर बैस एक क्षणभर विश्रांती घेऊन मग काय सांगायचें तें सांग."

पद्मा अगदीं घाबरलेली दिसत होती. श्रीकांतानें सांगितलेल्या खुर्चीवर न बसतां ती त्याच्या पायापाशीं बसली व त्याच्या पायावर डोकें ठेवून म्हणाली "मला क्षमा करा मी चांडाळणीनें तुमचा घात केला आहे."

"पद्मा ऊठ, अगदीं घाबरूं नको, काय असेल तें नीट सांग. पहिल्या प्रथम त्या खुर्चीवर बैस बघू."

पद्मा मुकाट्यानें उठून त्या खुर्चीवर बसली. दोन्हीं हातांनीं तोंड झांकून ती ओक्साबोक्सी रडू लागली. दोन तीन मिनिटें तसेंच रडू दिल्यावर श्रीकांत म्हणाला, "पद्मा रडे बद कर व काय काय हकिगत झाली ती नीट साग बघू."

"श्रीकांत, मी आतां हे अपेशी तोंड तुम्हाला कसें दाखवू. काल सबंध रात्रींत एक मिनिटभरही मला झोंप लागली नाहीं. कालचें शंकराचार्य टेंकडीवरचें भयानक दृश्य माझ्या डोळ्यासमोर नाचत होतें. उषाताई खरी वीर रमणी होती, तिने तुम्हाला निरोप सांगितला आहे कीं "तुमची लाडकी उषा, वीराच्या मरणानें मेली," खऱ्या आर्य स्त्रीला शोभेल त्याच मार्गानें ती गेली. मरणाच्या वेळीं एकही दुःखाचा सुस्कारा तिनें टाकला नाहीं." शेवटीं श्रीकांत, श्रीकांत श्रीकांत म्हणतच तिनें कड्यावरून खालीं उडी टाकली. श्रीकांत, जगातली एक दैदीप्यमान हिरकणी नाहींशी झाली. ही सर्व आपत्ति या चांडाळणीला थांबविता आली असती पण मी त्यावेळीं

वसंतरावाच्या नजरेनें भारून गेले होतें. आतां मला पश्चात्ताप होतो आहे, पण काय उपयोग! बोटीवर सर्व निजानीज झालेली पाहून अगदीं लपत छपत व जवळ जवळ पळतच मी इथे आले आहे. कांहीं बोभाटा व्हायच्या आंत मला परत गेलें पाहिजे, तेव्हां माझ्या अपराधाची क्षमा करा म्हणजे मला थोडं तरी बरं वाटेल."

"पद्मा सर्व हकिकत नीट थोडक्यांत सांग पाहूं अगदीं वेळ गमावू नकोस. तिचा निरोप ऐकुन माझ्या अंतःकरणाची काय कालवाकालव होते आहे हे फक्त परमेश्वरच जाणू शकेल."

पद्माने थोडक्यात, उषा सिनेमांत गेल्यापासून उडी टाकीपर्यंत सर्व हकिगत सांगितली. ती ऐकत असता, दुःखवेग सहन न झाल्यामुळें श्रीकांत पुन्हां बेशुद्ध पडला. पद्मा खूपच घाबरली पण प्रसंगावधान साधून तिने त्याच्या तोंडावर पाणी शिंपडलें. लवकरच तो सावध झाला. उठून बसल्यावर रुमालानें आपलें तोंड पुशीत असता तो म्हणाला "पद्मा ही हकिकत ऐकून दुःखानें माझें मन जरी व्याप्त झाले असलें तरी सूडाची भावना मात्र अतिशय प्रज्वलित झाली आहे या जगात तो नराधम किंवा मी यापैकीं एकानेच जिवंत राहिलें पाहिजे."

"पण मला तुम्ही क्षमा केली आहे ना!

"हो, त्या हरामखोराच्या नादानें तूं फसली आहेस हें स्पष्टच दिसतें आहे, तेव्हां तुझा यांत फारसा अपराध दिसत नाहीं."

"पण त्याना जिवंत ठेवल्याशिवाय माझी क्षमा पूर्ण होत नाहीं."

"म्हणजे मी नाहीं समजलों!"

"यावेळीं लाज गुंडाळून ठेवणें प्राप्तच आहे. जरी काल्पासून वसंतरावाबद्दल माझं थोडसुद्धां प्रेम उरलं नाहीं. हा जीवहि नकोसा झाला आहे तरी माझ्या पोटीं येणाऱ्या बालकाकरतां मला आत्महत्या करतां येत नाहीं व त्याकरताच वसंतराव जिवंत हवेत. त्यांनीं माझ्याशीं लग्न लावण्याचें कबूल केलें आहे, "त्यांचे कितीहि अपराध असले तरी त्याना सन्मार्गा-वर आणण्याकरता तूं त्यांच्याशीं लग्न लाव' अशी मला उषाताईची आज्ञा आहे."

" उषेच्या उदार मनाची मला कल्पनाच करतां येत नाहीं. ज्यांनीं तिचा सत्यानाश केला, त्याच्या हिताची इच्छा ! केवढें औदार्य ! उषादेवी तुझ्या औदार्याला तोड नाहीं. पण्ण माझ्या देवीची तशी आज्ञा नसती तर तुला मी दुसरा मार्ग दाखविला असतां. उषेचें हे अलौकिक औदार्य पाहून माझी सूडाची भावना मावळली आहे पण मला आज रात्रभर विचार करूं दे, उद्या मी तुला भेटेन."

" बरें आहे मी जाते, मला अगदीं घाईनेच गेले पाहिजे नाहींतर नसता बोभाटा व्हायचा. सर्कस सुटण्याची वेळ झालीच आहे त्याच्या जमावांत मिसळून मी कशीतरी बोटहाऊसावर पोहोंचेन असे वाटते. आतां मनाला त्रास करून घेऊं नका अशी विनंति आहे. उद्या मी पुन्हां भेटेनच."

ती दार लोटून घेऊन निघून गेली, ती गेल्यावर विचाराचें साम्राज्य पुन्हा सुरू झाले गतगोष्टीचे तो पुन्हा मनन करू लागला. त्याला झोप येण्याची आशा नव्हतीच तो असा रीतीने पडला असताच दारावर पुन्हा टिचक्या वाजल्या त्या ऐकून तो चटदिशीं उठून बसला. एक अनोळखी स्त्री आंत आलेली पाहून त्याला फार आश्चर्य वाटले तो तिच्याकडे निरखून पहात म्हणाला " आपण कोण ! मी आपल्याला ओळखलं नाहीं " एका खुर्चीवर बसतां बसता ती स्त्री म्हणाली, " आपली माझी ओळख नाहीं म्हणून मीच आपली ओळख करू देते माझ नाव मिस् ल्यूसी असून मी इथल्या रशियन सर्कसमध्ये असते. काल रमेशना जो अपघात झाला त्यामुळे आम्हा सर्वांना फार काळजी उत्पन्न झाली आहे, तुम्ही डॉक्टर आहा म्हणून विचारते कीं ते त्यातून बरे होतीलना ! "

" तुम्ही रमेशच्या चवकशीकरता आला होय. "

" होय त्याचकरता केवळ इतक्या रात्रीं आले."

" मिस् ल्यूसी तुमचें सर्वांचे रमेशवरील प्रेम पाहून मला फार समाधान वाटले. आज सकाळनंतर मला तिकडे जायला वेळच झाला नाहीं तरीपण सकाळच्या लक्षणावरून तो लवकर बरा होईल असे वाटते."

" तुमच्या आश्वासनानें मला फार आनंद झाला. मी व ते नेहमींच

एके ठिकाणीं कामें करीत असल्यामुळें माझें व त्यांचे विशेष सख्य आहे. त्याच्याइतका उत्तम स्वभावाचा मनुष्य मी अद्याप कधीं पाहिला नाहीं."

"तुमचे त्याच्यावर प्रेम आहे का!"

"किती आहे म्हणून सागू पण काय उपयोग!"

"का!" श्रीकाताने प्रश्न केला.

"त्याचे माझ्यावर उलट नाहीं."

"अरेरे फारच वाईट गोष्ट आहे. पण तुम्ही शहाण्या असाल तर इतके त्याच्यावर प्रेम करूं नका."

"का" तिनें आश्चर्यानें विचारलें.

"कारण स्त्रियांनीं कितीहि प्रेम केले तरी त्यांना हवा इतका मोबदला पुरुषाकडून मिळत नाहीं. आतां माझीच गोष्ट घ्याना. माझ्या उषेचें माझ्यावर प्राणापेक्षाही जास्त प्रेम होतें पण मला उलट तितकें करतां आले नाहीं त्यामुळें असावी तशी ती आनंदी नव्हती आता शेवट काय झाला तो श्रीनगरांत सर्वांना माहीतच आहे!"

"हो; तो फारच भयंकर व दुःखाची गोष्ट घडली आहे. आता मी जरी थोडी चैनी आहे तरी त्याच्यावर माझें फार प्रेम आहे. ते लवकर बरे केव्हा होतील असे मला झाले आहे. हो, मुख्य गोष्ट सांगायची राहिलीच. आज दुपारीं मी जेव्हा त्याच्या समाचाराला गेले होते त्यावेळीं त्यांनीं सारखा तुमचा व उषाताईचा घोषा घेतला होता, पण घरातील मंडळींनीं खरी हकीकत त्याना सागितली नाहीं. शेवटीं सध्याकाळीं मुलाच्या तोंडून उषाताईच्या अपघाताची हकीकत त्याना अचानक कळली त्यामुळें त्या धक्क्याने ते एकदम बेशुद्ध पडले आहेत ते आता शुद्धीवर आले आहेत का नाहींत हेच विचारण्याकरता सर्कस संपल्याबरोबर मी इकडे आले होते."

"काय रमेश पुन्हां बेशुद्ध पडला! त्याला उषेची हकीकत कळली! अरेरे, फारच वाईट गोष्ट झाली; मी उद्यां सकाळींच तिकडे जाईन म्हणत होतो. पण आतां लगेच मला गेलेच पाहिजे पण त्यांनीं मला बोलावणें कसें पाठविलें नाहीं!"

" पहिल्यांदा त्यांचा विचार होता पण तुमच्यावरील संकट व तुम्हाला होणारी दगदग जाणून त्यांनीं तुम्हाला बोलावण्याचा बेत रहित केला."

" पण हे त्यांनीं बरोबर केलें नाहीं मी आतां हा जातोच."

" आतां उद्यां सकाळींच जा कीं "

" नाहीं मला आतां गेलेच पाहिजे."

" मी येऊ कां बरोबर म्हणजे मला तरी त्यांची प्रकृति पहायला सांपडेल."

" तुम्ही मात्र बरोबर नको आतां बारा वाजून गेले आहेत अशा वेळीं एका परक्या स्त्रीनें पुरुषाबरोबर जाणे इष्ट नाहीं हें तुम्हीहि कबूल कराल उद्यां सकाळीं उठल्याबरोबर मी सर्व हकीकत तुम्हाला सांगेन."

" बरें आहे नीट जपून जा बिंदुमाधवाचा बंगला येथून फार लांब आहे. वाटेंत पोलिसांचाहि त्रास असतो. "

" ठीक आहे मी शक्यतो काळजी घेतोच. "

" बरं पण उद्यां रमेशची बहीण यायची आहे ना ?"

" हो, कां !"

" मला त्यांची भेट घ्यायची आहे. "

" कशाकरतां ! "

" त्या स्वभावानें फारच चांगल्या आहेत म्हणे व त्यांचा रमेशना धाकही पुष्कळ आहे, तेव्हां त्यांच्याजवळ मला हट्ट घ्यायचा आहे आणि त्या माझा हट्ट माझे प्रेम पाहून पुरवतील अशी मला आशा आहे. "

श्रीकांतला ल्यूसीच्या एकंदर विचाराचें कौतुक वाटलें तिची आपण आतांच निराशा कशाला करा. त्याचेंहि हिच्यावर प्रेम असले तर प्रमिला या बाबतींत पाहून घेईल असा विचार करून तो म्हणाला, "तुम्ही जरूर प्रयत्न करा तिच्या अंगात खरोखरच तशी धमक आहे."

" तुमच्या या बातमीने मला फार आनंद झाला आपली मी फार आभारी आहे उद्या सकाळीं मी येतेंच."

" एक मिनिट थांबता कां ? " कांहीं आठवण होऊन श्रीकांत म्हणाला.

" हो थांबते, काय हवं ? "

" रमेशच्या अपघाताची हकीकत मला नुसती उडत उडतच कळली आहे तेव्हां ती थोडक्यांत सांगाल कां ! तुमच्याइतकी खरी खरी प्रत्यक्ष घडलेली हकीकत दुसरे कोणी सांगेलसे वाटत नाहीं.'

श्रीकांतानें केलेल्या स्तुतीनें तिला फार बरें वाटलें ती खुर्चीवरून उठलेली पुन्हां बसली व तिनें काल सर्व दिवस रमेशचें मन कसें व्यग्र होतें, आपण त्याला हसविण्याचा किती प्रयत्न केला तरी तो कसा हसला नाहीं, उलट रागावला मात्र खूप वगैरे हकीकत अगदीं मनापासून सांगितली शेवटीं ती म्हणाली, " रमेश सर्कसमधें आल्यापासून त्याचा हा पहिलाच अपघात आहे त्यानें कामात आजपर्यंत कधींहि कुचराई केली नाहीं किंवा कोणाचें मन दुखावलें नाहीं. त्याच्याबरोबर काम करण्यात आम्हाला जो आनद वाटतो तो इतर कोणत्याहि गोष्टीनें होत नाहीं. त्याच्या मनाला कांहींतरी जबरदस्त यातना झाल्या असल्या पाहिजेत त्याशिवाय तो कामांत चुकणार नाहीं."

हकिकत संपल्यावर श्रीकांतानें तिचे आभार मानले व ती उल्हसित वृत्तीने बाहेर पडली. श्रीकांतही बाहेर जाण्याची तयारी करूं लागला.

श्रीकांत रमेशच्या बिऱ्हाडातून निघाला त्यावेळीं १२ वाजून गेले होते. तो वाटेत कोठें भटकला कोणास ठाऊक पण तो दोनच्या सुमाराला पंडीत बिंदुमाधवाच्या घरीं आला.

इतकी रात्र होती तरी त्या बंगल्यात माणसांची हालचाल दिसत होती. श्रीकांत मुकाट्यानें रमेशच्या खोलीपर्यंत गेला. त्याने हळूच आत डोकावून पाहिलें तेव्हां त्याला दिसलें कीं मीना त्याच्या डोक्यावर कसली तरी पट्टी ठेवीत आहे. त्या खोलींत तिच्याशिवाय कोणीही नव्हते. एका काश्मिरी मुलीची त्याच्यावरील निस्सीम आस्था पाहून त्याला फार आश्चर्य वाटले.

श्रीकांत आत आलेला पाहून मीना तेथून उठली. रमेशला झोप लागली होती. त्यामुळें मीनाने श्रीकांताला बाहेरच्या खोलींत बोलावले. व त्याप्रमाणें तोही बाहेर आला. अगदीं हलक्या आवाजात ती म्हणाली, " आज संध्याकाळीं आमच्या मुलांनीं घोटाळा केला त्यामुळे त्यांना सर्व हकिगत सांगावी लागली. त्या धक्यानें ते बेशुद्ध झाले, पण लवकरच ते शुद्धीवर आले. मन शांत ठेवण्याची त्याची कमाल आहे, पुन्हां शुद्धीवर आल्यावर ते म्हणाले " झालें ते होऊन गेलें पण मला श्रीकांताना भेटायचे आहे त्याच्याकडून मला सर्व खरी हकीगत कळेल, तेव्हां त्यांना बोलावणें पाठवा. "

" मग मला लगेच कां बरे बोलावणे पाठवलें नाहींत? " श्रीकांत दुःखाने म्हणाला.

" तुम्ही त्यावेळीं कोणत्या स्थितींत असाल याची त्यांना जाणीव दिल्याबरोबर ती त्यांनाही पटली व तुम्हाला सकाळीं लवकर बोलवा असें सांगून ते झोपी गेले "

" त्याला ताप वगैरे कांहीं आहे का ! "

" थोडासा आहे पण भिण्याचें कारण नाहीं असे आमचे डॉक्टर म्हणतात, पण भेटावयास येणाऱ्या मंडळींमुळे त्यांना बराच त्रास होतो तरी शक्य असल्यास उद्याच्याउद्या यांना येथून हलवून पेहेलगावाला हवाशीर प्रदेशात न्या असे त्यांचे म्हणणे पडले. तुम्ही उद्यां त्यांना पाहिल्यावर काय तें ठरवा."

" डॉक्टरांचे म्हणणं बरोबर आहे; त्याच्या मेंदूला पूर्ण विश्रांतीची जरूरी आहे तरी त्याला उद्याच्याउद्या हलवायला माझी हरकत नाहीं. पेहेलगाव येथून ६० मैल लांब आहे नाहीं ! "

" हो, ६० मैल आहे पण निम्या वाटेवर 'मटनमार्तंड' म्हणून चांगलं गाव आहे तेथ २।३ तास विश्रांती घेऊन पुढें जावे असे मी म्हणणार आहे "

" तुमची सूचना फार चांगली आहे. त्याला वाटेत अवश्य एक मुक्काम करूं द्या. उद्यां त्याची बहीण इथें येणारच आहे तेव्हां तिलाही उद्यां विचारून काय ते ठरवूं. "

" हो, बहिणीबद्दल आज संध्याकाळीं ते कांहींतरी म्हणत होते. त्यांच्या बहिणीचें नांव प्रमिलाताई ना ! "

" हो; बरें पण तुम्ही आंत जाऊन झोपा पाहूं. मी आतां उजाडेपर्यंत बसून रहातो. "

" मी दुपारीं पुष्कळ झोंप घेतली आहे तेव्हा मला आता ती येणार नाहीं. तुम्हालाच आज फार दगदग व मनाला फार त्रास झाला आहे तरी तुम्हीच जाऊन विश्रांती घ्या."

" मीनाबाई, किती आस्थेने तुम्ही रमेशची शुश्रूषा करतां आहात हें मी पहातो आहे आणि उद्यां हें प्रमिलाताईला कळल्यावर तिला तुमच्याबद्दल किती आदर उत्पन्न होईल ! किती उपकार वाटतील, याचें वर्णन

करून मला सांगता येत नाहीं. तुम्हीच त्याला पुनर्जन्म दिला आहे. ईश्वर तुमचें कल्याण करील."

"माझ्याबद्दल एक अक्षरही न बोलण्याची मी विनंती करीत आहे, मी जें कांहीं केलें आहे व करीत आहे तें केवळ कर्तव्य म्हणून केले आहे, करणार आहे तेव्हां कोणी उपकाराचा प्रश्न काढल्यास मला वाईट वाटेल."

"बरें नाहीं बोलत. पण आज तुम्ही विश्रांती घ्याच. मला आतां झोप येणे शक्य नाहीं. शिवाय इतका झोपेचा ताण तुम्हाला सहन होणार नाहीं. असें माझे मत आहे, तेव्हां हे डॉक्टरांचें म्हणणे तुम्हाला ऐकणें प्राप्तच आहे."

"अशा रीतीने अडविल्यावर माझा नाइलाज आहे" मीना थोडेसें हंसून म्हणाली "पण मला झोप येणार नाहीं तुमच्या म्हणण्याप्रमाणे मी शेजारच्या खोलींत झोपते पण जरूर लागल्यास हांक मारावी."

"ठीक आहे"

मीना गेल्यावर श्रीकांत रमेशच्या बिछान्यापाशीं जाऊन बसला. याचा श्वास शांतपणे चालला होता. नाडीचे ठोके पाहिल्यावर त्याच्या चेहऱ्यावर समाधान दिसू लागले. जखमेत पू झाला नाहीं तर भीतीचें फारसें कारण उरणार नाहीं अशी त्याची खात्री झाली.

पहाटे पाच वाजेपर्यंत रमेश झोपेंत होता. व इकडे श्रीकांत उषेचे गुण आठवून अश्रू गाळीत बसला होता. एकांत मिळाल्यामुळे त्याला जास्तच भडभडून येई. एखाद्या लहान मुलीप्रमाणें तो रडत होता. पण त्याचें शांतवन कोण करणार!

श्रीकांत आपल्याच दुःखांत चूर असल्यामुळे रमेश जागा झालेला त्याला कळले नाहीं. पूर्ण जागा झाल्यावर श्रीकांताला जवळ पहातांच त्यानें हांक मारली, "श्रीकांत, उषाताईला कसें सोडून आलांत हो.?"

त्याचा आवाज ऐकुन मीना गडबडीने उठून आंत आली. श्रीकांतही दचकून त्याच्याकडे पाहूं लागला. रमेशच्या प्रश्नाला उत्तर देण्यासारखें नव्हतेंच. त्याच्या प्रश्नानें इतका वेळ दाबून धरलेलें रडें मात्र जोरानें उसळून बाहेर आले. तो तेथून उठला व खिडकीशीं जाऊन उभा राहिला.

मीना जवळ आलीच होती तिनें त्याचे पांघरून नीट सावरून घातलें व ती म्हणाली, " बोलायला डॉक्टरांची परवानगी नाहीं याची आठवण आहे ना ! "

" मीनाताई मला आठवण आहे पण रहावत नाहीं हो. तुम्ही आमची उषाताई पाहिली नाहींत. काय सांगूं तिचे गुण ! तिच्या गुणाला मोल नव्हते. तिच्यासारखी स्त्री तीच, तिची सर जगांत कुणाला येईल असें वाटत नाहीं. संबंध आयुष्यांत तिने कुणाला दुखवलें असेल असें वाटत नाहीं. काय करूं, माझ्या अपघातानें घात केला नाहीं तर मी तिला वाचवूं शकलो असतो. आतां शेवटचें दर्शन सुद्धा या हतभाग्याला मिळालें नाहीं किती मी दुर्दैवी !"

" रमेश, माझी शपथ आहे तुम्हाला. फार बोलू नका तुमच्या बोलण्यानें श्रीकांताना त्रास नाहीं का होणार ?"

तिचे बोलणें त्यानें ऐकले कां नाहीं कोणास ठाऊक तो पुढें म्हणाला, "काल सकाळीं त्या पाजी वसंतरावाबरोबर मी तिला जाऊं दिली नसती तर कदाचित् हा अपघात टळला असतां. आज एक दिव्यरत्न हरपले. "

- आपलें दुःख आवरून श्रीकांत रमेशजवळ येऊन म्हणाला,

" रमेश, मीनाताईनीं आतां बोलू नको म्हणून सांगितलें ना ! मग का बरं बोलतोस अगदीं स्वस्थ पडून रहा. "

" मी बोलत नाहीं पण मला एकदां सर्व हकीकत सांगा."

" श्रीकांतानें पद्माकडून ऐकलेली व वसंतरावानें सांगितलेली सर्व हकीकत निवेदन केली. तो बोलत असतां त्याच्या व त्याच्याबरोबर रमेशच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह वहात होते. मीनाला थोडथोडें मराठी कळत असल्यामुळे तिचे डोळे अश्रूनी भरून आले.

सर्व हकिगत ऐकल्यावर रमेश एकदम आवेशानें म्हणाला, " या सर्व दुःखाला कारण होणारा तो चांडाळ अजून जिवंत कसा राहिला आहे कुणास ठाऊक ! त्याचा...... "

त्याला बोलतांना थांबवून मीना म्हणाली, "आतां एक अक्षर बोललात तर मी श्रीकांताना बाहेर जायला सांगेन."

"बरे नाहीं बोलत पण श्रीकांतांना इथें असू द्या, त्यांना इथून सोडू नका. त्यांचें मन ठिकाणावर नाहीं एखादे वेळीं कांहीं तरी भलतेंच करून बसतील."

"नाहीं जाऊं देत मग तर झाले पण आता बोलूं नका."

"आतां एक अक्षरही बोलत नाहीं"

पण श्रीकांताला तेथून जाणे लवकरच भाग पडले कारण सकाळीं ७ च्या सुमाराला बोटहाऊस मधील एक इसम घाबऱ्या घाबऱ्या तेथें आला व त्यानें श्रीकांताला बाजूला नेऊन कांहीं तरी सांगितल. श्रीकांत बेभान झाला तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, "वसंतराव मेला! वसंतरावाचा खून झाला! किती आनंदाची गोष्ट झाली! उषे, लाडके, जगातला एक दुष्मन् नाहींसा झाला ही आनंदाची बातमी तुला सांगायला आलोच."

"श्रीकांत केवढ्यानें बोलतां आहांत" मीना घाबरून म्हणाली, "तुमच्यासमोर आजारी मनुष्य आहे हें विसरलांत वाटते!"

"श्रीकांत काय म्हणालात?" रमेशने भीतिने प्रश्न केला.

"मीनाताई माफ करा, मला भान राहिले नाहीं. रमेश, मला बोट-हाऊसवरचें बोलावणें आलें आहे. वसंतरावाला मृत्यु आला आहे असें कळलें आहे. तेव्हा जास्त चवकशी करून येतो."

"जा, पण तुमच्या अंगाशीं येईल असं कांहीं बोलूं नका नाहींतर दुसरी कांहींतरी भानगड उपस्थित व्हायची?"

श्रीकांत तेथून गेल्यावर रमेश मीनाला म्हणाला "मीनाताई मला पंडीत बिंदुमाधवांची गांठ घ्यायची आहे आणि तीही ताबडतोब, कारण वसंतरावाचा खून झालेला दिसतो आणि हें खूनप्रकरण श्रीकांताच्या अंगलट येईल अशी मला भीति वाटते. मी अशावेळीं येथें खितपत पडलो आहे ही किती दुर्दैवाची गोष्ट आहे."

" बाबासाहेबांना मी लवकर बोलावून आणते पण तुम्ही स्वस्थ पडा, उगीच मनाला त्रास करून घेऊ नका."

रमेशने अदमास केला त्याचप्रमाणें झालें. वसंतरावाचा खून झाला होता व त्याबाबत चौकशी करण्याकरतांच पोलिसाकडून तो मनुष्य श्रीकांताच्या-कडे पाठविण्यांत आला होता. श्रीकांतानें ते प्रेत पहातांच त्याला उषेची आठवण झाली. उषेच्या मृत्यूला कारण होणारा इसम आपल्यासमोर पडला आहे हें पाहून तो जवळजवळ वेड्यासारखाच झाला. एकदम मोठ्यानें हंसून तो म्हणाला " माझ्या लाडकीचा खून करणारा नरकांत गेला. किती आनंदाची गोष्ट आहे ! "

त्याची बडबड थांबवून पोलीस अधिकारी म्हणाला, " श्रीकांत, वसंतरावाचा खून झाला आहे व ज्या हत्याराने तो केला तो चाकू आम्हांला सापडला आहे हा तुमच्या ओळखीचा आहे का नीट पहा. "

तो चाकू श्रीकांताच्या हातात देण्यांत आला. तो चाकू पाहून तो एकदम चपापला, तो त्याचा चाकू होता. तो पुन्हां परत देऊन तो शांतपणाने म्हणाला " हा चाकू माझा आहे त्यावर माझें नावही आहे, पण तो इथे कसा आला तें माहीत नाहीं. "

" तुम्ही काल रात्रीं १२ च्या नंतर गावात भटकत होता कां ! येथील चौकीवरचा पोलीस सांगतो आहे कीं तुम्ही या बाजूला आला होता व तुम्हाला हटकल्यावर तुम्ही आपले नांव सांगितले व ते नांव गेटावर नोंदले गेलं आहे. "

" ही गोष्ट खरी आहे. मन स्वस्थ नसल्यामुळे तिकडे बिंदुमाधवाच्या घरीं पेशंटला बघायला जायच्या ऐवजीं चुकून मी इकडे आलो होतो. "

"मिस्टर, अशी लबाडी पचणार नाहीं, तुम्हीच खून केलात अशी आमची खात्री आहे. काल तुम्ही मयताचा खून करणाची धमकी दिली होती असें तुमच्या संवादाच्या वेळीं हजर असणारी पद्मा नांवाची स्त्री साक्ष देते आहे तेव्हां उगीच आढेवेढे घेण्यांत अर्थ नाहीं, चटदिशीं कबूल होऊन आमचा व तुमचा त्रास चुकवा. बोला आहे कबूल. "

घर सोडल्यापासून सतत चार दिवस जागरण, मोटारच्या प्रवासाची

दगदग, येथें आल्याबरोबर रमेशचा अपघात, त्याकरतां रात्रभर जागरण, दुसऱ्या दिवशीं उषेच्या मृत्यूचा भयंकर धक्का, पुन्हां दुसऱ्या रात्रीं संबंध जागरण व सकाळीं वसतरावाच्या खुनाचा दुसरा धक्का अशा गोष्टी एकामागून एक होत गेल्यामुळें त्याच्या मेंदूला कल्पनातीत ताण पडला त्याला त्या पोलिस अधिकाऱ्याचें भाषण कळेनासें झालें; तो मोठ्याने हसून म्हणाला, " खून झाला फार छान झालें. माझ्या लाडकीबद्दल सूड उगवला. "

त्या पोलिसाच्या दोन्ही तिन्ही प्रश्नाला त्यानें हेच उत्तर दिले तेव्हां नाइलाजानें तो त्याला घेऊन पोलिस चौकीवर गेला व तें प्रेत पुढील तपासणीसाठीं त्याने दवाखान्यात पाठविले.

श्रीकांत घरातून गेल्यावर रमेश बिंदुमाधवाची मोठ्या उत्सुकतेने वाट पहात होता. जरा वेळानें मीना त्यांना घेऊन आली. त्याच्या प्रकृतीबद्दल चवकशी केल्यावर ते म्हणाले, " इतक्या झपाट्यांन प्रकृतींत सुधारणा होईल असे मला वाटले नव्हतें. आतां तुमची प्रकृति पाहून आनंद झाला."

" तुमच्या मीनाचे उपकार आहेत त्यांनीं माझ्याकरता फार तसदी घेतली. रात्र दिवस काहीं एक पाहिले नाहीं. माझें औषधपाणी इतकें वेळेवर मिळत गेले कीं प्रकृतींत दोष रहाणे अशक्य झालें. "

" ती आहेच तशी गुणी मुलगी पण तें जाऊ द्या, कशाकरतां बोलावणें पाठवलेंत ? "

" मी इथें पडून राहिल्यापासून आपल्याला फारच तसदी पडत आहे तेव्हा आणखी तसदी देणें जीवावर आले आहे पण नाइलाज आहे. आम्ही येथे परक्या देशात असल्यामुळे आपल्याशिवाय आम्हाला आधार नाहीं. "

" तसदीबद्दल कांहींहि मनांत आणूं नका. आमचें तें कर्तव्यच आहे. आतां आणखी काय काम आहे ते बोला पाहूं. "

" आपल्या बोलण्याने मला पुष्कळ धीर आला. माझ्याकडे परवां आलेले पाहुणे डॉ. श्रीकांत आपल्याला माहित असतीलच. "

" हो त्यांची माझी एकदां मुलाखत झाली आहे. स्वभावाने फारच उत्तम मनुष्य दिसतो. बिचाऱ्याची बायको काल मेल्याचें कळलें. फारच

वाईट गोष्ट झाली, पण हा अपघात कसा झाला याचा कांहीं पत्ता लागला कां ?"

"तो अपघात नसून तिची ती आत्महत्या होती आणि ज्याच्या अनुदार वृत्तीमुळे तिने आत्महत्या केली त्या नटाचा काल रात्रीं खून झाला आहे."

"काय खून ! हें प्रकरण बरेंच चिघळत चाललेलें दिसतें."

"असें झाले आहे खरे. या बाबतींत डॉ. श्रीकांताच्यावर संशय येणेंही सहाजिक गोष्ट आहे."

"तुमचा अदमास बरोबर आहे पण ते असली गोष्ट करतील हें शक्य दिसत नाहीं."

"नुसत्या वाटण्याचा काय उपयोग ! ते खुनाच्या जागीं जाऊन बराच वेळ झाला तरी अद्याप परत येत नाहींत त्यावरून त्याच्यावर कांहींतरी संकट आलेलें दिसतें."

"मग मी काय करावें अशी तुमची इच्छा आहे."

"आपल्याप्रमाणे माझीही खात्री आहे कीं श्रीकांतांनीं खून केला नाहीं. आणि हेंच सिद्ध करण्याला आपली मदत हवी."

"कशा तऱ्हेनें हवी ते बोला."

"ते अद्याप पोलिसाच्या ताब्यांत गेले नसावेत असे वाटते. पण दुर्दैवानें ते ताब्यांत गेले असल्यास त्यांना पोलिसाकडून कांहीएक त्रास होणार नाहीं अशी व्यवस्था करणें येवढ्याचबद्दल मी विनती करीत आहे, मी असा येथें पडलो आहे त्यामुळें त्यांना मदत करण्यास आपल्याशिवाय कोणी नाहीं."

"मी शक्य ती मदत करीन. त्यांना पोलिसाकडून कोठल्याही तऱ्हेचा त्रास होणार नाहीं याबद्दलची हमी घेतो. मात्र कायद्याविरूद्ध मला कांहींहि करता येणार नाहीं."

"आपला मी अत्यत आभारी आहे. आपल्याला त्रास होईल अशी कोणतीच गोष्ट आमच्याकडून होणार नाहीं."

"आपली बहीण आज येणार आहे असें तिला मीना म्हणत होती."

" हो खरी गोष्ट आहे. आपल्याला तसदी देण्याचें जीवावर आलें आहे पण आम्ही अशा स्थितींत अडकून पडलो आहोत कीं आपली मदत घेतल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. "

" तुम्ही मदतीबद्दल अगदीं संकोच बाळगू नका. आपले घर समजून मोकळ्या मनानें काय हवें नको असेल ते मागा, मलाही तुमच्याबद्दल आपलेपणा वाटतो म्हणूनच मीं मीनाला येथें कायमची ठेवून दिली आहे, तिलाही तुमच्याबद्दल काय वाटते हे तुम्ही जाणतांच. "

" अगदीं पूर्णपणें जाणतो. आणि या बाबतींत आभार मानण्याचे मी सोडून दिले आहे. "

" फार उत्तम गोष्ट केलीत. बरें पण तुमची बहीण केव्हा येणार आहे तिला हा पत्ता माहीत आहे का ? "

' नाहीं, ती रशियन सर्कसची चौकशी करीत येईल. "

" बरें आहे. मी आपली मोटार सर्कसपाशीं उभी करण्यास सांगतो म्हणजे ती तेथें आल्याबरोबर आमच्या मोटारींतून इकडे येईल. "

" सर्कसमध्यें याबद्दल मी सांगून ठेवलेच आहे पण तुमच्या मोटारीनें विशेष सोय होईल. "

" ठीक आहे मी आतां जातो. श्रीकांताची चवकशी करायला एक मनुष्य पाठवून मोटारही सर्कसच्या तंबूकडे पाठवितो. "

" या योजनेमुळें मी निश्चिंत झालो आहे. "

पंडीत बिंदुमाधव गेल्यावर रमेश मीनाला म्हणाला, " किती थोर मनाचे गृहस्थ आहेत ! मोठेपणाचा त्यांना थोडासुद्धां अभिमान नाहीं. "

" त्यांच्या उदार धोरणामुळें तर मला आपली सेवा करतां आली, नाहींतर काश्मीरी मुलीचा चेहराही तुम्हाला दिसला नसता. "

" येथील स्त्रियांबद्दल तुम्ही कांहींतरी भलतीच कल्पना करून देतां आहा, मात्र बन्नूसारखें एखादें शहर असते तर ती गोष्ट मी कबूल केली असती; बन्नूला असणारी मुलगी पूर्णेंदू पंजाबी नसून काश्मिरी आहे असें मला नुकतेंच कळलें आहे. तिचा चेहरा जरी मला पहातां आला नाहीं तरी मी तिला ओळखू शकेन असें मला वाटतें. "

" हा तुमचा भ्रम आहे. पूर्णेंदुला मी तुमच्यापुढें आणून उभी केली तरी तुम्ही ओळखूं शकणार नाहीं अशी माझी खात्री आहे हवी असल्यास तिला मी घेऊन येतें ती माझ्या चांगली ओळखीची आहे. "

" श्रीकांताची सुटका झाल्यावर आपण हा वाद करूं आणि माझी खात्री आहे कीं ही पैज मी खास जिंकेन. "

" बरे पाहूं या घोडामैदान जवळच आहे. हरलात तर मात्र मला फजितीची लेखी कबूली दिली पाहिजे."

" अगदीं बेलाशक. "

" पुरे झाला हा वाद, औषधाची वेळ झाली आहे मी डोस तयार करून आणते. "

ती गेलेली पाहून रमेश डोळे मिटून विचार करीत पडला.

## खुनाची चवकशी ! २४

जसजसा वेळ जात चालला तसतशी रमेशला श्रीकांताबद्दल ज्यास्त काळजी वाटूं लागली. ज्याअर्थी तो अद्याप परत आला नाहीं त्याअर्थी कांहींतरी घोटाळा खास आहे असे त्याला वाटूं लागलें. इतक्यांत प्रमिलाताई आल्याची त्याला वर्दी लागली.

उषेबद्दलची हकिगत ताईला आतां कशा मार्गानें कळवावी हीच त्याला काळजी पडली. तूं इथें हजर असता उषेनें आत्महत्त्या कशी केली असा जर तिनें प्रश्न केला तर त्याला काय उत्तर द्यावें हाच विचार त्याच्या मनांत पुन: पुनः येत होता. आपलें अपेशी तोंड तिला दाखवूंच नये असें त्याच्या मनानें घेतलें व त्याप्रमाणें तो तोंड झाकून स्वस्थ पडला. त्याच्या मनाची ही चलबिचल कशामुळे होतें आहे हें चाणाक्ष मीनाच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं.

चट्टदिशीं बाहेर येऊन तिनें प्रमिलेचें स्वागत केलें. रमेशला झोंप लागली आहे. तेव्हा त्याला स्वस्थ पडूं द्या असें तिनें नम्रतेने सुचविलें. सर्कसच्या तबूजवळच तिला रमेशच्या अपघाताची बातमी लागली होती. त्याची प्रकृति सुधारत आहे आतां झोंप लागली आहे वगैरेची माहिती मिळाल्यावर तिला बरेंच समाधान वाटलें.

ताबडतोब रमेशच्या खोलींत न जातां ती प्रवासांतील कपडे बदलणें वगैरेच्या उद्योगाला लागली. तिला काय हवे नको हें पहायला मीना सारखी बरोबर होतीच.

" तुमचें नांव काय म्हटलेंत ! चहा पिता पिता प्रमिलेनें इंग्रजींत प्रश्न केला.

" माझें नाव मीना. "

" मीना ! नाव फार गोड आहे. पूर्णेंदू नांवाची एक रमेशच्या माहि-तीची मुलगी आहे ती तुमच्या परिचयाची आहे कां ! "

" हो ती सध्या इथेंच आहे तिनें बन्नु गांव बहुतेक सोडल्यासारखेंच आहे ती पंजाबी मुलगी नसून काश्मिरी आहे. "

" असें कां ! तिला मला जरूर भेटवा. तिचे एकदां मागे एक पत्र आलें होतें. "

" हो तिनें असे सांगितलें होते खरें. तिची तिकडे त्या प्रांतांत जाण्याची फार इच्छा होती पण वडिलांना सवड नसल्यामुळे तिला स्वस्थ बसावें लागलें. आतां ती तिकडे जाणार आहे. "

" आमच्याबरोबरच चल म्हणावे. बरें तुम्ही काय करता ! "

" सध्या मी इथें कॉलेजांत आहे. "

" असें. बरें रमेशला अपघात कशानें झाला हो ! एवढें महत्त्वाचें काय कारण घडलें ! तो आपल्या कामांत कधींही हयगय न करणारा आहे मग हें असें का झालें ! "

" त्या दिवशीं सकाळीं त्यांना उषाताई भेटल्या, त्यामुळें त्यांच्या मना-वर परिणाम होऊन असे झाले असे ते म्हणताना मी ऐकले आहे. "

" काय उषा इथें श्रीनगरांत ! नवलच आहे आणि मला कसें कळलें नाहीं. आणि श्रीकांत इथें आले आहेत ना ! मग ते कुठें गेले आहेत !"

" ती हकीगत मोठी हृदयद्रावक आहे, मला त्याबद्दल उच्चार सुद्धां करायची भीति वाटते. "

" कसली हकीगत ! बोला लवकर उषा श्रीकांत खुशाल आहेत ना ! बोलत कां नाहीं ! लवकर सांगाना मी अगदीं घाबरून गेले आहे असलीच बातमी ऐकायला कां मी इथें आलें ! "

" प्रमिलाताई, हकीगत ऐकायला तुम्हाला मन घट्ट केलें पाहिजे तुमच

भाऊ आजारी आहे हे जाणून त्याला काही त्रास होणार नाही याबद्दलची जबाबदारी तुमच्यावर आहे."

" मीनाताई तुमचें सर्व म्हणणे मला कबूल आहे पण एकदा सर्व हकीगत सांगा. मला आता धीर निघत नाही."

" उषाताईंनी आत्महत्या केली आहे."

" काय ?" प्रमिला एकदम उठून उभी राहिली.

तिला खाली बसवून मीना म्हणाली " ताई स्वस्थ बसून रहा, मी सर्व हकीगत सांगते."

हळुहळू सर्व हकीगत मीनेने प्रमिलेला सांगितली. दोघींच्याही डोळयातून अश्रूंचा पूर वहात होता. सर्व हकीगत ऐकल्यावर प्रमिलेनें कपाळावर हात मारून घेतला. बराच वेळपर्यंत ती डोळे मिटून स्वस्थ राहिली होती, नंतर एकदम म्हणाली " श्रीकांत कुठें आहेत ! तिला टाकून ते जिवंत कसे राहिले हा प्रश्न त्यांना मला विचारायचा आहे ! ते इथे हजर असताना उषा, आत्महत्या करते ! मला ते खरें नाहीं वाटत कुठें आहेत श्रीकांत ! मला त्याना आताच्या आता भेटवा क्रूर निर्दय !" प्रमिला रागानें अगदीं लाल झाली होती.

" प्रमिलाताई शांत व्हा. कांहींही गडबड न करण्याबद्दल मी पहिल्या प्रथमच विनती केली होती. ज्या इसमामुळें उषाताईंना मृत्यु आला त्या इसमाचा काल कुणी खून केला आहे, आणि त्याकरताच श्रीकांत तिकडे गेले आहेत."

" काय, तो खून श्रीकांतानीं केला !"

" ते काही नक्की सांगता येत नाही पण त्यानीं स्वतः खून केल्याचा कबुलीजबाब पोलिसाना लिहून दिला आहे असें आताच बाबासाहेब म्हणत होते."

" काय श्रीकांतानीं आणि खून, अशक्य, अगदीं अशक्य गोष्ट आहे."

" रमेशही हेच म्हणत होते पण त्यानीं तर स्वतः कबुलीजबाब लिहून दिला आहे मग कोणतें खरें आहे ?"

" आमचेंच खरें आहे याबद्दल शंकाच नको, मला त्यांची गांठ घेतां येईल कां ? "

" बाबासाहेबांनीं या बाबतींत सर्व तऱ्हेची मदत करण्याचें रमेशना कबूल केलें आहे, तेव्हां त्यांना मी विचारून पहाते, तोपर्यंत तुम्ही रमेशना भेटून घ्या ते जागेच आहेत. तुमच्या मनाची तयारी करण्याकरतां ते झोपले आहेत असें खोटं सांगितलें याबद्दल क्षमा करा. चला माझ्या-बरोबर आंत मी त्यांची गांठ घालून देते. "

प्रमिला मुकाट्यानें उठून आंत गेली.

तोंडावरचा रमेशचा हात बाजूला करीत ती म्हणाली " रमेश डोळे उघडा. हे पाहिलेत का कोण आलें आहे तें. "

दोघांची दृष्टादृष्ट होतांच दोघानाही भडभडून आले. दोघांच्याही डोळ्यां-तून अश्रुप्रवाह वाहू लागले, रमेशनें गद्गद् स्वरानें हाक मारली. " ताई "

" काय रमेश ! " पलंगाजवळच्या खुर्चीवर बसून व त्याचा हात हातात घेऊन ती म्हणाली.

" ताई, तुझा रमेश अगदीं नालायक आहे तो येथें या गावीं जिवत असता उषाताईला आत्महत्या करावी लागली किती शरमेची गोष्ट आहे. तिला कांहीं धोका आहे हें कळून सुद्धां तो मूर्ख स्वस्थ बसला."

" रमेश फार बोलायचें नाहीं माहीत आहे ना ? " त्याला थांबवून मध्येच मीना म्हणाली " आतां अगदीं बोलू नका."

" मीना, मला थोडें तरी बोलण्याची परवानगी द्या, माझ्या ताईला सर्व हकीगत कळली पाहिजे. "

" मी सर्व सांगितली आहे. तुम्हाला थोडक्यात आणखी कांहीं सांगा-यचें असल्यास सांगून टाका. मी जरा बाबासाहेबांच्याकडे जाऊन येते पण फार बोलायचें नाहीं हें लक्षांत ठेवा. "

" बरें आहे. "

ती गेल्यावर रमेशनें सर्व हकीगत प्रमिलेला सांगितली. उषेच्या आत्म-हत्येची हकीगत कळल्यावर प्रमिलेला फार वाईट वाटले. " किती गुणी माझी बाळ होती ! नवऱ्यावर किती निर्व्याज प्रेम. या सर्व आपत्तीला कारण

श्रीकांत ! मी नको म्हणत असता तिला हट्टानें तिकडे पाठविली, जायच्या-वेळीं मला बोलवा म्हणून मी कळविलें असतां मला नकळतच त्यांनीं तिला पाठविली, आणि त्या रागावर तिच्या बाबतींत पत्र लिहिण्याचें मी टाकलें होतें. पत्रें मिळालीं नाहींत तेव्हां हे दोघे गप्प कसे बसले ! "

" ती बिचारी काय करणार ! त्या वसंतरावानें ते तुझ्याकडे असून आनंदांत आहेत असें दडपून सांगितले. इतके पाजी लोक जगांत असतात अशी तिची कल्पना नसल्यामुळें तिनें त्या बातमीवर विश्वास ठेवला. पत्रें येण्यापेक्षां ते सुखी असावेत असाच नेहमीं तिचा प्रयत्न होता."

" ती किती थोर मनाची होती ! वास्तविक नवऱ्याच्या आग्रहानें ती सिनेमांत गेली पण एका शब्दानेही तिनें त्याना कधीं दोष दिला नाहीं. निष्पाप, निर्मळ व अजातशत्रु अशा स्त्रीला दुःख देण्यांत ईश्वरानें काय पाहिलें ! अखेरपर्यंत तिने आपला शांतपणा ढळू दिला नाहीं. "

" उषेसारखी स्त्री उषाच तिला जगांत तोड नाहीं. सर्व जगाला चटका लावून गेली बिचारी, पण त्या लांडग्याच्या ताब्यांत देतांना श्रीकांताना कसें कांहीं वाटलें नाहीं याबद्दलचा जाब विचारल्याशिवाय मी रहाणार नाहीं. "

" ताई तूं ते राहू दे. श्रीकांताना सोडवून आणण्याची कांहींतरी व्यवस्था करायला हवी "

" हो त्याबद्दलच मी खटपट करणार आहे श्रीकांताना एकदा भेटून त्या खुनाची प्रत्यक्ष हकीकत काय आहे हें कळल्याशिवाय कांहींच करतां येणार नाहीं, आणि ती परवानगी मिळविण्या करतांच मिना बिंदु माधवांच्याकडे गेली आहे."

" मीना आपल्याला किती उपयोगी पडते तें पाहिलेंस ना ! "

" फारच गोड मुलगी आहे."

मीनाबद्दल सध्यां कोणी जास्त बोलूं नये अशी रमेशची इच्छा होती म्हणून तो विषय बदलण्याच्या उद्देशानें म्हणाला.

" श्रीकांतानी खुनाचा कबुलीजबाब का दिला कळत नाहीं माझी खात्री आहे कीं त्यावेळीं खास शुद्धीवर नसले पाहिजेत. आतां तूं गेल्यावर सर्व गोष्टींचा खुलासा काढशीलच "

" हो काढीन. पण तुला येथून हलवायचें डॉक्टरांनीं हें मधेंच काय काढलें आहे ! "

" आजच्या आजच हालवा असें त्यांचें म्हणणें आहे. बिंदुमाधवांनीं वाटेंत मटनमार्तंडला उतरण्याची व पेहेलगावाला जाण्याची सर्व व्यवस्था करून ठेवली आहे ते तुझ्या येण्याचीच वाट पहात होते."

" पण ही श्रीकांताची भानगड असता आपल्याला कसें जातां येईल ! मला वाटतें त्यांचे काम पुरें झाल्यावरच मग जाऊ."

" मीना म्हणत होती कीं हा खटला हायकोर्टापुढें चालवावा लागणार आहे. तेव्हां त्या गोष्टीला कमीतकमी एक महिना तरी लागेल."

" मग कसें करावें ! "

" बिंदुमाधवाच्या सल्ल्यानेंच काय ते ठरवूं ही पहा मीना आलीच."

" तुम्हाला श्रीकांताना भेटायची परवानगी बाबासाहेबांनीं आणली आहे. तेव्हां तुम्हाला सवड होईल तेव्हां जावें."

" मी आताच जाते."

मीनानें तिची ताबडतोब जाण्याची व्यवस्था केली.

कच्च्या कैदेंत असल्यामुळे श्रीकांताचा स्वतःचाच पोषाख त्याच्या अंगावर होता. प्रमिलेनें परवाना दाखवितांच पोलिस अधिकाऱ्यांनीं तिला आत नेले व तिला श्रीकांताजवळ सोडून आपण दूर अंतरावर उभे राहिले.

प्रमिलेला पहातांच त्याचा शांत होऊं लागलेला मेंदू पुन्हा भडकला तो हंसतच तिला म्हणाला, " वा, उषा इकडे यायला किती वेळ लावलास मी तुझी केव्हांची वाट पहातो आहे."

आपल्या स्वतःला सुद्धां श्रीकांत ओळखत नाहींत हें पाहून तिला परा-काष्ठेचे वाईट वाटलें. त्याच्यावरचा तिचा राग पार नाहींसा झाला. ती दुःखानें म्हणाली " श्रीकांत मला ओळखले नाहींत का ? मी उषा नाहीं !"

" हो, हो, ओळखलें, श्रीकांत टाळ्या वाजवून म्हणाला, " तूं त्या शेरखानाची प्रेमला नव्हेस का !"

" त्या शेरखानाची प्रेमला नसून तुमची प्रमिला आहे."

" अरे खरंच कीं मी विसरलों.प्रमिले उषा आतां कुठें गेली असेल ग?"

" तुम्ही शांतपणानें वागलात तर तुम्हांला ती भेटेल."

" काय भेटेल! खोटी गोष्ट! प्रमिले ती पुढच्या जगांत केव्हांच गेली आहे. मीही तिच्या मागोमाग चाललोच आहे."

" वसंतरावांचा खून तुम्ही केलात!"

" कोण वसंतराव! हं हं उषाचा खून करणारा! खून करणें म्हणजे त्याच्यावर उपकारच करणे आहे, तो हालहाल होऊन मेला पाहिजे आणि मी त्याच खटपटींत आहे!"

" श्रीकांत शांत व्हा, कृपा करा आणि स्वस्थ चित्तानें मला खरीं उत्तरें द्या. तुमच्याकरतां तळमळणारी जगांत पुष्कळ मंडळी आहेत त्याच्याकरतां तरी खरीं उत्तरें द्या."

" माझ्याकरतां आतां कोण तळमळणार? तळमळणारी माझी उषा गेली. दुसरे कोण तळमळणार! तूं तुझें तर त्या शेरखानावर प्रेम आहे. जा माझ्या डोळ्यासमोरून जा. उषेशिवाय मी कोणाचीच भेट घेऊं इच्छित नाहीं."

" पण उषेनेंच मला पाठवलें आहे."

" उषेने कां पाठवलें आहे? मग ये अशीं बैस. काय हवें तें साग."
त्याचा मेंदू ठिकाणावर नाहीं याबद्दल प्रमिलेची खात्री झाली. खुनाची माहिती काढण्याचा पुन्हां एकवार प्रयत्न करावा या आशेनें ती पुन्हां म्हणाली, " श्रीकांत तुम्ही वसतरावाचा खून नाहींना केलात?"

" कोण म्हणतो नाहीं म्हणून! मी या माझ्या हातानें त्या दुष्मनाचा खून केला आहे. माझ्या उषेचा पूर्ण सूड उगविला आहे."

" श्रीकांत तुम्ही तो केला नाहीं याबद्दल माझी खात्री आहे मग कां बरें आपल्यावर तो उगीच ओढून घेतां!"

" मी आपल्यावर ओढून मुळींच घेत नाहीं मीच तो खून केला आहे. मला आतां उषेच्या मागे जागून तरी काय करायचे आहे."

" पण तिचा निरोप तुम्हाला माहित आहे ना! तिनें तुम्हांला बजावलें आहे कीं " वाईट वाटूं द्यावयाचे नाहीं, दुःख करायचे नाहीं, मग तिची आज्ञा नाहीं का मानणार! तिला स्वर्गात वाईट वाटेल ना!"

" पण मी दुःख करतो आहे कोठें. मला आतां तिच्याकडे जायला सांपडेल म्हणून किती तरी आनंद झाला आहे."

यावेळीं माहिती मिळणें अशक्य आहे असें पाहून ती तेथून परतली पण लगेच परत न जातां पद्माकडून कांहीं बातमी मिळाल्यास पहावी असा बेत करून ती त्या बाजूला निघाली.

सिनेमा कंपनीतील लोकांनाही कोर्टाचा निकाल झाल्याशिवाय हलतां येत नसल्यामुळें ते उदास मनानें बोटहाऊसवर स्वस्थ बसून होते. श्रीकांतानें कबुलीजबाब दिल्यामुळें त्या बाबतींत विचार करण्याला कोणालाही जरूरीच भासली नाहीं.

प्रमिला दिसतांच पद्मा रडतच बाहेर आली. तिला गप्प करून ते दोघे आंतल्या खोलींत गेलें आपली खुर्ची तिच्या अगदीं जवळ नेऊन प्रमिला म्हणाली, " पद्मा या खुनाच्या बाबतींत तुझें काय मत आहे कुणी खून केला असावा !"

पद्मा भीत भीत म्हणाली, " श्रीकांताशिवाय कोण करणार ! त्यांनीं कबुलीजबाबही दिला आहे. शिवाय माझ्या समक्ष त्यानीं 'तुझा खून करीन म्हणून सकाळीं वसंतरावाना बजावले होते. प्रमिलाताई, वसंतराव गेले ! नाहींसे झाले ! सिनेमात आतां असा मोहरा मिळणार नाहीं."

" पद्मा मला वसंतरावाची माहिती नको आहे. पण त्याच्या वाईटावर आणखी कोणी होतें का ! तुला माहित असेल ते सर्व सांग अगदीं भिऊ नकोस, सर्व गोष्टी माझ्याजवळ गुप्त रहातील."

" त्यांच्या वाईटावर खरेंच कोणी नव्हते. निदान मला तरी त्याबद्दल कांहीएक माहीत नाहीं. "

" बरें तें असूं दे, उषेवर आणखी कोणी प्रेम करीत असलेले तुला माहीत आहे कां !"

" तिच्यावर प्रेम कोण नाहीं करणार ! सिनेमांतल्या प्रत्येक नटाची त्यांची ओळख व्हावी म्हणून धडपड चालली होती."

" तूं मला अगदीं खरं उत्तर देत नाहींस असें वाटतें."

" प्रमिलाताई, खरेंच मला कांहींएक माहिती नाहीं. उषाताईवर प्रेम

करणाऱ्या माथेफिरूनें हा खून केलेला नसून श्रीकांतानेंच तो केला असावा अशी माझी पक्की खात्री झाली आहे. ते या बाजूला रात्रीं आले होते, असा पोलिसजवळ पुरावा आहे. खून ज्यानें झाला ते हत्यारही त्यांचेंच आहे मग आतां संशय कसला राहिला !"

तिच्याकडून माहिती काढण्याचा प्रयत्न करण्यांत अर्थ नाहीं असें पाहून जरा वेळानें ती तेथून निघाली. तिने सिनेमामालकाची भेट घेतली पण त्याच्याही बोलण्याचा विशेष फायदा झाला नाहीं. उषेवर अत्यंत प्रेम करणाऱ्या कोणी तरी माथेफिरूनें हा खून केला असला पाहिजे मग तो श्रीकांत असो वा दुसरा कोणी असो " याबद्दल तिची खात्री झाली. इतर दोनतीन नट व नोकर लोकाकडून रात्री कोण आले होते, वगैरेची माहिती काढण्याचा तिने प्रयत्न करून पाहिला पण कोणालाच याबद्दल माहिती नसल्यामुळे निराश होऊन ती परत फिरली. यावर तोड काय काढावी हेंच तिला कळेना.

बिंदुमाधवाच्या विचारेच काय तें करावें असे ठरवून ती परत घरीं आली. व सर्व हकीकत मीनाला तिनें निवेदन केली. व एखादा चांगला वकील या कामीं देण्याबद्दल बिंदुमाधवास विनति करण्यास तिनें सांगितलें. जरा वेळाने मीना परत येऊन म्हणाली कीं या घटकेला वकील देण्यांत अर्थ नाहीं, श्रीकाताचा कबुली जबाब फिरला पाहिजे असें बाबासाहेब म्हणत होते. ते पुढेंही म्हणाले कीं, केसची ते पूर्ण चवकशी करून आलें आहेत. सर्व पुरावा श्रीकाताच्याविरुद्ध आहे तेव्हां त्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. त्यानीं एक सूचना दिली आहे कीं आज दुपारीं तुम्ही कामिटिंग मॅजिस्ट्रेटपुढे जाऊन सांगावें कीं श्रीकांताचें डोकें ठिकाणावर नाहीं. तेव्हां त्याचें डोके ठिकाणावर येईपर्यंत मुदत द्यावी व डोकें ठिकाणावर आणण्याचा प्रयत्न करण्याकरतां त्यांना येथून लांब " पेहेलगांवाला नेण्याला परवानगी द्यावी त्यांची परत आणण्याची जबाबदारी आम्ही घेऊं "

" कल्पना उत्तम आहे, पण मॅजिस्ट्रेट ऐकतील कां !"

" बाबासाहेब या बाबतींत त्यांना बोलून ठेवतील. मॅजिस्ट्रेट येथील

रहिवाशाचा जामीन मागतील तेव्हां त्यांचे स्वतःचें नांव सांगावें म्हणुन त्यांनीं निरोप सांगितला आहे."

" तुमच्या बाबासाहेबांचें आमच्यावर अनंत उपकार आहेत. ते नसते तर आम्ही काय केले असतें कुणास ठाऊक ! "

" त्याचा आपण मग विचार करूं. आधीं आपल्या उद्योगाला लागा." मीना गंभीर चेहरा करून म्हणाली.

# पेहेलगांवची सफर

२५

ठरल्याप्रमाणें प्रमिलेनें अर्ज दिला. पण कोर्टानें श्रीकांताला यांच्या ताब्यांत देण्याचें नाकारलें पण सर्व प्रयत्न करण्याची सवड देण्याकरतां पोलिस पहाऱ्यांत त्याची पेहेलगावाला रवानगी करण्याचा हुकूम दिला. अर्थात जामिनाबद्दलचा प्रश्न निघालाच नाहीं. वाटेल तेव्हां कैद्याला भेटण्याची मात्र प्रमिलेनें परवानगी मागून घेतली होती.

समुद्रसपाटीपासून ८००० फुटापेक्षां जास्त उंच असलेलें तें "पेहेल-गांव" फारच रम्य ठिकाण होतें. भोवतालचे डोंगर १२ महिने बर्फाच्छा-दित असल्यामुळें तेथील वनश्री अवर्णनीय होती, तेथील पाणी अत्यंत पाचक असून आजारी माणसाला ते ठिकाण म्हणजे अमृतवल्लीच होतें.

अशा ठिकाणीं श्रीकांताला न्यायला मिळाल्याबद्दल सर्वांनाच फार आनंद झाला; रमेशला डॉक्टरच्या सल्ल्याप्रमाणें तिकडे जाणें प्राप्तच होतें. एक बातमी सांगावयाची रमेश विसरला होता ती म्हणजे शालिनी आपल्या नवऱ्यासह पेहेलगावास आहे ही होय. तिची व तिच्या नवऱ्याबद्दलची सर्व हकीकत प्रमिलेला कळल्यावर आपल्या मदतीला तेथें एक दक्षिणी स्त्री आहे हें जाणून तिला फार समाधान वाटलें.

दुसऱ्या दिवशीं उजाडताच निघायचें ठरलें होतें. श्रीकांताला घेऊन ते लोकही त्याच सुमारास निघणार होते. निघायची तयारी झाली त्यावेळीं मीना कोठें दिसेना म्हणून शोध करतां कळलें कीं कांहीं कामाकरतां ती परगांवी गेली आहे. पण लवकरच ती पेहेलगांवाला येणार आहे.

ती नसल्यामुळें त्या दोघांना फारच चुकल्याचुकल्यासारखें होत होतें. प्रवासांत मुद्दाम एक डॉक्टर घेतला होता. पूर्वी ठरल्याप्रमाणें पहिला मुक्काम मदनमार्तंडला झाला. सर्व काश्मीरचा भिक्षुकवर्ग तेथेंच रहातो. आधींच निरोप गेला असल्यामुळें त्या गांवी त्यांची व्यवस्था उत्तम झाली. कोणत्याही तऱ्हेची कमतरता भासली नाहीं.

तेथील मंडळींचें आभार मानून प्रमिला रमेशसह पुढें निघाली व योग्य वेळीं विशेष कांहीं त्रास न होतां पेहेलगावी सुखरूप पोहोंचली.

शालिनीला बातमी लागतांच ती धांवतच त्यांच्या बिऱ्हाडीं गेली. तिच्या बरोबर आनंदराव होतेच पण औपचारिक चार वाक्ये बोलून ते शालिनीला ठेवून आपल्या मित्रमंडळीकडे निघून गेले.

रमेशची दशा पाहून शालिनीला फार वाईट वाटलें. तिला त्याची पुष्कळ थट्टा करायची होती पण तिचें मनच घेईना. जरा वेळानें उषेची, श्रीकांताची हकीगत कळल्यावर तर तिचें डोळ्याचे पाणी खळेना. तो दिवस अशाच तऱ्हेनें दुःखात गेला. शालिनी परवानगी काढून येथेंच राहिली होती.

सकाळच्या प्रहरीं श्रीकांताची हालहवाल पहाण्याकरतां प्रमिला तिकडे गेली व शालिनी रमेशच्या औषधपाण्याकडे बघूं लागली. सकाळचें औषध देतां देतां ती म्हणाली, "रमेश पूर्णेंदूची काय हालहवाल आहे ?"

"तिच्याबद्दल मला कांहींच बातमी लागत नाहीं. ती मीनाच्याही ओळखीची दिसते. मीनाने पैज लावली आहे कीं तुम्हांला पूर्णेंदु ओळखणार नाहीं पण मी पैज जिंकेन असें तिला सांगितलें आहे. ती मला एकदा दिसली मात्र पाहिजे."

"अरे काल दुपारीच ती माझ्याकडे येऊन गेली होती."

"काय ती इथे आहे, मग मला काल कां नाहीं सांगितलेंस !"

"काल या बाबतींत बोलायची वेळ तरी होती कां !"

"हो खरंच बरं ती काय म्हणाली ?"

"तिला तुझ्या अपघाताची बातमी लागलेली दिसते. ती म्हणाली, कीं शुश्रूषा करायला मला परवानगी मिळेल कां ?"

" अगदीं खरं हें ! कां मला थाप देते आहेस !"

" अगदीं खरें ती आज पुन्हा येणार आहे."

" मीनाही आज उद्यां इतक्यांत इकडे येणार आहे, तेव्हां दोघींचे कसे जमेल तें जमो."

" दोघींची एकमेकीशीं ओळख दिसते आहे, त्या आपल्या पाहून घेतील. तुला आपलें मदतीला मनुष्य मिळाल्याशीं काम."

" मोठी पंचाईत आहे खरी."

" दोघींचेंही तुझ्यावर प्रेम दिसते. आतां तूंच स्वतः त्यापैकीं एकीची निवड कर म्हणजे झाले."

" श्रीकांताची सुटका झाल्याशिवाय या बाबतींत बोलणें शहाणपणाचे होणार नाहीं तेव्हां असल्या बाबतींत न बोललेलें बरे."

" बरें तुझी मर्जी. पण ती जर आतां आली तर तिच्याशीं बोलशील तरी ना ! कां त्यालाही नकार."

" बोलायला कांहींच हरकत नाहीं."

" येवढी तरी तिच्यावर मेहेरबानीच म्हणायची ?"

" ते जाऊ दे ग, तुझ्याबद्दलची हकीगत सांग."

" माझी रडकथा कायम आहे. परवा त्या तिघापैकीं एकानें दारूच्या धुंदींत माझ्याशीं लगट केली त्यामुळे संतापून मी कड्यावरून उडी टाकायला निघाले होते पण त्यानें क्षमा मागितल्यामुळें तो प्रश्न तितकाच राहिला."

" पण आनंदराव ही गोष्ट कशी सहन करतात ?"

" ते पिऊन पूर्ण बेशुद्ध पडल्यावरच दुसऱ्या लोकांना या गोष्टी सुचतात. आणि ते सावध झाल्यावर या बाबतींत बोललें तरी त्यांना तें खरें वाटत नाहीं."

" प्रमिलाताईच्या आईसारखी तुझी गत होऊं नये म्हणजे मिळविली."

" तिची काय अवस्था झाली ?"

नवऱ्यानें दारूच्या धुंदींत व एका हलक्या स्त्रीच्या नादीं लागून तिचे

फार हाल केले व त्या हालातच तिला मृत्यु आला. हे दारूबाज लोक दारूच्या पायीं काय करतील याचा नेम नाहीं."

" सुखाच्या बाबतींत मी निराश झाले आहे. एकदा सुखरूपपणें येथून घरीं गेले म्हणजे मिळविली."

" घरीं गेल्यावर कोणतेंही अविचाराचें कृत्य करू नकोस मला विचाऱ्याशिवाय कांहीं एक करणार नाहीं असें वचन दे."

" अरे वचन कशाला हवें, तुझी इच्छाच असली तर घे, मी पुढील आयुष्यांत तुझ्या संमतीशिवाय कोणतीच गोष्ट करावयाची नाहीं असें ठरवलें आहे; हें घे वचन."

किती वेळ तरी शालिनीचा हात रमेशनें आपल्या हृदयाशीं धरला होता त्याच्या डोळ्यांत आलेले अश्रू पुसून व आपला हात हळूच सोडवून ती म्हणाली. " रमेश पूर्वीची आठवण झाली होय ! नको काढूस ती आठवण या जन्मीं आपण एक होणें शक्य नाहीं. पण पुनर्जन्म असल्यास पुढील जन्मीं तरी आपण एक व्हावे अशी अंतःकरणापासून माझी इच्छा आहे."

" पुढच्या जन्मीची आशा करण्यांत अर्थ नाहीं. बरें असो आतां वाईट वाटूं देणार नाहीं. ते पहा कोणी तरी बाहेर आले आहे. पहा बरं कोण आहे ते ?"

शालिनी बाहेर गेली व जरा वेळानें हसत येऊन म्हणते " ओळख पाहूं कोण आहे ते ?"

" मला काय माहीत ?"

" अरे पूर्णेंदु आली आहे. तिला आंत आणूं कां ?"

" हो, हो, ताबडतोब घेऊन ये पण जरा थांब, आधीं माझ्या खिशातला तिनें दिलेला रुमाल इथें काढून ठेव बघूं "

तेथें असलेल्या कोटाच्या खिशांतून तिने रुमाल बाहेर काढला पण एकाच्या ऐवजीं त्यांत दोन रुमाल सापडले तें पाहून ती म्हणाली, " रमेश कमाल आहे तुझी, माझ्याशीं तूं किती प्रतारणा करणार ?"

" कसली प्रतारणा !" रमेशनें आश्चर्यानें विचारलें.

" अरे हा दुसरा रुमाल माझ्या न कळत पूर्णेंदुकडून मिळविलास आणि आतां प्रतारणा कसली म्हणतोस ?"

" ईश्वरसाक्ष मला यांतील कांहीं माहीत नाहीं तिलाच पाहिजे तर विचार."

'विचारलेंच पाहिजे, नाहीं तर मी कशाला तुझ्याशीं बोलायला येते." थोड्याशा रागानेंच ती पुन्हां बाहेर गेली.

डोक्यावर पूर्ण पदर घेतलेली स्त्री आंत आली तिला एका खुर्चीवर बसवून शालिनी म्हणते " विचार काय विचारायचे आहे ते आतां लाजूं नकोस."

" प्रश्न विचारायच्या आधीं मला उजव्या पायाचें पाऊल दिसेल तर ही पूर्णेंदू आहे कां नाहीं हें मी सांगूं शकेन."

त्या स्त्रीनें मुकाट्यानें उजव्या पायातील पायमोजा काढून पाय पुढें केला तों आगठ्याजवळील तीळ पाहून तो आनंदानें म्हणाला, "शालिनी हीच पूर्णेंदु आहे अशी माझी खात्री झाली; व बन्नूला हिलाच मी सोडविली यांत शंकाच नको आतां मीनाला म्हणावें कीं पैज जिंकली. पूर्णेंदूला शालिनी मी तुझ्यासमक्ष ओळखलें आहे."

" खोटी गोष्ट आहे." त्या स्त्रीनें डोक्यावरचा पदर बाजूला करीत म्हटलें " मी पूर्णेंदु नाहीं, मी मीना आहे तुम्ही हरलांत आतां तुमचा लेखी पुरावा पाहिजे."

" हा काय घोटाळा आहे तुम्ही पूर्णेंदु नाहीं का?" शालिनीने आश्चर्यानें विचारलें.

रमेश तर वेड्यासारखा मीनाकडे पहात राहिला. मीनानें रमेशकडे पाहून स्मित केलें नंतर ती म्हणाली मी याचा उलगडा करते लक्ष द्यावं. " माझे खरें नांव पूर्णेंदूच आहे व आमचे बाबा त्याच नांवांनीं मला हाक मारतात. माझे वडील जरी सध्या बन्नूला व्यापार करीत आहेत तरी आमची पूर्वीची भिक्षुवृत्ती असून आमचा बराच जमीनजुमला मटनमार्तंडला आहे. बिंदुमाधव हे माझे चुलते आहेत तेव्हां शिक्षणाकरतां मला श्रीनगरांत रहावें लागलें, पण काकांना माझें पूर्णेंदु हें नांव न आवडून त्यांनीं माझें नां

मीना असें ठेवलें यामुळें बन्नूला किंवा मटनमार्तंडला माझें नांव पूर्णेंदु असे व श्रीनगरला मीना असे. तुमची पहिली भेट झाली तेव्हां सुट्टींत मी तिकडे गेले होते, त्यानंतर कोहटला सर्कसच्या वेळीं तुम्हाला पाहिले. श्रीनगरला तुमची अचानक भेट झाल्यावर पहिल्या प्रथम मी बरीच गडबडले पण तुम्ही खालीं पहात असल्यामुळें माझा गोंधळलेला चेहरा तुमच्या लक्षांत आला नाहीं. बाबासाहेबांना माझी सर्व हकीकत सांगून माझें नांव व नातें सर्व गुप्त ठेवण्याची त्यांना विनंति केली व त्यांनींहि ती गोष्ट मोठ्या आनंदानें मान्य केली त्यामुळें शालिनीताईना मी पूर्णेंदु म्हणून भेटलें व यांच्या पुढें मीना म्हणून मिरवत असे.

" काल मीच आणखी एक रुमाल हे मटनमार्तंडमध्यें आमच्या घरीं असतांना घालून ठेवला हेतु हा कीं, इतक्या वेळा मी तुमच्यापाशीं येऊन तुम्ही मला ओळखूं शकला नाहींत हेच मला सिद्ध करायचे होतें."

" अगदीं कमाल केलीस ! शालिनी यांच्यापैकीं जास्त सुंदर कोण आहे हें तूंच आतां ओळख."

" दोघीहि सारख्याच सुंदर आहेत तेव्हां त्या दोघींशींहि लग्न करून टाक म्हणजे झाले."

" वा, अगदीं लग्नापर्यंत पाळी आणलीस. बिंदुमाधवाच्याकडे मराठी मासिक सापडलें होते तेव्हा त्याचा अभ्यास सुरूं केला वाटतें."

" अरे न करून कसें चालेल, एकदम आपल्या घरीं गेल्यावर मग घादल नको, नाहीं तर प्रमिला वन्स म्हणायच्या कीं कुठली घोरपड गळ्यात बांधून घेतली आहे."

" शालिनी थट्टा पुरे झा ी, आपल्याला सध्यां या बाबतींत कांहींएक बोलायचें नाहीं. मीना आपलेपणानें तुम्ही जी मला मदत केलीत त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे."

" आभाराची भाषा न बोलल्यास मला आनंद होईल."

" कबूल, पण श्रीकांताकडील काय वार्ता आहे ! तो तिकडे दुःखांत असतां आपण आनंदांत येथें गप्पा मारल्या याचेंहि मला आता वाईट वाटूं लागलें आहे."

" श्रीकांताची या संकटांतून सुटका होईल तर किती चांगलें होईल त्यांच्या हातून खून खास झाला नाहीं."

" मग खूनी कोण ! "

" त्याचाच तर पत्ता लागत नाहीं."

" पण त्यांनीं कबुली जबाब लिहून दिला आहे तो मोठी अडचण उत्पन्न करणार आहे. "

" काय होईल तें खरें. "

" आतां तुमच्या सर्कसची काय बातमी आहे ? " शालिनीला कांहीं आठवण होऊन तिने प्रश्न केला.

" सर्कसचा मालक काल माझ्याकडे आला होता त्याला एकंदर परिस्थिति समजाऊन सांगितली. सध्यां तरी मी सर्कसबरोबर येऊं शकणार नाहीं हे पाहून ते आतां श्रीनगराहून मुक्काम हलविणार आहेत."

" ल्यूसी तुला भेटली होती कां ! तिला मात्र फार वाईट वाटेल. "

" कोणाला " मीनाने मध्येच प्रश्न केला.

" तुमची व त्या ल्यूसीची ओळख आहे कां ? "

" अग अशी तशी नाहीं अगदीं चांगली ओळख आहे आणि ती कशी झाली ही एक मनोरंजक हकिगत आहे. काय तो राग, मनधरणी करतां करतां माझा जीव अगदीं बेजार झाला. शालिनी यांना एकदां तिच्याबद्दल माहिती सांग. "

" इतकें कांहीं नको हिणवायला. त्यावेळीं तुमचें वर्तनच तसें होते. लोकांशीं वाटेल तसें वागायचें आणि दुसरे कोणी रागावलें कीं त्याची चेष्टा करायची ! "

" पण आतां तर राग राहिला नाहींना ! "

" मी प्रत्यक्ष चवकशी केल्यावर खात्री झाली तेव्हांच राग गेला आहे."

" मीनाताई तुम्ही त्या ल्यूसीबद्दल कांहीं काळजी करूं नका ती तुमच्या आड कधींहि येणार नाहीं. "

" जाऊं द्या तो विषय. पण प्रमिलाताई अजून कशा येत नाहींत. मी तिकडे जाऊन येऊं कां ? "

" खरेंच जाऊन या. ताईला जाऊन बराच वेळ झाला नाहीं ? "

" चांगले दोन तास झाले; कां बरें इतका वेळ लागला."

" मी जाऊन पाहून येते. "

ती उठत असतांच आनंदराव वगैरे मंडळी आंत आली. नवी मडळी पहातांच मीनानें डोक्यावरून पदर घेतला व ती बाहेर गेली.

पडल्या पडल्याच रमेशनें सर्वांशीं हंसतमुखानें हस्तांदोलन केलें. थोडा वेळ बसल्यावर आनंदराव म्हणाले; " वेल मिस्टर रमेश, आम्ही उद्यांच येथून जाऊं म्हणतो तेव्हां आतां काश्मीराहून परत जाल तेव्हां बन्नूला जरूर या. "

" उद्यांच जाणार ! मी तर शालिनीताईच्या जीवावर इथें आलों आहे. प्रमिलाताई एकटी इथें काय करणार ! मी बरा होईपर्यंत इथें रहाण्याचें शालिनीनें प्रमिलाताईला वचन दिलें आहे. "

" Sorry can't help आम्हाला तर उद्यां निघालेंच पाहिजे. "

" पण मी म्हणतो शालिनीताई इथें चार दिवस राहिली तर काय हरकत आहे ! मला बरें वाटल्यावर मी तिला एक दिवसहि ठेवून घेणार नाहीं. आपल्या ताईला तिची सोबतही होईल.

" तुम्ही मोठा घोटाळ्याचा प्रश्न टाकला आहे. शालिनी तुझा काय विचार आहे इथे रहायचें आहे ? "

" परवानगी दिल्यावर चार दिवस राहीन म्हणते. प्रमिलाताईना सुट्टी नसल्यामुळें त्या लवकरच निघणार असे म्हणत होत्या. हें खून प्रकरण लांबलें नाहीं तर त्या ताबडतोब निघतील त्यावेळीं त्यांच्याबरोबर मी येईन. "

" All right मिस्टर रमेश तुमच्याकरतां मी तिला इथे ठेवतों पण विनाकारण जास्त दिवस ती इथें रहाणार नाहीं याबद्दल खबरदारी घ्या. "

" त्याची तुम्ही अगदीं काळजी करूं नका. शालिनीताईसाहेब ह्याबद्दल मी आपला फार आभारी आहे."

" No mention please बरं आहे आम्ही जातो. Good bye."

ते गेलेले पाहून रमेश म्हणाला " शालिनी पेढे काढ."

## अपघात नं. ४ २६

प्रमिला रमेशकडून निघाली ती सरळ श्रीकांतांच्या तुरुंगाकडे वळली. तिला तुरुंगांत प्रवेश मिळण्यास काहींच अडचण पडली नाहीं. श्रीकांत एका खाटेवर स्वस्थ पडून राहिला होता.

चोविस तासांचा एकांतवास व पूर्ण विश्रांती मिळाल्यावर तो बराच स्वस्थ दिसू लागला. प्रमिला येताच त्याच्या मनाची थोडी चलबिचल झालेली दिसली पण ती थोडा वेळच टिकली.

तो खाटेवर तसाच पडून राहिला होता. प्रमिला जवळ आली तेव्हा त्यानें तिला खाटेवर बसण्यास जागा करून दिली. दोघांच्याही अंतःकरणांत खळबळ उडाली होती, एक मिनीट दोघेही स्वस्थ होते, नंतर प्रमिलेचा हात हातात घेऊन श्रीकात म्हणाला, " प्रमिले कशाला आलीस. "

आपला हात त्याच्या हातातून न सोडविता ती म्हणाली, " तुमची प्रकृती आतां बरी आहे ना ! "

" माझ्या प्रकृतीला काय झाले आहे. ती चागली खडखडीत बरी आहे. तुझा कांहीं तरी माझ्या प्रकृतीबद्दल गैरसमज झालेला दिसतो. "

" गैरसमज नाहीं. तुम्ही परवा खरेंच शांत नव्हता. "

" बरें जाऊं दे तें. आज सकाळीच कां आलीस ? "

" श्रीकांत, तुम्ही काय हें करून ठेवलें आहेत ! त्यांतून बाहेर निघणें कठीण काम होऊन बसलें आहे. "

" प्रमिले, मला खरेंच आता जगावेसें वाटत नाहीं. मी उषेला कधी-ही सुख दिलं नाहीं पण माझ्या सुखाकरता तिनें जिवाचें रान केलें, आप-ल्या प्रकृतीकडेसुद्धां पाहिलें नाहीं. लग्नाच्या आधीं मला ती म्हणाली होती कीं ' माझ्यासारखें प्रेम कुणाला करतां यायचें नाहीं, प्रत्यक्ष प्रमिला-ताईलासुद्धा साधायचें नाहीं. "

डोळ्यांत आलेले अश्रू पुसून प्रमिला म्हणाली, " अगदीं सत्य आहे; तिच्यासारखी प्रेमळ मुलगी माझ्या पहाण्यांत नाहीं."

" तिला मी सुख दिले नाहीं याबद्दल मला रात्रंदिवस वाईट वाटत आहे, दुर्दैवानें तिची क्षमा मागण्याचीसुद्धां संधी मला मिळाली नाहीं. मी पापी हेच खरें म्हणूनच त्या देवतेनें मला जिवतपणी दर्शन दिलें नाहीं."

" श्रीकांत आतां मनाला वाईट वाटून देऊन काय उपयोग ?"

" प्रमिले, काय करू रहावत नाहींग. तिनें कड्यावरून उडी टाकल्यावर तिचा प्राण माझ्याकरतां घोटाळू लागला असेल ! शेवटच्या घटकेला तरी मी तिला भेटावें म्हणून तिने इच्छा केली असेल, पण काय मी अभागी तिची शेवटची इच्छासुद्धा मी श्रीनगरांत असून मला पुरी करतां आली नाहीं. शेवटच्या घटकेपर्यंत माझ्या नावाने मनात टाहो फोडीत असेल पण त्यावेळीं कोण येणार ! मरताना तिला फार यातना झाल्या असतील नाहीं. ? "

" श्रीकांत, अगदीं बोलू नका. तुमचे हे विलाप मला ऐकवत नाहींत. ती स्वतः निघून गेली पण तिने सर्व जगाला वेड लावलें आहे. तिची माहिती असलेला असा एकही प्राणी नाहीं कीं त्याला तिच्याबद्दल हळहळ वाटणार नाहीं. "

" प्रमिले, नुसती हळहळ वाटून काय उपयोग ! या सर्व दुःखाला मी कारण आहे. तिनें सिनेमांत जावें असें माझें मत आहे असें कळतांच तिनें या आगींत उडी घातली. प्रमिले, याबद्दल मला शिक्षा झालीच पाहीजे. या अपराधाला देहांताशिवाय दुसरी शिक्षा नाहीं. "

" श्रीकांत व्यर्थ मनाला ताप करून घेऊं नका तुमची दिशाभूल झाली. तुमच्यासारखे हजारो लोक सिनेमात काम करणें म्हणजे रामराज्यांत आश्रा-

सारखें आहे असें मानून पतंगाप्रमाणें दिव्यावर उडी मारतात मयसभेप्रमाणें त्याची दिशाभूल पद्धतशीरपणें चालली आहे. तुमच्यासारखे लोक जर फसतात तर ज्या थोडया अजाण आहेत, ज्यांना जगाचा अनुभव नाहीं अशा स्त्रिया फसतील यांत नवल नाहीं."

"जाऊदे, त्या सिनेमाचें नांव काढले कीं माझें डोके फिरून जातें. या लोकांनी कितीजणाचें संसार धुळीला मिळविले असतील कुणास ठाऊक. प्रमिले यापुढें या जगांत माझें कांहीएक काम उरलें नाहीं. मी उषेच्या मागोमाग जातो तू व आई माझ्या सर्व स्थावर जंगम मालाची व्यवस्था पहा. शक्य असल्यास सर्व पैशाचा ट्रस्ट करून माझ्या उषेच्या नांवानें तो दान करा."

"श्रीकांत उगीच वैतागून जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. करू नये ती चूक तुम्ही केली आहेत व ती आतां तुम्हालाच निस्तरणें भाग आहे. तुम्हाला या सिनेमाचा खरा पश्चात्ताप झाला आहेना? मग तुमची हकीगत प्रसिद्ध करून लोकांची जी दिशाभूल होते आहे ती थांबवा लोकाचे उघडे पडणारे संसार वाचविल्याचें तरी श्रेय घ्या."

"प्रमिला ही गोष्ट तुलाही शक्य आहे. माझ्याकरतां तूच ही सर्व हकीकत प्रसिद्ध कर. मला आतां जगाचा कंटाळा आला आहे."

"कंटाळून कसें चालेल! तुम्ही उषेला बरें वाटावें म्हणून प्रत्येक गोष्ट करणार ना!"

"हो, तिची इच्छा, तिची आज्ञा मी एखाद्या दासाप्रमाणें पाळायला तयार आहे."

"मग झालें तर, तुम्ही आपला जीव फुकट दवडावा अशी तिची इच्छा नाहीं. तुम्ही सुखी असावें हेंच एक तिचें ध्येय होतें."

"पण मी सुखी व्हायला तिच्या मागोमागच गेलें पाहिजे तिथें स्वर्गांत आम्ही दोघे आनंदसाम्राज्यांत पोहत राहूं."

"पण तुम्ही खुनी म्हणून मरणें तिला आवडणार नाहीं."

"मग काय करूं मला आत्महत्त्या करतां येत नाहीं"

"तुमच्यासारख्यांनी आत्महत्त्या करणें ठीक होणार नाहीं किंवा विना-

कारण नामुष्कीनें मरणे तुमच्या कीर्तीला शोभण्यासारखें नाहीं. तुम्ही जरी लिहून दिलें आहेत की मी स्वतः खून केला तरी माझी खात्री आहे कीं तुमच्या हातून असलें नामर्दपणाचें कृत्य होणार नाहीं."

" माझ्या लेखावर तुझा विश्वास नाही ! मी खून करीन अशी प्रतिज्ञा केल्याबद्दल पद्मा साक्ष देते आहे. त्या रात्री मी बोटहाऊसच्या आसपास होतो हें सिद्ध झालेले आहे; ज्यानें खून झाला तो माझा चाकू आहे. इतक्या गोष्टी उघड असता तुझा त्यावर विश्वास नाहीं हे म्हणणेंही खरोखर फार आश्चर्याची गोष्ट आहे."

" श्रीकांत सर्व जगापेक्षां मी तुम्हाला ज्यास्त ओळखतें हें तुम्हालाही कबूल करावे लागेल. एक वेळ तुमचें माझ्यावर अतिशय प्रेम होतें तेव्हां त्या प्रेमाची आठवण देऊन मी विनंती करते कीं असलें नामुष्कीचें मरण आपल्यावर ओढून घेऊं नका."

" प्रमिले, माझें मन अगदीं गोंधळून गेलें आहे मी काय करूं हेंच मला कळत नाहीं."

" तुम्हाला कळत नाहीं म्हणूनच म्हणते कीं मी सांगेन तसें ऐका."

" बरें आहे; पण हातचा बाण सुटून गेला आहे."

" अद्याप थोडी आशा करायला जागा आहे. लेख देताना तुमचं डोकं ठिकाणावर नव्हतं असा पोलिस अधिकाऱ्यांनीं शेरा मारला आहे. त्याचाच आपल्याला उपयोग करून घ्यायचा आहे. तुमचा मेंदू ठिकाणावर नव्हता ही गोष्ट प्रत्येकाला माहित आहे तुरुंगावरील अधिकाऱ्याच्यासुद्धां ही गोष्ट लक्षांत येऊन त्यानें तुम्हाला वेड्याच्या वार्डात ठेवावें म्हणून शिफारस केली होती."

"मग तुझें म्हणणें तरी काय ? मी पूर्वी काय बोललो काय लिहून दिलें वगैरे मला खरोखरच चांगलेसें कांहीं एक आठवत नाहीं."

" तीच आठवण आणखी कांहीं दिवस तरी नाहींशी झाली पाहिजे म्हणजे त्याचा अर्थ असा कीं तुम्ही कांहीं दिवस ' डोके फिरलेला माणूस' होऊन राहिले पाहिजे."

" पण याचा उपयोग काय ? अशा वागण्यानें कांहीं खुनी इसम सांपडणार नाहीं."

" त्याबद्दल कसोशीनें शोध चालला आहे आणि माझी खात्री आहे कीं उषेच्या पुण्याईनें तुमच्यावरचा हा डाग नाहींसा होईल."

" बरें आहे तुझ्या इच्छेच्या कांहीं मी आड येत नाहीं."

" आता कसें बरें बोललात ! आतां तुम्ही खरें श्रीकांत शोभता. जाते मी आता " आपला हात सोडवीत प्रमिला म्हणाली, " आज येवढच पुरें खुनी इसमाचा शोध लागेपर्यंत तुम्हाला प्रकृतीच्या स्वास्थ्याकरतां म्हणून इथेंच राहायला हवे."

" बरें पण रमेशची प्रकृति कशी आहे ?

" त्याची प्रकृती कल्पनेपेक्षां ज्यास्त लवकर सुधारली हे सर्व श्रेय त्या मीनाला आहे. "

" मुलगी फारच प्रेमळ व गोड आहे. तो आतां इथें आला आहे ना?"

" हो आला आहे. "

" त्याच्या प्रकृतीबद्दल रोजच्यारोज कळवीत जा. "

" हो जरूर कळवीन जाऊं मी आता. आतां नाहींना कांहीं वेडेवाकडे विचार मनांत आणणार."

" नाहीं तूं स्वस्थ चित्तानें जा."

थोड्या आनंदी वृत्तीनेच ती तेथून बाहेर पडली, ती जागा डोंगराच्या एका टोकाला होती, त्याला वळसा घालून ती चालली असतां तिला कुणीतरी प्रमिलाताई म्हणून हाक मारल्याचा भास झाला. तिनें मागें वळून पाहिलें तेव्हां उषेचा भाऊ गुलाब धापा टाकीतच तिच्याजवळ येत असलेला तिला दिसला. त्याला पाहून तिला फार आश्चर्य वाटलें ती त्याला म्हणाली, 'गुलाब तुं इकडे कोणीकडे ?'

" उषाताईला भेटायला आलो होतो तों तिनें आत्महत्त्या केलेली कळली. तेव्हां श्रीकांताना भेटायचा मी विचार केला, तर त्यांच्यावरही खुनाचा आरोप येऊन ते तुरुंगांत आहेत म्हणून कळलें, त्यांची श्रीनगरला गांठ

घेण्याचा मी पुष्कळ प्रयत्न केला पण साध्य झाला नाहीं म्हणून आज इथें आलो आहे, प्रमिलाताई मला त्यांना भेटवाल कां ! फार जरूरी आहे. "

" तुला कशाला भेटायचें आहे ?"

" मला खुनी इसम माहीत आहे पण त्यांचा या बाबतींत सल्ला घ्यायचा आहे. "

" तुला खुनी माहीत आहे ? फार आनंदाची बातमी आहे. खुनी इसम सांपडल्याबरोबर श्रीकांताची सुटका होईल तेव्हां त्याचें नाव मला सांगून ठेव. "

" ताई माफ करा त्यांना विचारल्याशिवाय मला तें फोडता येत नाहीं; पण मला एक सांगा कीं खुनी किंवा श्रीकांत यांपैकीं एक कोणी तरी फांशी जाणारच ना ? "

" हो यांत शंकाच नाहीं " कां तुला कां शंका वाटली. "

" शंका नाहीं मी आपलें उगीच विचारलें. "

" मग तूं नांव केव्हां सांगणार ? श्रीनगराहून हुकूम आणल्याशिवाय तुला त्यांना भेटायला मिळणार नाहीं. "

" कसेही करून आजच्या आज भेटवा. "

" बरं तूं संध्याकाळीं त्या हॉटेलांत भेट त्यावेळीं आपण याबद्दल जास्त बोलूं, नाहीं तर आतांच तिथे चल आमच्या इथेंच रहा म्हणजे झालें, तुझ्या एकंदर चेहऱ्यावरून तूं शरीराचें फारच हाल केलेले दिसतात. "

" नको, मी तुमच्याबरोबर आतां येत नाहीं. संध्याकाळींच भेटेन. "

एका क्षणांत तो पुन्हां दिसेनासा झाला. प्रमिलेला मोठें चमत्कारिक वाटलें, त्याचा चेहरा असा भेदरलेला कां दिसत होता हेंच तिला कळेना. अशा तऱ्हेच्या विचारांत व्यग्र असतांच ती हॉटेलांत येऊन पोहोंचली.

तिला पहातांच रमेश म्हणाला, " ताई किती उशीर केलास, आम्ही आतां शोधाला मनुष्य पाठविणार होतो. "

" जरा वेळ लागला खरा पण एक काम झालें. "

" कोणतें काम ! "

" त्यांनीं खून केला नाहीं हें कबूल केले असून मी सांगेन तसें वाग-ण्याचें आश्वासन दिलें आहे. "

" फार उत्तम गोष्ट झाली, आतां खुनी शोधून काढायला सोपे जाईल. "

" त्याबद्दलही थोडीशी माहिती मिळाली आहे मला आतां गुलाब भेटला होता. "

" त्या बिचाऱ्याची काय दशा झाली असेल ! उषेचें त्याच्यावर फारच प्रेम होते नाहीं. तो काय म्हणत होता ? "

" त्याला खुनी इसम माहीत आहे असें तो म्हणाला. पण नांव मात्र श्रीकांताच्या परवानगीशिवाय सांगायला तो तयार नाहीं, तेव्हां त्याला आज संध्याकाळी इथे बोलावला आहे. तो आल्यावर तें नांव त्याच्या जवळून काढण्याचा प्रयत्न करूं, नाहींतर कांहींतरी लटपट करून त्यांची श्रीकांताशी भेट करविली पाहिजे. "

" तो आतां संध्याकाळीं आल्यावर पाहू. बरं ताई आज तुला एका नवीन माणसाची ओळख करून देतो. या इथें डोक्यावर पदर घेऊन तोंड झांकून बसल्या आहेत ना यांचे नाव पूर्णेंदु असून त्यांचे वडील बन्नूला व्यापारधंदा करतात ! "

" यांचेंच ना पत्र आपल्याला आले होते ? "

" होय त्याच त्या; पूर्णेंदु आमच्या बहिणीला नमस्कार करा. "

ती नमस्कार करीत असताना तिचा चेहरा पाहून ती रमेशला म्हणाली, " माझी थट्टा करतोस कारे, यांना मी चागलें ओळखतें याचें नांव मीना आहे, माणसांनीं भलतीच थट्टा करूं नये. "

" अग भलतीच नाहीं, खरी थट्टा आहे तूं त्यांनाच विचार त्यांचें नांव पूर्णेंदु आहे कां नाहीं. "

" प्रमिलाताई मी तुम्हांला फसवलें याबद्दल माफ करा माझें नांव पूर्णेंदु असून मी आपल्या चुलत्याच्या घरीं मीना या नांवानें रहात होते. "

" तुम्हीं दोघी एक आहात हें ऐकून समाधान वाटलें नाहींतर मला एक काळजीच होती. "

" कसली काळजी ? " रमेशनें मुद्दामच विचारलें.

" तुला सांगण्यासारखी नाहीं. आणि शालिनी कुठें आहे ? "

" ती आनंदरावाचें सामानसुमान बांधायला गेली आहे. मी तिला म्हटलें कीं, प्रमिलाबाई येईपर्यंत थाब तर या पूर्णेंदूला पुढे करून निघून गेली. "

" वा मग तिचें जाणें तुझ्या पथ्यावरच पडलें म्हणायचें. "

" आपल्याला तें कांहीं कळत नाहीं. "

" कशाला कळेल, पूर्णेंदु खालीं बसा कीं, मला कांहीं हें तुमचें नांव आवडत नाहीं मी आपले मीना म्हणून म्हणत जाईन. "

" आपल्याला जें नांव आवडेल तेंच मी यापुढें लोकांना सांगत जाईन. "

" मग फारच उत्तम. तुमच्या गांवीं मटनमार्तंडला आम्ही आलों होतो त्यावेळीं दिसला नाहींत. "

" तुम्ही आलांत त्यावेळीं होते, श्रीनगराहून तुमच्या आधीं मी नुकतीच आले होते. पण माझें नांव त्यावेळीं गुप्त ठेवायचें असल्यामुळें मी आपल्या पुढें आलें नाहीं. नंतर मला पेहेलगावची व्यवस्था पहावयाची असल्यामुळें मी भावाला घेऊन पुढें आले. "

" तुमचे इतके अगत्य पाहून मला फार धन्यता वाटली. "

" मग मला इथे रहायला परवानगी आहे ना ! "

" हो, तुम्हाला कोण मना करणार ! "

" आनंद झाला. आतां मी एकदां गांवांत जाऊन भावाला निरोप सांगून येते. "

" जा, पण लवकर या. "

संध्याकाळ झाली तरी गुलाबचा पत्ता नव्हता. प्रमिला अगदीं साचिंत होऊन बसली. गुलाब आला नाहीं तर सुनो कसा सांपडणार ! कांहीं झालें तरी त्याला गाठून आणलाच पाहिजे असा विचार करून तिनें मालका-कडून ५।६ माणसें मागविलीं व गुलाबचें वर्णन देऊन अशा तऱ्हेचा मनुष्य

भेटल्यास त्यास इकडे घेऊन या असें सांगितलें व आणणारास दहा रुपयांचें बक्षीस देऊं केलें.

बक्षीसाच्या आशेनें ते सर्व नोकर मोठ्या ईर्षेनें सर्व दिशेला धांवले. पण रात्रीं अकरा वाजले तरी कोणाचा पत्ता नव्हता. शेवटीं एकानें वर्दी आणली कीं अशा चेहऱ्याचा व पोषाखाचा मनुष्य वरच्या कड्याच्या पायथ्याशीं मरून पडला आहे."

ती बातमी ऐकतांच सर्व मंडळी घाबरून एकदम स्तब्ध झाली. तो अपघातानें पडला कीं त्यानें आत्महत्या केली हेंच कळेना. तो नाहींसा झाल्यावर खुनी कसा सांपडणार! याबद्दल प्रमिलेला काळजी वाटूं लागली. एक क्षण असा गेल्यावर रमेश म्हणाला, "ताई या सिनेमाच्या पायीं हा चवथा अपघात आहे. उषेच्या काळजीनें मला पहिला अपघात झाला, दुसरा अपघात उषेच्या मृत्यूत झाला. तिसरा वसंतरावाच्या खुनांत होऊन आज हा चवथा आत्महत्येंत होत आहे. या सिनेमापायीं किती लोकांचा सत्यानाश होणार आहे कळत नाहीं, ताई गुलाबनेंच वसंतरावाचा खून केला आहे असें मला वाटतें. जलदी करून त्याच्याजवळ कांहीं पत्र सांपडते आहे कां पहा."

त्याची कल्पना प्रमिलेलाही पटली. ती लगेच बरोबर पांच सहा माणसें घेऊन निघाली व लवकरच त्या कड्याच्या पायथ्याशीं आली. दगडावर डोकें आपटून त्याचा देह छिन्नविछिन्न झाला होता ते दृश्य पाहून प्रमिलेनें रुमालानें आपलें डोळें झांकून घेतले. घेरी येते कीं काय अशीही तिला भीति पडली; पण दगडाचा आश्रय मिळाल्यामुळें ती थोडा वेळ उभी राहूं शकली.

याच सुमाराला पोलिसांनाही वर्दी गेल्यामुळें तेही जाग्यावर हजर झाले.

पोलिसांनीं पंचनामा करून त्या प्रेताबरोबर त्याच्या खिशांतील पत्रही नेल्यामुळें तिला ते वाचण्यास मिळालें नाहीं.

मोठ्या दुःखित अंतःकरणाने ती परत फिरली. त्या संबंध रात्रींत कोणालाही झोंप आली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच पोलिसांकडून प्रमिलेला बोलावणें आलें. बोलावणें येईल अशी तिची खात्री असल्यामुळें ती त्या तयारींतच होती. ती पोलिस चौकीत जातांच तेथील अधिकाऱ्यांनीं गुलाबचे पत्र प्रमिलेच्या हवाली केलें तें पत्र तिच्या नावचे होतें. कापऱ्या हातानेंच तिनें तें फोडलें पत्रांत पुढील मजकूर होता.

प्रिय प्रमिलाताईस—

सा. न. वि. वि. माझी जन्मापासूनची हकीकत तुम्हांला माहितच आहे, मी उषाताईचा किती लाडका होतो हेंहि जगजाहीर आहे पण मी दुष्टानें तिच्या चागुलपणाचा फायदा घेऊन चांगलाच गुंड बनलो तिच्या जीवावर वाटेल तशी चैन केली पण एक दिवसहि त्या माउलीने मला दुखविलें नाहीं. आरंभीं मी कॉम्रेड झालो, पद्माच्या नादी लागलो तिलाहि कॉम्रेड केली हें तुम्हाला माहीतच आहे. किस्मतपुरात आमचा फार बोभाटा झाल्यामुळें आम्ही वसतरावाच्या नादानें सिनेमांत गेलो व तेथें आम्हाला वाटेल ती चैन करायला सांपडली. कारण तेथें कोणतेच बंधन नव्हतें, उलट आमच्या या चैनीजीवनाला पोषक असेच वातावरण तेथें होतें. पण त्या पाजी वसंतानें आमच्या सुखांत बिब्बा घालण्यास सुरवात केली. माझ्यावर देखरेख करण्याकरतां, माझें कल्याण व्हावें म्हणून माझी उषाताई माझ्या मागें धांवून आली, किती तिचें

माझ्यावर प्रेम ! माझ्या सुखाकरतां तिनें आपलें स्वतःचें सुख बाजूला सारलें पण मी चांडाळानें तिला जिवंतपणीं कधींहि सुख दिलें नाहीं. ती तिथें येतांच पद्माबद्दलची तक्रार मी तिच्याजवळ सांगूं लागलो कारण ती अलीकडे मला टाळींत असते असें माझ्या नजरेला आले होते. त्याचा परिणाम असा झाला कीं मला सिने-मांतून हाकून देण्यांत आलें. मी पद्माला भेटलों व सांगितलें कीं आपल्या लग्नाबद्दल आणाशपथा झाल्या आहेत तेव्हां तूं माझ्या-बरोबर चल; पण ती बिथरली होती ती वसंतरावाच्या मागें आहे म्हणून मला कळलेच होते त्यामुळें मला फारच वाईट वाटलें. मला उषाताईला सुद्धां भेट दिलें नाहीं. नाइलाजानें मी पुन्हां किस्मतपूर गाठलें व सर्व हकीकत श्रीकांताना सांगितली. त्यांनीं कांहीं दिवस स्वस्थ बसण्यास मला सांगितलें. याचवेळीं उषाताईचीहि पत्रें येण्याचें बंद झालें होतें तेव्हां तिकडे काय प्रकार आहे हें पहाण्याकरतां श्रीकांतानीं मला परत पाठविलें. पण दुर्दैवानें माझ्या सांगण्यावर उषाताईचा विश्वास बसला नाहीं व दुसऱ्या दिवशीं मी भेटायच्या आंतच ती त्या मांगाबरोबर निघून गेली. मी संतापानें लाल झालों पण काय उपयोग ! तसाच दुःखित अंतःकरणानें परत आलों तेव्हां कळले श्रीकांतही काश्मीराकडे गेले आहेत, मलाही त्या दोघांच्यावर लक्ष ठेवून उषाताईला वांचवावयाची होती म्हणून मीहि मागोमाग निघालो पण माझ्या येण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं आदल्या रात्रींच उषाताईनें आत्महत्या केल्याचें कळलें, त्या सर्वांला कारण तो पाजी हरामखोर आहे ही माझी खात्रीच होती, तेव्हां त्याला जिवंत न ठेवण्याची मी प्रतिज्ञा केली. श्रीकांताना भेटण्याकरतां म्हणून मी त्यांच्या खोलीकडे आलो, त्यांना झोंप लागलेली होती दार नुसतेंच लोटलेलें असल्यामुळें मला आंत जाता आलें. पहिल्या प्रथम ते उठेपर्यंत थांबण्याचा माझा बेत होता पण पुढे पडलेली हत्याराची बॅग पहातांच मला खून चढल्यासारखें झालें. मी हळूच बॅग उघडून त्यांतून तो लखलखीत चाकू बाहेर

काढला, आतां खून करूनच मग श्रीकांताना भेटावें असें ठरवून व दार पुन्हां लोटून घेऊन मी नदीकडे निघालो.

अद्याप बोटीवर सामसूम झाली नव्हती पण दिव्याच्या प्रकाशांत मला काय दिसलें त्या नराधमाच्या बाहुपाशांत पद्माला पाहून मी देहभान विसरून गेलो. प्रत्यक्ष या ठिकाणीं आत्महत्या झाली असतां या राक्षसाना प्रणयचेष्टा करायला सुचतात तरी कशा याबद्दल मला आश्चर्य वाटलें व या जगांत रहाण्यास हा नरपशू नालायक आहे अशी माझी खात्री झाली. त्या पद्माचाही मला संताप आला होता व तिलाहि विद्रूप करण्याचें मी ठरविलें.

रात्रीं ११ च्या पुढें मला हवी होती ती संधी मिळाली पाण्यांतून मागच्या बाजूनें मी आंत प्रवेश मिळविला माझें काम सोपें झालें कारण वसंतराव दार नुसतें लोटून आंत निजला होता. एक क्षणाचाही विलंब न लावतां व त्याला आवाजहि न काढूं देता तो चाकू आरपार त्याच्या छातींत खुपसला. रक्ताच्या चिळकांडीनें माझें अंग भरलें व मला घेरी आल्यासारखें वाटू लागले, तसाच धडपडत मी बाहेर आलों पद्माचें निदान नाक तरी कापून घ्यावें असें माझ्या फार मनात होतें पण ते साधण्याचे चिन्ह दिसेना कारण मला खरोखरीच घेरी येऊं लागली होती. तेव्हां पुन्हा केव्हांतरी येऊन तो सूड उगवूं असें मनांत योजून मी तेथून परतलों मी नदींतच पडायचा पण थोडक्यांत बचावलों. त्या घादरींत हातांतील चाकू मात्र कुठें उडाला तो सापडेना थोडावेळ शोधून पाहिला पण त्या घाबरलेल्या स्थितींत कांहीं केल्या तो सांपडेना शेवटीं त्याचा नाद सोडून मी पसार झालों तों वाटेंतच श्रीकांत भेटले पण त्यांच्या नजरेस न पडतां मी दुसऱ्या बाजूनें निघून गेलो. माझा रक्तानें भरलेला कोट मी हातांत घेऊन चालल्यामुळे माझा कोणास संशय आला नाहीं. पण त्या चाकूनेंच शेवटीं घात केला, त्यांवर श्रीकांताचें नांव असेलहा माझी कल्पनाही नव्हती, पण नंतर काय उपयोग! सकाळीं श्रीकांताना पकडलेलें कळलें त्यांना भेटण्याची

माझी फार इच्छा होती, कांहीं झालें तरी मला आतां जगायचेंच नव्हतें. कुणाच्या जीवावर जगायचें ! माझी ताई मला सोडून गेली व जिच्याकरतां मी घरावर तिलांजली दिली ती पद्मा माझ्याशी दगलबाजी करून निघून गेली इतकेंच नाहीं तर माझ्या दुष्मनवर फिदा झाली मी ताईचा सूड उगविला हेंच सांगण्याकरतां मला श्रीकांताना भेटायचें होतें पण तें काम प्रमिलाताई तुम्ही कराल अशी आशा आहे. सिनेमांतील माझा अनुभव अगदीं वाईट आहे व कोणीहि घरंदाज स्त्रीनें या भानगडींत पडूं नये अशी माझी आग्रहाची विनंति आहे.

हा सर्व खुलासा झाल्यावर श्रीकांत ध्दां सुटतीलच. माझ्या बद्दल आणखी पुरावा हवा असल्यास तो रक्तानें भरलेला कोट मी रहातो त्या खोलींत जमिनीत पुरला आहे. शेवटीं आजपर्यंत मी केलेल्या अपराधांची सर्वांनीं विशेषतः श्रीकांतानीं क्षमा करावी अशी विनंति करून हें पत्र पुरें करतो.

आपला,
गुलाब

गुलाबबद्दल सर्वांनाच फार हळहळ वाटली. पण दुःखांत सुख येवढेच कीं त्यांच्या मृत्यूने श्रीकांताचा जीव बचावला.

तें पत्र कोर्टांत हजर केल्याबरोबर श्रीकांताची सुटका झाली. रमेशलाही आतां बरें वाटू लागल्यामुळे तो परत श्रीनगरास आला. मीना व शालिनी बरोबर होतीच.

पंडित बिंदुमाधवांचा प्रेमाचा निरोप घेऊन सर्व मंडळी तेथून निघाली ती किस्मतपुरास विशेष त्रास न होता सुखरूप पोहोचली.

श्रीकांताच्या घरांतील अशी एकहि वस्तु नव्हती कीं जिला उषेचा हात लागला नव्हता त्यामुळें प्रत्येक पावलागणिक श्रीकांताला तिची आठवण होई. त्यामुळें दिवसांतील बरेच तास त्याचे आश्रु गाळण्यांत जात. प्रमिला व रमेश मुद्दामच तेथें राहिलेले होते. शालिनीनें कबूल केल्याप्रमाणें विला

कोहटला जावें लागलें. बनूला फॅमिली घेऊन रहाता येत नसल्यामुळें आनंद-रावानीं बिऱ्हाड कोहटलाच ठेवलें होतें.

" सर्व रोगांवर ' काल ' हा मोठा धन्वंतरी आहे. त्याची मात्रा सुरू होतांच मनुष्याला हळुहळू बरें वाटूं लागते. श्रीकांताचेही त्याचप्रमाणें झालें. तो हळुहळु दवाखान्यांत जाऊं लागला होता. पुढें पुढे उषेचे विस्मरणा-करतां म्हणून बाराबारा तास तो दवाखान्यांत घालवूं लागला. त्याची आई नुकतीच आली होती. तेव्हां त्या दोघांची परवानगी घेऊन मोठ्या जड अंतःकरणानें प्रमिला व रमेश आपल्या गांवी गेले.

रमेशने पुढें काय करावें हा प्रश्न उद्‌भवला. त्यानें आणखी कांहीं तरी अभ्यास करावा अशी प्रमिलेची इच्छा होती त्याप्रमाणें तो अभ्यास करूं लागला.

शालिनीचें व आनंदरावाचें नीट जमले नाहीं तेव्हां वैतागून ती एक दिवस प्रमिलेपुढे हजर झाली. तिचें काय करावें हा प्रश्न पुढे आलाच, शेवटीं तिनें डॉक्टरीचा अभ्यास करावा असे ठरलें व त्याप्रमाणे बरीच खट-पट केल्यावर तिला परवानगी मिळाली.

मंडळी श्रीनगराहून निघण्याचें वेळीं मीनानें रडून रडून डोळे सुजवून घेतले होते पण तो प्रसंग लग्नाबद्दल विचारण्याचा नसल्यामुळें कोणीच कांहीं बोललें नाहीं. पण एक दिवस प्रमिलेला एकदम तार आली कीं " मीना अत्यवस्थ आहे तुम्ही दोघांनीं ताबडतोब यावें. "

अर्थातच दोघानाही पुन्हां तिकडे जावें लागलें. मीना सारखी कांहींतरी असंबद्ध बरळत होती. तिनें प्रमिला व रमेशला आणण्याबद्दल घोषा घेत-ल्यामुळें पंडीत बिंदुमाधवांनीं त्यांना तारेनें बोलावून आणलें त्यांचे बंधू वीणाशंकर हेही मुद्दाम आले होते.

दहाव्या दिवशीं ताप ओसरला; डोक्याला अत्यंत ताप झाल्यामुळें हा ताप आला असें डॉक्टरांचें मत पडलें. व तिच्या डोक्याची काळजी घ्यायला हवी नाहींतर दुखणें उलटेल असेंही त्यांनीं बजावलें.

दुखणें कशामुळें आहे याची साधारण कल्पना बिंदुमाधवाना होतीच तेव्हां त्यांनीं याबद्दल प्रमिलेला विचारलें अर्थात् त्याची आडकाठी नव्हतीच.

डॉक्टरांच्या औषधापेक्षां रमेशचें सान्निध्य हेंच रामबाण औषध असल्या मीनाची प्रकृतीही मंडळी आल्यावर लवकरच सुधारली. दोघांच्या प्रेमा आतां गुप्तपणा कांहींच न राहिल्यामुळें व घरच्या मंडळींचीहि आडकाठी नसल्यामुळें योग्य वेळीं त्या दोघांचे मीलन झालें.

पद्मा दुसरा एखादा नट हुडकून काढण्याच्या खटपटींत आहे तर स्यूसीही एखादा रंगेल पण प्रेमळ जोडीदार मिळविण्याच्या उद्योगांत आहे.

माझी पूर्वीची स्नेहबंधन कादंबरी संपण्याचे वेळीं मी आश्वासन दिलें होतें कीं पूर्णेंदु कादंबरींत प्रमिलादेवीची पुढील हकीगत कळवीन. पण पूर्णेंदूच्या नांवाची ही उलटापालट झाल्यामुळें प्रमिलादेवीचें चरित्र थोडे मागें ठेवून उषेच्या चरित्रालाच फार महत्त्व द्यावें लागलें. तरीपण यापुढील माझ्या " भावना " कादबरींत मात्र प्रमिलादेवीचें चरित्र संपूर्णतेने खास वाचण्यास सांपडेल. त्याचप्रमाणे पद्माचा व शालिनीचा नाविन्यपूर्ण इतिहास वाचण्यास मिळेल.

संपूर्ण